# ''अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व - एक राजकीय अभ्यास''

शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
पीएच्.डी. (राज्यशास्त्र) पदवीसाठी सादर केलेला शोध प्रबंध

संशोधक
श्री. विक्रम नारायण पाटील
एम.ए., एम.फिल. (राज्यशास्त्र)

मार्गदर्शक
डॉ. बी. बी. विभूते
एम.ए., पीएच्.डी.
संचालक आणि विभागप्रमुख,
प्रौढ आणि निरंतर शिक्षण आणि विस्तार कार्य विभाग,
शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.



राज्यशास्त्र विभाग,
शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

एप्रिल - २००६

# प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, श्री. विक्रम नारायण पाटील यांनी ''अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व – एक राजकीय अभ्यास'' या विषयावरील संशोधन कार्य समाधानकारकरित्या पूर्ण केले आहे. विक्रम नारायण पाटील यांनी माझ्या मार्गदर्शनाखाली स्वतंत्ररित्या हा शोध प्रबंध लिहिला असून तो इतर कोणत्याही विद्यापीठातील कुठल्याही अन्य परीक्षेसाठी सादर केलला नाही.

सदरचा शोध प्रबंध शिवाजी विद्यापीठाच्या पीएच. डी. (राज्यशास्त्र) पदवी परीक्षेसाठी सादर करण्यास माझी अनुमती आहे.

कोल्हापूर

दिनांक : १८ एप्रिल, २००६

डॉ. बी. बी. विभूते

संशोधन मार्गदर्शक

# प्रतिज्ञापत्र

''अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व – एक राजकीय अभ्यास'' या विषयावरील प्रस्तुत शोध प्रबंध मी शिवाजी विद्यापीठाच्या पीएच.डी. (राज्यशास्त्र) पदवी परीक्षेसाठी लिहिला आहे. हा शोध प्रबंध अथवा त्याचा कोणताही भाग मी अन्यत्र कोठेही, कोणत्याही परीक्षेसाठी सादर केलेला नाही.

कोल्हापूर

दिनांक : १५/४/२००६

श्री. विक्रम नारायण पाटील

संशोधक

# ऋणनिर्देश

कोणताही अभ्यासविषय निवडताना आवड ही महत्त्वाची असते. लहानपणापासूनच सामाजिकतेची आवड होती. त्यामुळे सामान्य, गरीब लोकांसाठी व देशासाठी कार्य करणाऱ्या समाजसुधारकावर पीएच.डी. करण्याचा विचार होता. त्यामुळे 'अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व - एक राजकीय अभ्यास' हा विषय पीएच.डी. साठी निवडला. माझ्या आवडी-निवडीला माझे मार्गदर्शक डॉ. बी. बी. विभूते यांनी तात्काळ सहमती दर्शविली. त्यांची प्रेरणा, जिव्हाळा माझ्या कामामध्ये चैतन्य देणारा ठरला. माझ्या उच्च शिक्षणातील प्रत्येक वळणावर मला मार्गदर्शन करणाऱ्या, प्रेरणा देणाऱ्या डॉ. सौ. व्ही. पी. रासम व विभूते यांचे आभार मानन्यापेक्षा त्यांच्या ऋणात राहणे पसंत करतो.

कोणतेही विधायक कार्य सहकार्याशिवाय पूर्णत्वास पोहचत नाही. याकामी राज्यशास्त्राचे माजी विभागप्रमुख डॉ. के. के. कावळेकर, राज्यशास्त्राचे विभागप्रमुख डॉ. अशोक चौसाळकर, राज्यशास्त्र विभागातील प्राध्यपक सर्वश्री डॉ. लक्ष्मीनारायण तारोडी, डॉ. नानिवाडेकर, प्रा. सौ. भारती पाटील यांचे बहुमोल मार्गदर्शन लाभले हे नमूद करून त्यांचे मी अंत:करणपूर्वक आभार मानतो.

प्रबंधपूर्तीच्या कामी आर्थिक सहकार्य करणारे महाराष्ट्राचे ज्येष्ठ नेते व सांगोला तालुक्याचे आमदार श्री. गणपतराव देशमुख तसेच ज्येष्ठ स्वातंत्र्य सेनानी क्रांतिवीर नागनाथअण्णा नायकवडी यांच्या ऋणात राहणे पसंत करतो. संशोधन माहिती गोळा करण्यासाठी आर्थिक सहकार्य करणारी आय.सी.एस.एस. आर, नवी दिल्ली या संस्थेचे आभार मानतो. संशोधनासाठी माहिती गोळा करताना अनेक विद्यापीठात व संशोधन संस्थेत गेल्यानंतर तेथील प्राध्यापक, अहिल्याबाईवरील अनेक गाढे अभ्यासक, ग्रंथपाल तेथील कर्मचारी वर्ग यांनी

बहुमोल सहकार्य केले याबद्दल त्यांचे आभार मानतो. राज्यशास्त्र विभागातील श्री. संभाजी तोरस्कर, श्री. अरुण वणिरे यांनीही सहकार्य केले त्यांचे आभार मानतो. माझ्यावर जिवापाड प्रेम करणारे शिवाजी विद्यापीठ वसतीगृहातील व परिसरातील सर्व मित्र यांचेही सहकार्य लाभले त्याबद्दल त्यांचाही मी ऋणी आहे.

ज्यांनी मला शिक्षणासाठी प्रेरणा दिली ते हुल्लगबाळी मामा व सुलोचना अत्या यांचाही ऋणी आहे. शिक्षणासाठी वेळोवेळी मार्गदर्शन करणारे माझे बंधु एल. एम. पाटील, उपमुख्य लेखाधिकारी यांचेही मन:पूर्वक आभार मानतो. मी खूप शिकावे यासाठी प्रेरणा देणारे माझे आई-वडील यांचे आशिर्वाद व बंधू संग्राम व युवराज यांचेही सहकार्य माझ्या शब्दसामर्थ्यांची अक्षय शिदोरी आहे.

या शोधप्रबंधाचे काम अत्यंत तत्परतेने पूर्ण करून देणारे श्रीकांत कॉम्प्युटर्स, राजारामपुरी, कोल्हापूर, याशिवाय जाणता अजाणता सहाय्यभूत ठरलेल्या सर्व मंडळींचे आभार मानतो. धन्यवाद !

**श्री. विक्रम नारायण पाटील**

# अनुक्रमणिका

# ''अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व- एक राजकीय अभ्यास''

## प्रास्ताविक

**''अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व – एक राजकीय अभ्यास''** हा विषय पीएच. डी. शोधप्रबंधासाठी निवडला आहे. हा विषय निवडताना अहिल्याबाई होळकर यांच्या नेतृत्वातून जे राजकीय, सामाजिक व धार्मिक कार्य केले याचा राजकीय दृष्टीकोनातून शोध घेणे हा या संशोधनाचा प्रधान हेतू आहे. अहिल्याबाई होळकर हे १८ व्या शतकातील कर्तबगार राजकीय व प्रशासकीय नेतृत्व होते. त्यांचे व्यक्तित्व व कर्तृत्व मराठ्यांच्या इतिहासात अजरामर होऊन गेले. परंतु अहिल्याबाईंच्या कर्तृत्वाची एकच बाजू अनेक अभ्यासकांनी प्रकाशात आणली ती म्हणजे धार्मिक, त्यांनी जे तत्कालीन कालखंडात जे राजकीय, प्रशासकीय व सामाजिक दृष्टिकोनातून जे लोककल्याणकारी कार्य संपूर्ण भारतभर केले त्यातून समाजाला जे नेतृत्व दिले याचा अभ्यास पीएच. डी. संशोधनातून करण्याचा प्रयत्न केला आहे.

नेतृत्व ही संज्ञा आपल्या नित्य परिचयाची असली आणि तिचे महत्त्वही स्पष्टपणे जाणवत असले तरी नेतृत्व म्हणजे काय? या प्रश्नाचे सोपे सुटसुटीत व सर्वसमावेशक उत्तर थोडक्यात देणे मात्र, कठीण जाते. नेतृत्वाचे आणखी एक गमक म्हणजे नेत्याची प्रेरणा देण्याची क्षमता किंवा मानवी कर्मशक्ती ती प्रेरणेवर काम करते असा सिद्धांत आहे. प्राचीन काळापासून प्रत्येक समाजात पुढारी आणि अनुयायी असे दोन वर्ग अस्तित्वात होते आणि आजही आहेत. समाजाच्या नेतृत्वाचे कार्य करणे हे पुढाऱ्यांचे आणि पुढाऱ्यांकडून मार्गदर्शनाची अपेक्षा करणे हे अनुयायांचे कार्य आहे. राजकीय जीवनातसुद्धा नेतृत्वाची आवश्यकता असते अशा राजकीय नेतृत्वाचे स्वरूप कोणते? ते नेतृत्व कोणाला आणि कोणत्या आधारावर प्राप्त होते? त्या नेतृत्वाचा अविष्कार कसा घडतो? इत्यादीचा अभ्यास

राज्यशास्त्राच्या दृष्टीने करणे आज आवश्यक झाले आहे. प्रभाव पाडणारी व्यक्ती म्हणजेच पुढारी होय आणि प्रभावित झालेले लोक म्हणजेच अनुयायी होत. परिस्थिती बदलताच नेतृत्वातही बदल झालेला दिसतो. परिस्थितीनुसार अनुयायी आणि नेते ह्यांच्यामध्ये अदला-बदल होत असते. पारंपरिक नेतृत्व प्रामुख्याने जात वर्ग किंवा विशिष्ट समूह ह्यांच्या सदस्यत्वामुळेच निर्माण झाले होते. परंतु आधुनिक काळात लोकशाही आणि जनतेच्या सार्वभौम सत्ता ह्या संकल्पनेचा स्वीकार आणि प्रसार झाला आणि त्या विचारसरणीतून नेतृत्व उदयाला आले. राजकारण आणि राजकीय प्रक्रिया ह्यांचे स्वरुप जसजसे बदलत गेले तस तसे नेतृत्व पध्दतीत बदल घडत गेला. लोकशाही राजकीय व्यवस्थेत निवडणूकांना फार महत्व असते. निवडणूकामुळे राजकीय नेतृत्वात बदल होतो. त्यामुळे कधीकधी तळाशी असलेले नेतृत्व शिखरापर्यंत पोहचते तर कधी शिखरावर असलेले नेतृत्व भूईसपाट होते.

आजचे राजकीय पुढारी विशिष्ट स्तरातून निर्माण होत नसतात. कारण राज्याची शक्ती, राज्याचे संविधान आणि विधिनियम यानुसार संघटित होते. कोणत्याही व्यक्तिला आपल्या इच्छेनुसार सत्ता गाजविता येत नाही. तसेच कोणतेही राजकीय पद व्यक्तीला जन्मानुसार प्राप्त होत नाही. आपले व्यक्तिमत्व आणि गुणकर्तृत्व या आधारावरच निवडणूका जिंकणे आणि राजकीय पद प्राप्त करणे हीच राजकीय नेतृत्वाची कल्पना आज मान्य झाली आहे.

राष्ट्रातील लोकांची इच्छा व आकांक्षा पूर्ण करणारे नेतृत्व अधिमान्य राजकीय नेतृत्व समजण्यात येते. निवडणूका आणि नेमणूका या आधारावरील राजकीय नेतृत्व अधिमान्य नेतृत्व असते. त्यालाच लोकांचा पुढारी आणि राष्ट्रीय नेता असे मानण्यात येते. लोकांना व निरनिराळ्या संस्थाना वेळोवेळी भेटी देणे आणि लोकांचा विश्वास संपादन करणे अशा परिणाम कारक प्रतिनिधीत्वामुळे त्यांना अधिमान्यता जास्त परिदृढ होते तसेच निर्णय घेण्याची क्षमता, निर्णय अंमलात आणण्याची शक्ती आणि कृती यावरही नेत्याची

अधिमान्यता अवलंबून असते. पारंपरिक व आधुनिक काळात नेतृत्वाचा आणि नेतृत्व बदलाचा विचार करण्यात आला. पारंपारिक नेतृत्व प्रामुख्याने जात वर्ग किंवा विशिष्ट समूह त्यांच्या सदस्यात्वामुळेच निर्माण झाले. परंतु आधुनिक काळात लोकशाही आणि जनतेची सार्वभौम सत्ता या संकल्पनांचा स्विकार आणि प्रसार झाला आहे. त्यामूळे आधुनिक काळातील राजकीय नेतृत्व राजकीय सामाजिक संघटना, राजकीय आणि सामाजिक चळवळी अशा अनेक क्षेत्रात उदयास आल्या आहेत. राजकारण आणि राजकीय प्रक्रिया यांचे स्वरुप जसजसे बदलत गेले तसतसे राजकीय नेतृत्व पध्दतीत बदल घडत गेला.

मराठा कालखंडात दोनशे वर्षांच्या इतिहासात स्वतः कर्तृत्वाने प्रसिद्ध पावलेली जी स्त्री नेतृत्व होऊन गेली त्यात जिजाबाई, ताराबाई, येसूबाई, राधाबाई, आनंदाबाई, गौतमाबाई, बायजाबाई, अहिल्याबाई होळकर या कर्तबगार स्त्री नेतृत्वाची मालिका दिसून येते. या सर्वांनीच आपल्या काळातील राज्य व राज्यातील प्रजेसाठी महत्त्वाची भूमिका बजावली. त्यामधील एक नेतृत्व म्हणजे अहिल्याबाई होळकर होय. सुमारे दोनशे वर्षांपूर्वी एक सामान्य कुटुंबात जन्माला आलेली स्त्री तत्कालीन कालखंडात शिक्षणव्यवस्था नव्हती. प्रथा, परंपरा, रूढी, अंधश्रद्धा, समाजव्यवस्था विकृत मनःस्थितीतून जात होती. बळी तो कानपिळी अशी ती व्यवस्था होती. मराठी कालखंडात मुस्लिम राजवटीने मोठ्या प्रमाणात अन्याय अत्याचार केले होते. हिंदूंची मंदिरे पाडणे, स्त्रियांवर बलात्कार, समाजात हिंसा यासारखे विकृत कृत्ये मुस्लिम राजवटीत घडत होती. त्यातूनच शिवाजी महाराजांसारखे नेतृत्व पुढे आले.

१८ व्या शतकात पेशवेकालीन समाजातील परिस्थितीचा विचार करता समाजात मोठ्या प्रमाणात विषमता होती. समाजात देवधर्मावर मोठ्या प्रमाणात विश्वास होता. शकून, ग्रहशांती, भूतबाधेच्या कथा, व्रतवैकल्य, मुहूर्त, सण, गुलामगिरी, अंधश्रद्धा, जातीभेद या व्यवस्थेत समाज अडकला होता. स्त्रियांना सामाजिक स्वातंत्र्य नव्हते. सतीची

चाल, केशवपण बहुपत्नीत्वाच्या पद्धती. पडदा पद्धत, हुंडापद्धती या व्यवस्थेत स्त्री अडकली होती. स्त्रियांना उपेक्षित जीवन जगावे लागत होते. या कालखंडातही अहिल्याबाईंनी या व्यवस्थेला छेद देऊन आपले नेतृत्व व कार्यकर्तृत्व केले याचा अभ्यास होणे गरजेचे वाटते.

**संशोधनाचा हेतू :**

देशाच्या जडणघडणेत अहिल्याबाई होळकर यांनी महत्त्वाची भूमिका बजावली. १८ व्या शतकात त्यांनी केलेल्या कार्याचा मोठ्या प्रमाणात ठसा उमटविला. या कार्याचे राजकीय विश्लेषण संशोधनातून व्हावे. छत्रपती शिवाजी महाराज, पेशवे यांच्या व मुस्लिम राजवटी सारख्या तत्कालीन राजवटीचा त्यांच्यावर कशा प्रकारे प्रभाव पडला याचा शोध घेणे. मुस्लिम राजवटीने केलेला विध्वंस व भारताची जडणघडण करताना धार्मिक कार्य कशा प्रकारचे करावे याचे चिंतन त्यांनी केले. सामाजिक विषमतेच्या काळात राज्यकारभारात धार्मिक व सामाजिकतेची जोड दिली. मुस्लिम राजवटीने केलेल्या अत्याचाराचा त्यांच्या मनावर खोल प्रभाव पडला. समकालीन राजकर्त्यांबरोबर त्यांची राजनीती समजून घेणे संशोधाचा दुसरा हेतू आहे. अहिल्याबाई होळकर यांच्या जीवन आणि कार्याचा आढावा घेणे. त्यांची कार्य करण्याची दिशा कोणती होती. मराठा कालखंडातील पेशवाई मोठ्या प्रमाणात विविध कारणाने गाजली. यामध्ये अहिल्याबाई होळकरांनी आपल्या कार्यातून महत्त्वाची भूमिका बजावली. या ऐतिहासिक कालखंडातील एक ठळक स्त्री नेतृत्व उपेक्षित राहू नये. त्यांच्या राजकीय व सामाजिक कार्याची भूमिका तपासणे अहिल्याबाईनी होळकर राज्याच्या कल्याणकारी राज्यव्यवस्थेची केलेल्या उभारणीचा अभ्यास करणे. त्यांच्या अंगी असलेल्या विविध नेतृत्व गुणांचा अभ्यास करणे. तत्कालीन कालखंडात असलेल्या अनेक रुढी परंपरेच्या विरोधात घेतलेले निर्णय व कर्तव्य

कठोर न्याय व्यवस्थेचा अभ्यास करणे. अहिल्याबाईंच्या उपेक्षित व्यक्तिमत्वाला न्याय देणे हे या संशोधनाचा उद्देश आहे.

या अभ्यासासाठी प्रामुख्याने **पाच प्रकरणात** त्याची विभागणी केली आहे. **पहिल्या प्रकरणात** अहिल्याबाई होळकर व्यक्तिपरिचयामध्ये त्या ज्या कुटुंबात जन्मल्या त्या कुटुंबाची पार्श्वभूमी, त्यांना आलेल्या अडचणी यांचा अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्यावर तेथील पडलेले कौटुंबिक व सामाजिक विचारांचा प्रभाव त्यातून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची झालेली जडणघडण याचा शोध घेतला आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील विविध नेतृत्व गुणांच्या पैलूचा शोध घेतला आहे. अहिल्याबाईंच्या राजकीय विचारप्रणालीचा शोध घेतला आहे. त्या लग्न होऊन होळकर घराण्यात आल्यावर त्या कुटंबाची पार्श्वभूमी तेथील संस्कार याचा प्रभाव त्यांच्यावर कशा प्रकारे झाला याचा परामर्श घेतला आहे.

**प्रकरण दोनमध्ये** अहिल्याबाई होळकर राजकीय व प्रशासकीय कार्य यामध्ये अनेक राजकीय संघर्षात त्यांनी होळकर राज्यात शांतता स्थापन केली याचे राजकीय विश्लेषण केले आहे. अहिल्याबाई होळकरांचे राजकीय नेतृत्व अभ्यासकांनी उपेक्षित ठेवले. त्याला न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे. समकालीन राज्यकर्त्यांबरोबर त्यांची राजनीती समजून घेण्याचा प्रयत्न केला आहे. त्या पेशवेकालीन कालखंडातील साक्षीदार होत्या. त्या काळात त्यांच्या अनुषंगाने ज्या ठळक घटना घडल्या त्यांची कारणमीमांसा केली आहे. पेशवाई टिकली व वाढली ती होळकर, शिंदे यांच्यामुळे त्यामुळे होळकर-शिंदे संबंधाचा अभ्यास केला आहे. अहिल्याबाई होळकरांच्या घरात मल्हारराव होळकरांच्या मृत्यूनंतर जो गृहकलह झाला त्याचे राजकीय विश्लेषण केले आहे. अहिल्याबाई व तुकोजी यांच्या वादात महादजी शिंदे व नाना फडणवीस यांच्या भूमिकांचा परामर्श घेतला आहे. अहिल्याबाईंनी जी आदर्श प्रशासकीय व्यवस्था निर्माण केली त्या व्यवस्थेतील कारणीभूत

घटकांचा आढावा घेणे. त्यांनी अवलंबलेली आदर्श न्यायव्यवस्था याचा अभ्यास केला आहे. त्यांच्या परराष्ट्र नीतीचा व ध्येय धोरणांचा तत्कालीन कालखंडात पडलेला प्रभाव याचा अभ्यास या प्रकरणात केला आहे.

**प्रकरण तीन मध्ये** अहिल्याबाई होळकर यांचे सामाजिक कार्य, यामध्ये त्यांना सामाजिक कार्याची आवड मनस्वी का निर्माण झाली. संपूर्ण देशभर सामाजिक कार्यामागची त्यांची भूमिका तपासण्याचा प्रयत्न केला आहे. तत्कालीन सामाजिक प्रथा, परंपरा, अंधश्रद्धा, स्त्रीविषयक समाजाचा दृष्टिकोन याचे विश्लेषण केले आहे. तत्कालीन यात्रेकरू, गरीब, दुःखी, कष्टी लोकांसाठी जे घाट, धर्मशाळा, विहिरी, कुंड, रस्ते, पाणपोया, वाडे, अन्नछत्र चालू केली. तलाव बांधले, विद्वानांना आश्रय दिला त्या मागचा उद्देश तपासून पाहणे. प्राण्यांसाठी व पशुपक्षांसाठी केलेल्या सोयी सुविधांचे विश्लेषण केले आहे. १८ व्या शतकातील प्रथा, परंपरा मोडीत काढून त्यांच्या राज्यात काढलेल्या हुंडाबंदीचा आदेश, विधवा स्त्रियांना दत्तकपुत्र घेण्याचा अधिकार व स्त्रिला मुलीच्या लग्नात कन्यादान करण्याचा अधिकार दिला. या बाबींचा विचाराचा अभ्यास केला आहे. भिल्ल, गोंड या भक्षकांना त्यांनी रक्षक बनविले त्या मागच्या त्यांच्या सामाजिक जाणिवेचा परामर्श घेण्याचा प्रयत्न केला आहे.

**प्रकरण चार मध्ये** अहिल्याबाई होळकर यांचे धार्मिक कार्य यामध्ये अखिल मानव जातीचे कल्याण करणारा धर्म त्यांना अपेक्षित होता. हिंदू-मुस्लिम द्वेष करण्यापेक्षा मानवधर्म त्यांनी शोधण्याचा प्रयत्न केला. त्यांचे विश्लेषण केले आहे.तत्कालीन धार्मिक काळात मुस्लिम राजवटीने केलेल्या अत्याचाराचा त्यांच्या मनावर खोल प्रभाव पडला. त्यातून त्यांनी अनेक मंदिरांचे जीर्णोद्धार केले. संपूर्ण भारतभर अनेक ठिकाणी मंदिरे बांधली त्यातून त्यांनी केलेली राष्ट्रबांधणी. धार्मिक कार्याच्या माध्यमातून भारतीय संस्कृतीची केलेली जोपासणा याचा अभ्यास केला आहे. तत्कालीन कालखंडात त्या धार्मिकतेकडे का

वळल्या. १८ व्या शतकात मनुष्य एकमेकांच्या धर्माचा द्वेष करत असताना त्यांनी मांडेल्या धर्मनिरपेक्ष विचारांचा अभ्यास केला आहे. त्यांचा हा विचार नव्या पिढीच्या समोर मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

**प्रकरण पाच** उपसंहार केला आहे. यामध्ये तत्कालीन कालखंडातील विचारांचा व कार्याचा अर्थ आजच्या व्यवस्थेत तपासून पाहिला आहे. त्यांच्या अंगी असलेल्या विविध नेतृत्वातून जे कार्य घडले त्याची चिकित्सा या प्रकरणात केली आहे. त्यांनी केलेले कार्य व विचार आजही किती उपयोगी आहेत याचा परामर्श घेतला आहे. त्यांच्या नेतृत्वातील विविध पैलू या प्रकरणात स्पष्ट केले आहेत.

अशा प्रकारे संशोधनाचा हेतू विषद केला आहे.

**संशोधन पद्धती :**

अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व एक राजकीय अभ्यास या विषयाचा अभ्यास करताना ऐतिहासिक संशोधन पद्धतीचा वापर करण्यात आला आहे. त्यासाठी प्राथमिक व दुय्यम साधनांचा वापर केला आहे.

**प्राथमिक साधने :**

यामध्ये निरनिराळ्या ठिकाणी असलेले सरदार, उपाध्ये, जहागिरदार, होळकरशाहीशी संबंध असलेल्या घराण्यांची कागदपत्रे, दफ्तरे याचा वापर केला आहे. त्यामध्ये पेशवे दफ्तर, हिंगणे दफ्तर, राजवाडे दफ्तर, दाभाडे दफ्तर यातील पत्रव्यवहार. होळकर दफ्तरातील महेश्वर दरबाराची बातमीपत्रे, होळकशाहीच्या इतिहासाची साधने, चंद्रचूड दफ्तर, तत्कालीन मोडी हस्ताक्षरे, वेगवेगळ्या मंदिरांतील शिलालेख, पंढरपूर येथील अप्रकाशित बडवे दफ्तर, तत्कालीन लेखकांनी लिहिलेले ग्रंथ, सनदा या प्राथमिक साधनांचा वापर केला आहे.

**दुय्यम साधने :**

यामध्ये अनेक इतिहासकारांनी लिहिलेल्या रियासती, होळकरशाहीचा इतिहास, होळकरांची कैफि यत. शाहिर कवी, विद्वानांनी अहिल्याबाई होळकरासंबंधी लिहिलेले काव्य, पोवाडे, ऐतिहासिक बखरी, अहिल्याबाई होळकरांची जीवनचरित्रे, होळकर शाहीतील पुरुषांची जीवनचरित्रे, ग्रंथालयातील संदर्भ ग्रंथ, त्यांच्यावर लिहिलेले वृत्तपत्रातील लेख, अहिल्याबाई होळकरांच्यावरील स्मरणिका, पुस्तिका, मासिके, अहवाल यांची मदत घेण्यात आली आहे. संशोधन पत्रिका इत्यादींचा वापर करण्यात आला आहे.

या शोध प्रबंधाचा अभ्यास करत असताना देवी अहिल्या विश्वविद्यालय ग्रंथालय इंदोर (मध्य प्रदेश), महेश्वर पुरातन विभाग महेश्वर (मध्य प्रदेश), केंद्रीय वास्तू संग्रहालय इंदोर, इंदोर पुरातन विभाग, अहिल्यादेवी ग्रंथालय इंदोर, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, डेक्कन कॉलेज ग्रंथालय, पुणे, पुणे विद्यापीठ, ग्रंथालय, पुणे, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, दादर, मुंबई, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ ग्रंथालय, औरंगाबाद, शिवाजी विद्यापीठ बॅ. खर्डेकर ग्रंथालय, कोल्हापूर इत्यादींचा उपयोग झाला.

अशा प्रकारे विविध साधनांच्या व ग्रंथालयांच्या आधारे **''अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व एक राजकीय अभ्यास''** या शोधप्रबंधाचा अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे.

# प्रकरण पहिले

# अहिल्याबाई होळकर व्यक्तिपरिचय

**प्रास्ताविक :**

प्रत्येक समाजात लोकांच्या आदरास पात्र ठरेल्या अनेक महनीय व्यक्ती होऊन गेल्या आणि त्यांनी आपापल्या क्षेत्रात अविस्मरणीय कामगिरी केली. अशी साक्ष इतिहासावरून मिळते. धार्मिक, सामाजिक सुधारक, लष्करी नेते, वैज्ञानिक राज्यकर्ते, लेखक, कलावंत अशा विविध भूमिका यशस्वीपणे पार पाडून काही व्यक्ती विभुतीमत्वाच्या पातळीवर पोहोचलेल्या आपण जगात सर्वत्र पाहतो. त्यांच्यापैकी अनेकांचा प्रभाव जनमानसावर त्यांची जीवनयात्रा संपल्यानंतरही दीर्घकाळ टिकून असतो. या सर्वांच्या वर्तनासाठी नेतृत्व अशी संज्ञा सामाजिकशास्त्रात वापरण्यात येते. प्रत्येक क्षेत्रातील व प्रत्येक काळातील नेतृत्वाचे स्वरूप भिन्न असते. पण काही वैशिष्टचे मात्र सर्वत्र सारखीच असल्याचे दिसून येते.

पुढारीपण समूहाचे उद्दिष्ट प्राप्त करण्याकरिता अनुयायी म्हणविल्या जाणाऱ्या लोकांना एकात्मतेने वागण्यास उत्तेजन देणारी ही एक वागण्याची पद्धत आहे. नेतृत्वावर व्यक्तीचे गुण-दोष तिचे स्थान व त्यानुरूप घेतलेली भूमिका यांचा परिणाम होत असला तरी ते सामान्यतः परिस्थितीनिर्मित असते. नेतृत्वाच्या परंपरागत विचारात शूरत्व हे व यासारखे सार्वत्रिक गुणविशेष महत्त्वाचे ठरतात. पण नेतृत्वाचा विचार करताना परिस्थितीचा विचार महत्त्वाचा असतो. सुप्त वास्तविक अशा नेतृत्वातील फरकांचा विचार करावा लागतो. त्याप्रमाणे नेतृत्वाने तंत्र व भूमिका यातील भेद, नेतृत्वाची प्रक्षेपित प्रतिमा व अनुयायाचे स्वभाव आणि प्रतिसाद यांचाही अभ्यास आवश्यक ठरतो. समान हितसंबंध किंवा ध्येय असणाऱ्या समूहाचे व व्यक्तीचे परस्परसंबंध नेतृत्वाद्वारे दिग्दर्शित होतात असे काही लोक

मानतात. नेतृत्वाच्या समाजशास्त्रीय व्याख्येतून सामान्यतः अनुवंशिक हक्क रूढ व साहित्य, कलाही क्षेत्रातील यश यांच्या आधारे अग्रेसर स्थान मिळविणाऱ्या लोकांना वगळण्यात येते. 'मॅकिआव्हेली, कार्लाइल यासारख्या विद्वानांची एकोणीसाव्या शतकात लिहिलेल्या नेतृत्वातील प्रबंधात नेतृत्वाच्या कथित क्षमतेवर व गुणविशेषांवर भर दिलेला आढळतो.'[१] पारंपरिक दृष्टिकोनाचा प्रभाव सैनिकी क्षेत्रात अजूनही टिकून असल्याचे दिसते. तथापि, आधुनिक मानसशास्त्रीय व समाजशास्त्रीय अभ्यासात नेतृत्वातील व्यक्तींच्या व परिस्थितीच्या परस्पर संबंधावर भर देण्यात येतो. नेतृत्वाच्या अभ्यासात पुढील गोष्टींची विचार सामान्यपणे करण्यात येतो.

नेता त्याची योग्यता, व्यक्मित्व व अधिकार, अनुयायी, त्यांची योग्यता व अधिकार परिस्थिती, जिच्या संदर्भात नेता व अनुयायी संबंध निर्माण होतात आणि गटाचे उद्दिष्ट व सामूहिक उद्दिष्ट व सामूहिक जीवनाच्या दृष्टीने नेतृत्वाची भूमिका महत्त्वाची असते. समूहात एकजूट राखणे, तो सुस्थिर ठेवणे, समूहाच्या प्रयोजनास पोषक अशी कार्यविभागणी करणे, सर्व व्यक्तीमध्ये सुसंवाद साधणे व सर्वांचे समाधान करणे, त्यांची जबाबदारी नेतृत्वावर असते. समूहावर बिकट प्रसंग आला असता त्यातून निभावून जाण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना आखणे, व्यक्तींना मार्गदर्शन करणे त्यांच्या शक्ती कार्यान्वित करणे, व्यक्तीच्या आकांक्षाच्या समूहाच्या मुलभूत प्रयोजनांशी मेळ घालून समूहाच्या रचनाबंधामध्ये समायोजात्मक परिवर्तन घडवून आणण्यास हातभार लावणे इत्यीदींसाठीही नेतृत्वाची आवश्यकता असते. हीच गोष्ट व्यापक समाजाला लागू आहे. 'रूढी व परंपरा यामुळे काही समाजाची रचना सुबद्ध व सुस्थिर असते. अशा समाजामध्ये व्यवसाय, धार्मिक श्रद्धा व समजुती तसेच आचार नैतिक मूल्ये भाषा इत्यादीबाबत पोट समाज (सब-सोसायटीज) असतात. त्यांचे संबंध सलोख्याचे, परस्परांना हितकारक व एकंदर समाजाच्या एकात्मतेस पोषक राहतील हे पाडण्याचे कार्य समाजात मान्यता पावलेला वर्ग किंवा त्या

वर्गाचे प्रतिनिधी करीत असतात."[२] ज्यावेळी परिस्थितीजन्य कारणांमूळे तसेच समाजातील घटक वा वर्गाच्या बदल्या आकांक्षा आणि वर्तन यामुळे समाजाची पूर्वापार रचना असमाधानकारक ठरू पाहते. त्यावेळी तर लोकांच्या अभिवृत्तीत व वर्तनात बदलत्या परिस्थितीस अनुरूप असे परिवर्तन घडवून समाज अभंग राखण्यासाठी नेतृत्वाची आवश्यकता असते. नेतृत्व म्हणजे समूहास त्यांच्या उद्दिष्टाप्रत व उत्कर्षाप्रत नेणारी त्यासाठी मार्गदर्शन करणारी, मार्गातील अडचणींचे निराकरण करू शकणारी व समूहाकडून योग्य ते कार्य करून घेऊ शकणारी श्रेष्ठ दर्जाची व्यक्ती होय.

अहिल्याबाई होळकर या १८ व्या शतकातील राजकीय, सामाजिक व धार्मिक इतिहासातील कर्तबगार महिला नेतृत्व होते. वास्तविक पाहता अहिल्याबाईंचे कौटुंबिक जीवन अत्यंत दुःखमय होते. पती व सासऱ्याचा मृत्यू झाला. डोळ्यादेखत मुलाचाही मृत्यू झाला व मुलगी सती गेली. त्यांच्या हयातीत वीस स्त्रिया सती गेल्या. परंतु इच्छाशक्ती प्रबळ असेल तर वैयक्तिक दुःखही लोककल्याणाच्या मार्गापासून विचलित करू शकत नाही हे अहिल्याबाईंनी आचरणातून सिद्ध करून दाखविले. त्यांच्या या व्यक्तिमत्त्वाचा परिचय या प्रकरणात आहे. त्या अगोदर होळकर घराण्याच्या उदयाची पार्श्वभूमी पाहणे गरजेचे आहे.

**होळकर घराण्याचा उदय :**

अहिल्याबाई होळकरांच्या नेतृत्वाचा व कार्याचा अभ्यास करण्यापूर्वी त्या ज्या होळकरांच्या घरात सून म्हणून आल्या. ज्या घराण्याने त्यांच्या कार्याला विशाल क्षेत्र निर्माण करून दिले ते होळकर घराणे नावारूपाला कसे आले हे शोधणे अगत्याचे ठरते.

छत्रपती शिवाजी महाराजांना स्वराज्य स्थापनेच्या कार्यात अनेक निष्ठावान सहकाऱ्यांची मदत लाभली. तशीच मदत १८ व्या शतकात शाहू महाराजांना स्वराज्याचा विस्तार करीत असताना लाभली. पहिल्या बाजीरावाच्या काळात मराठा सत्तेचा विस्तार

उत्तर हिंदुस्थानात झाला. बाजीरावाला ज्या कर्तबगार सरदारांची बहुमोल मदत झाली त्यात सुभेदार मल्हारराव होळकरांचा मोठा वाटा आहे. सुभेदार मल्हाररावांचे वंशज प्रथम पुण्याजवळ वाफगावी रहात असून नंतर ते फलटण परगण्यातील होळ या गावी आले 'फलटण परगण्यात पुण्यापासून ४० मैलावर नीरा नदीच्या काठी होळकर म्हणून खेडे आहे तेथे आले त्यांचे पहिले नाव वीरकर असून पुढे होळ या गावावरून होळकर असे नाव पडले'[३] होळ या गावी खंडोजी या नावाचा एक गृहस्थ रहात होता. तो या गावाचा चौघुला ग्रामाधिकारी असून जातीने धनगर होता हा खंडोजी होळकर म्हणजे मल्हाररावाचा पिता होय. 'मल्हारजी होळकरांचा जन्म चैत्र शुद्ध ९ सवंत १७५० इ. स. १६९३ बारा घटकेस बापाचे नाव खंडूजी, आईचे नाव जिवाई ही साबाजी बाबा बारगळ चौघुले मौजे तळोदे परगणे सुलतानपुर खानदेश तिच्या भावाचे नाव भोजराज बारगळ'[४] मल्हारराव तीन वर्षाचा असताना त्याच्या पित्याचे खंडूजीचे निधन झाले. खंडूजीस जिवाई शिवाय इतर बायका असून त्यांना मुले होती. त्या सावत्रभावाकडून मल्हाररावास त्रास होऊ लागल्यामुळे जीवाई खानदेशातील आपला भाऊ भोजराज बारगळाकडे आश्रयास आली. भोजराज बारगळ हा ग्रामाधिकारी असून कदमबांडेच्या पथकात नोकरीस होता त्याने मल्हारजीस मेंढ्या चारण्याचे काम दिले. मल्हारराव होळकर संबंधी एक आख्यायिका होळकरांच्या कैफियतीत दिलेली आहे ती पुढीलप्रमाणे 'दररोज रानात जाऊन मेंढ्या चारून सायंकाळी घरात यावे हा क्रम चालत असत. कोण एके दिवशी अरण्यात दोनप्रहरा झाडाखाली मल्हारजी निद्रीस्त झाल्यावर वारूळातून नाग निघून त्याने मुलावर फणीची छाया केली तितक्यात मातुश्री घराहून भाकरी घेऊन आली तिने पाहिले. भयभीत होऊन परत जाऊन भावास वैगरे वर्तमान कळवून त्यातसुद्धा तेथे आली तो भुजंग सर्वांनी तसाच पाहिला. मनुष्याची भिड नागाचे दृष्टीस पडल्यावर नाग वारूळात गेला नंतर मुलास सावध करून पाहिले असता अन्य विचार दृष्टीस न पडला तेथेच मुलास भोजन घालून घरास घेऊन आले मग ब्राह्मणास एकांती

विचारले, ब्राह्मणाने सांगितले की बाई हा मूळ पृथ्वीपती होईल त्यास दहा वर्षाचा होई तोपर्यंत फार सांभाळावे. त्या दिवसापासोन मामाने रानात जावयाचे मना करून घरचे घोड्यांची देखरेखीचे काम दिले."[५] घोड्यावर बसणे, भाला, तलवार चालविण्याचे शिक्षण दिले. पुढे लवकरच आपल्या पथकात नोकरीस ठेवले व आपली मुलगी गौतमाबाई मल्हारीस देऊन त्यांचे लग्न लावून दिले.

मल्हारजी कदमबांडेच्या नोकरीत होता. १७१८ मध्ये बाळाजी विश्वनाथ उत्तरेच्या मोहिमेवर जात असताना त्यांचा तळ तळेगावी पडला त्यावेळी अशी पद्धत होती की ज्या गावातून सरकारचे  सैन्य जाईल तेथील तरुण मुलांना सैन्यात सामील करून घेतले जाई, त्यानुसार मल्हारजी बाळाजी विश्वनाथाच्या फौजेत आपल्या पथकासह सामील झाला. या मोहिमेचा मल्हाररावास भावी आयुष्यात फारच उपयोग झाला. मल्हाररावांच्या उदयाच्या दृष्टीने दिल्ली मोहीम अतिशय महत्त्वाची ठरली. या मोहिमेतच पेशवा व त्याचा पुत्र बाजीराव यांच्याशी मल्हारजी ओळख झाली आणि त्यांच्यात आत्मीयता निर्माण झाली. बाळापूरच्या युद्धात मल्हाररावाची शूरता पाहून मल्हारराव आपल्या पदरी असावा अशी बाजीरावाची इच्छा होती म्हणून मल्हाररावास ताबडतोब चिमाजी आप्पाच्या पदरी नेमले. 'इ. स. १७२५ मध्ये बाजीरावाने ५०० स्वारांची मनसब त्यास दिली. पूर्वीच त्याने माळव्यात शिरून मुलूख जिंकण्याचा उद्योग सुरू केला असून भोजराज बारगळही त्याबरोबर खपत होता"[६]

पेशव्यांच्या सेवेत गेल्यावर मल्हारजीच्या भाग्योदयास प्रारंभ झाला आणि बाजीरावाने त्याच्या कार्यावर प्रभावित होऊन त्यांच्या सरंजामात वाढ केली. ६ ऑगस्ट १७२७ रोजी पेशव्यांनी मल्हाररावांच्या सरंजामासाठी ४ गुजाराथमध्ये ६ माळव्यात व १ खानदेश असे ११ जिल्ह्याचे उत्पन्न लावून दिले. 'इ. स. १७२८ मध्ये नर्मदेच्या उत्तरेस खानदेशात १२ परगाणे मल्हारजीस मिळाले होते ही संख्या चार वर्षात ९४ पर्यंत गेली.

१७३२ मध्ये संपूर्ण माळवा मराठ्यांच्या ताब्यात आल्यावर पेशव्यांनी मल्हाररावास माळव्यातील ५ महालापैकी दोन महाल दिले आणि त्यास प्रांताचा सुभेदार म्हणून नेमले. या घटनेनंतर माळव्यात होळकर घराण्याची स्वतंत्र प्रतिष्ठापना झाली. याचवेळी मल्हाररावाने आपल्या प्रमाणेच आपल्या कुटुंबाचाही राजकारणाशी संबंध यावा म्हणून पेशव्यांकडून कुटुंबाच्या नावाने 'खाजगी' स्वरूपाची स्वतंत्र जहागीर मागून घेतली. पेशव्यांनीही मल्हाररावाचे कर्तृत्व लक्षात घेता त्याच्या मागणीनुसार मल्हाररावाच्या पत्नीस खाजगीची जहागीर दिली ती याप्रमाणे तुमचे कुटुंब सौ. गौतमाबाईचे नावे इनाम देऊन सनद व कपडे पाठविले आहेत. त्याचे उत्पन्न २९९०१० इतके होते. एवढेच नाही तर खुद्द शाहू महाराजांकडून या खाजगीस मान्यता मिळवून दिली."[७]

संपूर्ण मराठे शाहीत खाजगी उत्पन्नाचा मान फक्त होळकर स्त्रियांनाच होता. इतर जे सरदार होते त्यांना कोणालाही तो मान नव्हता. यावरून बाजीरावाची सर्वात जास्त भिस्त मल्हाररावावर होती हे लक्षात येते. पेशव्यांच्या कुटुंबातील अंतर्गत कलह सोडविण्यासाठी अनेक वेळा मल्हाररावास आमंत्रित केल्याची उदाहरणे आहेत. पेशवे कुटुंबातील लोक मल्हारजीस काका म्हणून संबोधत असत. मल्हाररावास एक मुलगा खंडेराव व दोन मुली होत्या. 'दुर्दैवाने खंडुजी अतिशीय आळशी, सुखासीन व बेजबाबदार वृत्तीचा निघाला त्याने अहिल्याबाईस छळले नाही परंतु तिच्या गुणांची कदर कधी केली नाही.'[८]

### अहिल्याबाई होळकर जन्म व बालपण :

अहिल्याबाईचा जन्म मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील आष्टी तालुक्यातील सीना नदीच्या काठी चौडी नावाच्या गावात झाला. निजामी अंमल असताना चौंडी हे गाव बीड जिल्ह्यात होते. परंतु मराठवाडा महाराष्ट्रात आला तेव्हा चौंडी गावाचा समावेश अहमदनगर जिल्ह्यातील जामखेड तालुक्यात करण्यात आला. चौंडी गावाचे पाटील माणकोजी शिंदे व सुशिलाबाई शिंदे यांच्या पोटी ३१ मे १७२५ मध्ये अहिल्याबाईचा जन्म

झाला. ते जातीने धनगर होते. माणकोजी शिंदे त्यांच्या काही कुळातील पुरूषांना पाटीलकीची वतने होती.

''अहिल्या चरितम' या संस्कृत महाकाव्यात सखाराम शास्त्री भागवत यांनी अहिल्याबाईची जन्म तिथी दिली आहे आणि त्याचबरोबर अहिल्याबाईची कुंडलीही दिलेली आहे. या पुराव्यावरून अहिल्याबाईचा जन्म १७२५ मध्ये झाला. ती कुंडली पुढीलप्रमाणे -

श्री शालिवाहन शके गिर्याब्धिरसभूमिते ।

कल्पिते जेष्ठवद्ये या सप्तम्यामरूणेदये ॥३१॥

लग्ने बुध खौ शुक्रे, गुरौ भाग्ये सकेकि ॥३२॥

अस्मिन्ननुमिते काले माणकोजीवधु शुभा ॥

कन्या प्रासूत रूचिरा सुद्यौ रिन्दुकलामिव ॥३३॥ प्रथम सर्ग




यावरून अहिल्याबाईचा जन्म दिनांक वैशाख कृष्ण सप्तमी, सोमवार ३१ मे सन १७२५ रोजी झाला हे स्पष्ट होते''[१]

अहिल्याबाईच्या आईचे नाव सुशिलाबाई होते ती मोठी ज्ञानी विनयशील, धर्माचरणी आणि कर्तव्यपरायण अशी आदर्श गृहिणी होती. रोजचे धार्मिक नेमधर्म ती नेमाने करीत असे तसेच नित्य नेमाने पूजा-पोथी, कीर्तन, भागवत सप्ताह यांना हजर रहात आणि

गोरगरिबांना, दु:खी कष्टी लोकांना मदत करणे या गोष्टी अत्यंत तत्परतेने करीत असे. अहिल्याबाईच्या जीवनाला आकार देण्याचे कामी तिच्या आईचा वाटा फार मोठा होता. धार्मिक प्रवृत्तीचे आईचे संस्कार लहानपणापासून अहिल्याबाईवर पडले होते. उपवास, पूजा, पोथी, धर्मग्रंथाचे वाचन यांची गोडी तिला लागली होती.

'अहिल्याबाईच्या आई-वडिलासंबंधी त्रोटक माहिती मिळते. अहिल्याबाईस ५ भाऊ व एक बहीण होती. अहिल्याबाईची एक बहीण खान्देशात दिली होती'[१०] मल्हारजी, येसाजी, बाणाजी, विठोजी, सुभानजी अशी अहिल्याबाईच्या भावाची नावे होती. महेश्वर दरबारची बातमीपत्रे यात अहिल्याबाईच्या दोन भावांचे उल्लेख आढळतात. अहिल्याबाईनी त्यांना आपल्या चाकरीस घेतले होते हे दोघे बंधु अहिल्याबाईच्या हयातीत वारले. अशा रीतीने अहिल्याबाईच्या माहेरच्या लोकांचे उल्लेख होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, होळकरशाहीचा इतिहास, होळकरांची कैफियत यांच्यात आढळतात.

### अहिल्याबाई होळकरांचा विवाह :

प्राचीन कालखंडापासून बालविवाहाची पद्धती प्रचलित झालेली होते. मध्ययुगीन कालखंडात तीच प्रथा अस्तित्वात होती. आजही भारतातील बिहार, उत्तर प्रदेश राज्यात बालविवाह होतात ही चिंताजनक बाब आहे. पेशव्यांच्या काळात जुन्या कोणत्याच पद्धतीचा त्याग करण्यात आलेला नव्हता. कारण पेशवे जुने तोडू नये आणि नवीन करू नये या वळणाचे होते. या नियमास त्यांचे सरदारही अपवाद नव्हते. होळकरांच्या कुटुंबात खुद्द मल्हाररावांचा विवाह वयाच्या आठव्या वर्षी झालेला होता. 'खंडेराव होळकरांचा जन्म अश्विन शुद्ध १० सवंत १७८० इ. स. १७२३ लग्न अहिल्याबाई सवंत १७९४ त झाले वधूचे वय ८ वर्षाचे होते'[११] अहिल्याबाईंच्या विवाहासंबंधी अनेक इतिहासकारांनी १७३७ हे साल दिलेले आहे. परंतु होळकरशाहीच्या इतिहासाची साधने खंड १ ला लेख १ ला यातील टिपणीत अहिल्याबाईंचा जन्म इ. स. १७२५ मध्ये झाला असून विवाहाच्या वेळी त्यांचे वय

आठ वर्षांचे होते. असा उल्लेख आहे. त्यामुळे त्यांचा विवाह १७३३ मध्ये झाला असे स्पष्ट होते.

अहिल्याबाई आणि खंडेराव होळकर यांच्या विवाहासंबंधी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. मल्हारराव होळकर मोहीम आटपून परत पुण्यात जात असताना चौंडी या गावी त्यांचा तळ पडला होता. एके दिवशी मल्हारराव आपल्या साथीदारांबरोबर चौंडी येथील एका मंदिरात देवदर्शनाला गेले असता देवाची पूजा-अर्चा करणारी लहानशी अहिल्या मल्हाररावांच्या दृष्टीस पडली. त्या मुलीची धर्मपारायण वृत्ती, सुशील आणि सुंदर आचरण, बोलण्यातील चातुर्य पाहूण मल्हारराव आकृष्ट झाले. तसे पाहिले तर ती मुलगी दिसायला सामान्य होती रंग सावळा होता परंतु चेहऱ्यावर एक प्रकारचे अपूर्व तेज होते. डोळ्यात कमालीची शांतता दिसत होती. मल्हाररावांनी आपल्या पुत्रासाठी अहिल्याबाईची निवड केली. अहिल्याबाई चौंडी येथील माणकोजी पाटील यांची मुलगी होती. मल्हाररावास अपेक्षित असलेला योग जुळून आला. इ.स. १७३३ मध्ये खंडेरावांना विवाह पार पाडला. या विवाहास खुद्द बाजीराव पेशवे हजर होते. त्यांनी या विवाहात मल्हाररावांच्या इतमामास साजेश असा आहेर केला.

### अहिल्याबाईचे शिक्षण :

मध्ययुगीन कालखंडात स्त्रियांना कोणते शिक्षण कशा पद्धतीने दिले जात होते याविषयी कोठेही माहिती उपलब्ध नाही. परंतु राजघराण्यातील बहुतेक स्त्रियांची पत्रे आज मितीस उपलब्ध आहेत. त्यावरून त्या साक्षर होत्या असे आपण म्हणू शकतो. राजघराण्यातील स्त्रियांना लिहिणे वाचणे शिकवले जात असावे. हे पुराव्यावरून सिद्ध होते. अहिल्याबाईसुद्धा विवाह होऊन इंदोर येथे आल्यावर मल्हाररावाने त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था केली असावी असे वाटते. कारण अहिल्याबाईंच्या मोडी हस्ताक्षरातील पत्रे

उपलब्ध आहेत. त्यांचे हस्ताक्षर वळणदार असून त्या मोडीमध्ये लिहित असत, असे संशोधनातून दिसून येते.

'अहिल्याबाईस शिक्षण असे फारसे मिळाले नाही. कारण त्या काळी स्त्रियांनी पुस्तविद्या शिकण्याचा प्रघात नव्हता. कथा पुराणे वगैरे ऐकण्याचा तिला लहानपणापासूनच आवड होती. त्या पुराणांचा अर्थ व त्यातील नीतीतत्वे तिला चांगली समजत असत पुढील आयुष्यात अहिल्याबाईंची परोपकारी वृत्ती धर्मपारायणता व न्यायीपणा हे जे गुण तिच्या कीर्तीला कारण झाले त्याचे खरे बीज तिच्या कथा पुराणे ऐकण्यात आहे.'[१२] अहिल्याबाई होळकरांना इतरही भाषा लिहिता व वाचता येत असल्याचे उल्लेख मिळतात. 'मराठी, संस्कृत, हिंदी त्या चांगल्या प्रकारे लिहू, वाचू व समजू शकत होत्या.'[१३]

**अहिल्याबाई होळकर यांचे मोडी हस्ताक्षर**



## अहिल्याबाई होळकर यांच्या मोडी पत्राचा अनुवाद :

'मसलत सिद्ध झाल्यास घेऊन जाणे प्राप्तच आहे. जाबसालाची तळमळ असता घेऊन गेल्यास.... मुलूक उपद्रव लागेल, या करिता विचार पडतो पर मुलकात गेलीयावर जोपर्यंत निर्वाह चालले तो वर काळ अवघड पडावयाचे नाही. लूट मजा जाल्यावर काही व्यवस्था काढावी लागेल. आज्ञेप्रमाणे देठकरी यांचे जमातदारास अणावयाकरिता कारकून व पाणा पाठविल्या आहेत आले म्हणजे लिहिल्यान्वये गोलण्यात अणुन ठरेल तसे सेवेसी विनंती लिहून पाठवून ती कार्तीक वद्ये सप्तमी सेवंसी श्रुंत होय हे विज्ञापणा पत्रे'[१४]
(अहिल्याबाई होळकर यांचे हस्तक्षर पंत प्रधानास लिहिलेले पत्र इ.स. १७९०-९१)

## अहिल्याबाई होळकर यांचा पुराणिक :

प्राचीन काळापासून राजे राजवाडे आपल्या पदरी पुराणिकांची नेणूक करीत असत. हा पुराणीक एखाद्या कुशल मंत्र्यांप्रमाणेच आपले कार्य करीत असे, 'सम्राट अशोक व हर्षवर्धन या राजांना उपगुप्तादी सारखे उपाध्याय लाभल्यामुळे त्यांना राज्यकारभाराचे उपयुक्त असे ज्ञान मिळाले. मध्ययुगीन कालखंडात देखील ही प्रथा अस्तित्वात होती. पुराणिक आपल्या धन्याला पुराण व इतिहास वाचून दाखवीत असे. कालांतराने राज्यकर्ते आपल्या धार्मिक कार्यासाठी एका मंत्र्याची नियुक्ती करीत, हा मंत्री राजाच्या प्रमुख सल्लागार मंडळात राहत असे.'[१५] त्याच्याप्रमाणे राजघरण्यातील स्त्रियांना पुराण वाचून दाखविण्यासाठी एका पुराणीकाची नेमणूक केली जात असे. अहिल्याबाईच्या पदरीदेखील अंबादास पुराणीक होता. तो त्यांना पुराण वाचून दाखवीत होता. त्याचप्रमाणे तो त्यांचा धार्मिक बाबींचा सल्लागार देखील होता. सरजॉन माल्कम अहिल्याबाईंच्या पुराण श्रवणाबाबत व पुराणिकाबाबत म्हणतात, 'अहिल्याबाईंना पुराण ऐकण्याची गोडी असल्याने अंगी लौकरच बहुश्रुतपणा व चतुरता आली. चांगल्या लिहिण्यातील वर्मे कळू लागली, स्वतः ही मोठे मार्मिक व खोबदार लिहित असत. बाईंची पारमार्थिक बाजू पाहिली असता

कात्यायनाची आठवण येते. ज्या पुराणिकाकडून त्यांनी पुराण श्रवण केले व गुरू मंत्र घेतला त्याचे नाव अंबादास असे आहे, याचे उपनाव वाचे हे देशस्थ यजुर्वेही ब्राह्मण, मूळचे राहणारे खानदेश कडील.''[१६]

माल्कम साहेबांच्या वरील उताऱ्यावरून हे स्पष्ट होते की, अहिल्याबाईंनी अंबादास या पुराणिकाकडून गुरूमंत्र घेतला होता व तो खानदेशातील राहणारा होता. अहिल्याबाई या मुळातच हुशार व विद्वान होत्या. तेव्हा त्यांनी विद्वानांची नेमणूक केली असावी. अहिल्याबाई होळकरांनी पुराणिकाला गाव इनाम दिल्याची नोंद संशोधनअंती दिसून येते. 'अंबादास पुराणिक पुणतांबेकर यास मौजे बालमटाकळी परगणे मजकूर हा गाव होळकर सरदाराकडून संसार बेगमीस धार्मार्थ दिला.''[१७]

## अहिल्याबाई होळकर यांचा ग्रंथसंग्रह :

मानवी जीवनातील आचार विचाराचे महत्त्व समजून घेण्याचे साधन म्हणजे ग्रंथसंग्रह होय. अहिल्याबाईंनी आपल्या जीवनात धर्माची त्यातील विचारांची, धर्मातील विवेक, मानवी जीवनातील खरा धर्म कोणता त्यातील कार्याची अचरणातून महत्त्व पटवून दिले असे संशोधनातून दिसते. त्यांच्या जीवनावर झालेले दुर्दैवी आघात त्यासाठी त्यांना धर्मग्रंथातून त्यांच्या श्रवणातून पारमार्थिक बळ मिळाले.

अहिल्याबाई होळकरांच्या काळी मुद्रण कला अस्तित्वात नव्हती. त्यामुळे हस्तलिखित ग्रंथ मौल्यवान व दूर्मिळ होते. असे ग्रंथ बहुधा शास्त्री, पंडित, पुराणिक ब्राह्मण, विद्वानांजवळ असायचे. त्यानंतर घरंदाज, श्रीमंत, सरदार, जहगीरदार, राजेराजवाडे यांच्याकडे असायचे शाहू महाजारांचे आसन साताऱ्यास स्थिर झाल्यावर त्यांनी ग्रंथ संग्रह सुरू केला होता तर पेशव्यांनी पुण्याला पुस्तक शाळा चालू केली होती. पुस्तके दुर्मिळ असल्या कारणाने परत करण्याच्या अटीवर नकलेसाठी मिळत असत. नक्कल करण्यास बराच कालावधी लागायचा त्यामुळे नक्कल झालेल्या पुस्तकाची पाने परत केल्यावरच मूळ

मालक त्याला पुढील भाग देत असे, अशा या काळात व परिस्थितीत अहिल्याबाई होळकरांनी नक्कल बाळगून संग्रह केला. याचबरोबर त्यांनी ग्रंथाचे दानदेखील केले व सुंदर हस्ताक्षर करणाऱ्या कलाकारांना त्यांना उद्योग व राजाश्रय मिळवून दिला.

अहिल्याबाईंकडे मोठ्या प्रमाणात ग्रंथ संग्रह होता हे होळकरशाहीच्या इतिहासावरून स्पष्ट होते. त्यांच्याकडे असलेला ग्रंथ संग्रह पुढीलप्रमाणे :

| | |
|---|---|
| 'श्री हरी अभ्यास १८ | गीत गोविंद सटीक |
| मुहूर्त चिंतामणी | नेमी शारण्य महात्म |
| महाराष्ट्र विराट पर्व | जन्माष्टमी पूजा |
| मथुरा महात्म | व्रतार्थ पत्रे |
| आश्रमवास पत्रे | स्वर्गारोहरण |
| वनपर्व लहान सांचा | समापर्व लतानसांचा |
| उद्योग पर्व लहान साचा | विराटपर्व लहान सांचा |
| द्रोणपर्व | भिष्मपर्व |
| निर्णय सिंधु पोथी | चित्रसृष्टी मीमांसा |
| रुक्मिणी स्वयंवर | काव्यकुंज महात्म्य |
| भगवतगिता पंचरत्नी | व्यंकटेश स्त्रोत्रवही |
| ज्ञानेश्वर नमन | जंबुमार्ग प्रस्ताव |
| श्री देवीची मानसपूजा | पुष्कर महात्म्य |
| श्री भगवद् गीता | आध्यात्म रामायण सप्तकांड |
| महा प्रस्थान पत्रे | वैदांची पोथी |
| ज्ञानेश्वरी पोथी | व्यंकटेशस्त्रोत्र पोथी |
| अणुवेदांत | मल्हारीकवच पोथ्या दोन |

| | |
|---|---|
| विष्णुसहस्रनाम | मल्हारी स्तवराज |
| अपमार्जन | नारायण वर्म |
| रूद्रन्यास | श्री चंडिका पूजा विधान |
| भैरव तंत्रोक्त मन्युसुक्त | सिंहस्थ स्नानविधी |
| सर्वसार निधी निर्णय | उत्सर्जन उपाकर्म श्रावणी |
| श्री विष्णु प्रतिष्ठा पद्धती | वापी कुपोत्सर्ग प्रयोग |
| श्रावणी निर्णय | रसमंजरी सटीक |
| संवान्सरी-श्राद्ध | चातुर्मास प्रयोग पत्रे |
| वैद्य निदान | विष्णु सहस्रनाम भाष्य |
| रघुवंश सटीक | वायुस्तुती सटीक |
| यंत्र विभाग | वेदोक्त अन्हिक |
| किरकोळ वेदाक्त सुक्त | दर्शपोर्णिमा पद्धती |
| ग्रहमख | शिक्षा उपनिषत |
| अमरकोश तीन कांडे | पदमपुराणोक्त मल्हारी स्तवराज |
| ब्रम्हंपत्रिका सटिक | पंचकोशी नैमिण्यारण्य महात्म"[१८] |

या प्रमाणे अहिल्याबाईंच्याकडे ग्रंथ संग्रह होता हे स्पष्ट होते. त्याचप्रमाणे त्यांना चांदवडकडून खालीलप्रमाणे पुस्तके पाठवून देण्याबाबत बागकरी महादेव यास पत्र पाठविले होते ते पुढीलप्रमाणे ग्रंथ संग्रह

| | |
|---|---|
| १) श्री भागवत द्वादशकंद, | २) रामायण सप्तकांड वाल्मिकी |
| ३) मयुख | ४) शांतीमयुख |
| ५) समय मयुख दान मयुख | ६) उत्सर्ग मयुख |
| ७) श्राद्धमयुख | ८) प्रायश्चित्त मयुख |

| | |
|---|---|
| ९) उत्सर्ग मयुख | १०) स्मृत्यर्थ सार अर्चा प्रकरण |
| ११) कालमाधव | १२) निर्णय सिंधू मयुरा महात्म |
| १३) कार्तिक महात्म पद्मपुराण | १४) पद्मापुराणोक्त भागवत महात्म्य |
| १५) भारत समग्र पर्व | १६) अर्चदिप |
| १७) हरिवंश | १८) मार्गशिर्ष महात्म |
| १९) सर्वसार तिथी निर्णय ज्योती | २०) कन्यादान विधी |
| २१) यमुना महात्म्य | २२) संवर्तक प्रतित धर्मशास्त्र |
| २३) स्वप्राध्याय | २४) कार्तिक महात्म"[१] |

वरील ग्रंथांचा विचार केला असता अहिल्याबाईंच्याकडे धार्मिक ग्रंथाबरोबरच, राज्यकारभार, प्रशासन आर्थिक व्यवस्था, भौगोलिक परिस्थिती याबाबतचे ग्रंथ असल्याचे संशोधनातून आढळून येते. या ग्रंथांतून प्राचीन समाज व्यवस्थेचा इतिहास समजला. तत्कालीन राज्यकारभार, प्रशासन व्यवस्था, आर्थिक व्यवहार, तत्कालीन राजांनी कशा प्रकारे राज्यकारभार चालविला. प्राचीन आदर्श राज्यपद्धती याचे ज्ञान मिळाले. प्राचीन ग्रंथातील धार्मिक विचार - कार्यपद्धती त्यांनी समजून घेतली असावी. प्राचीन मंदिराचा व तीर्थक्षेत्राचा इतिहास समजला त्यातून मंदिराचा जीर्णोद्धार करणे, पवित्र तीर्थक्षेत्री, नवीन देवालय, घाट, तलाव, कुंड, धर्मशाळा बांधण्याचे कार्य त्यांनी हाती घेतले. अनेक लोकांना त्यांनी मुक्तहस्ताने दानधर्म केला. रामायण, महाराभारत यासारख्या ग्रंथातील कार्यपद्धतीचा त्यांच्यावर प्रभाव पडला. त्यांच्या कार्यपद्धतीला या ग्रंथांतून विचारांची जोड मिळाली या ग्रंथसंपदेतून त्यांनी स्फूर्ती व प्रेरणा मिळून त्यांनी तीस वर्षे लोककल्याणकारी राज्यकारभार केला. तत्कालीन समाजव्यवस्था अनेक रूढी, प्रथा, परंपरा, अत्याचार, बळी तो कानपिळी या मानसिकतेत अस्पृश्यता, स्त्री अस्पृश्यता, धर्माचा द्वेष इत्यादी मानसिकतेतून जात

असतानाही त्यांनी आपली विवेकबुद्धी जागृत ठेवून भारतीय समाज जीवनापुढे एक आदर्श निर्माण केला, असे संशोधनातून दिसून येते.

**खंडेराव होळकरांच्या उपस्त्रिया नाटकशाळा व खांडाराण्या :**

मराठा कालखंडात नाटकशाळा, उपस्त्रिया बाळगण्याची प्रथा अस्तित्त्वात होती. नाटक शाळा मालकाच्या मनोरंजनासाठी असायच्या याशिवाय बहुपत्नीत्वाची प्रथाही रूढ होती. एका पुरुषास मुख्य बायकोशिवाय इतर बायकादेखील असायच्या या रुढीला होळकर घराणेही अपवाद नव्हते. सुभेदार मल्हारराव होळकर यांना तीन लग्नाच्या बायका व एक खांडाराणी होती. 'होळकरशाहीच्या सरकारी दफ्तरात खंडेरावाच्या ३ लग्नाच्या बायका, सात उपस्त्रिया, नाटकशाळा, खांडराण्या व दोन कलावंतीणी अशा बारापैकी अहिल्याबाई खेरीज अकराजणी सती गेल्याचे उल्लेख सापडतात. ते पुढीलप्रमाणे १) पोपाबाई, २) प्रेमकुंवरबाई, ३) गंगाबाई, ४) कुंवरबाई, ५) राजकुवरबाई, ६) रामकुंवरबाई, ७) सुंदरबाई, ८) साहेब, ) कुंवररमजाणी, १०) नारवुबाई दिल्ली'[२०]

अशा अकरा बायका सती गेल्याचे उल्लेख सापडतात. अहिल्याबाई खंडेराव होळकरांच्या उपस्त्रियांना, नाटकशाळांना विरोध केल्याचे उल्लेख सापडत नाहीत. कारण असे असावे की खंडेराव होळकरांच्या नायकीणीमुळे त्यांच्या दर्जात कोणताही बदल घडून येत नव्हता अथवा त्यांचा मान कमी होत नव्हता. त्या काळाच्या रूढी प्रमाणे नवऱ्याला लग्नाच्या व इतर बायका असत. अहिल्याबाई वैवाहिक स्त्रियातही ज्येष्ठ होत्या. त्यामुळे त्यांचा मान कमी होत नव्हता. अहिल्याबाई इतर बायकांशी कधी मत्सराने वागत नसत असे संशोधनातून दिसते.

**अहिल्याबाई व खंडेराव होळकर यांची अपत्ये :**

अहिल्याबाई व खंडेराव यांना दोन अपत्ये होती. मुलगा मालेराव व मुलगी मुक्ता 'मुलगा मालेराव इ.स. १७४५ साली जन्मला त्याचे पाठीवर तीन वर्षांनी कन्या झाली तिचे

नाव मुक्ताबाई.'[२१] पुत्र मालेराव आणि मुलगी मुक्ताबाई या दोन्हीचे विवाह खंडेरावाच्या मृत्यूनंतर झाले. 'मालेराव हा अत्यंत मगरूर चंचल आणि वाया गेलेला मुलगा होता. अहिल्याबाईंना पराकाष्ठेचे दुःख व काळजी वाटत होती. त्याला मार्गी लावण्याचे पुष्कळ प्रयत्न त्यांनी करून पाहिले होते. वेळोवेळी मार्गदर्शनपर पत्र पाठविली परंतु त्याचा काहीही उपयोग झाला नव्हता.'[२२]

**खंडेराव होळकरास मिळालेले मानसन्मान :**

खंडेराव होळकर लहानपणापासूनच मल्हाररावांसोबत मोहिमेवर जात असे. त्यामुळे युद्ध कलेचे शिक्षण त्याला प्रत्यक्ष रणांगणावरच मिळाले. खंडेरावास वयाच्या बाराव्या वर्षी म्हणजे १७३५ मध्ये पेशव्यांकडून इनाम मिळाले. १७३५ मध्ये उत्तरेची मोहीम आटपून मल्हारराव पुण्यास आले, त्यावेळी त्यांच्याबरोबर त्यांचा पुत्र खंडेराव होळकर हादेखील होता. मल्हाररावांच्या पराक्रमावर खूश होऊन पेशवा बाजीरावाने मल्हाररावांच्या पुत्रास पुढीलप्रमाणे इनामे दिली. 'रा. मल्हारजी होळकरांचा पुत्र खंडेराव होळकर सीतालासीन मयाव अल्फ (राजमंडळ पुणे) खंडेराव होळकर यांस जाहागीर मोकासा दिल्याबद्दल पत्रे :

सनद मौजे बोरगाव तालुके पाबळ प्रांत जुन्नर सनद मौजे उदवडी तालुके सांडस प्रांत पुणे येथील मोगलाई बावनी व सरदेशमुखी व सहोत्रा, कुलाबाबात, कुलकानु दरोबस्त साल मजूकर पासोन (१५ ऑगस्ट १५३५).'[२३] वयाच्या १२ व्या वर्षी म्हणजे १७३५ मध्ये खंडेराव सरदेशमुख झाला. १७३६ बाजीरावाने प्रयाग, गया, काशी व मथुरा ही क्षेत्रे बादशहाने मोकळी करावी आणि ती मराठ्यांच्या ताब्यात द्यावी, अशी बादशहास मागणी केली. याबरोबर बाजीरावाच्या इतरही मागण्या होत्या परंतु बादशहाने त्या मंजूर न केल्यामुळे बाजीरावाने उत्तरेची मोहीम हाती घेतली व तो ५० हजार फौजेनीशी उत्तरेकडे निघाला. या स्वारीत मराठ्यांना यश मिळाले.

बाजीरावाच्या उत्तरेच्या मोहिमेत सुभेदार मल्हारराव होळकर वाघ, बुळे या सरदाराखेरीज मल्हाररावाचे मामा भोजराज बारगळ व पुत्र खंडेराव होळकर हेदखील होते. होळकरांनी या स्वारीत बजावलेल्या कामगिरीबाबत पेशव्यांनी 'मल्हारजी होळकर, विठोजी बुळे, संताजी वाघ, भोजराज बारगळ, खंडेराव होळकर यांनी प्रत्येक सोन्याची कडी बक्षीस दिली. (३१ जुलै १७३६) मल्हारजीस ४५ तोळे सोन्याची दोन कडी तर खंडेरावास १८ तोळ्याचे एक कडे पेशव्यांकडून भेट मिळाले होते.'[२४]

मल्हाररावाचा पुत्र खंडेराव शूर, धाडसी होता परंतु दुर्दैवाने तो व्यसनाधीन बनला होता. लहानपणापासून खंडेराव वडिलांबरोबर लढाईवर जात असे, त्यावेळी युद्धकाळ हेच महत्त्वाचे शिक्षण होते. खंडेरावाच्या सभोवताली वाईट लोकांची संगत असे, त्याच्या भोवती स्तुतिपाठकांचा गराडा असायचा. त्याचे राज्यकारभाराकडे लक्ष नसे. खंडेरावाच्या स्वभावाबाबत पुढील उल्लेख मिळतात. 'अहिल्याबाई होळकरांचे घरात आल्यापासून समजू लागल्यावर खंडेराव होळकर यांचे जहाल सरदारी चलन त्यांत घुटी प्राधान्य, खर्च वगैरे अव्यवस्थित, आचारहि सदर्हू अनव्ये यामुळे वृत्तीस उदास राहून सासू सासऱ्याचे सेवेसी तत्पर असून अंबादास पुराणीक याजपासून परम साधनाची काही व्यवस्था ग्रहण करून सासुरवाशी सबब चोरून जपून युक्तीने त्या वस्तूचे दास्य करीत राहिल्या. महिन्यातून दोन वेळा तीन वेळा खंडेराव महाराजांकडील बोलवण्याचा प्रसंग येई ते दिवशी खाशांनी सर्व गोष्टी व्रतस्थ राहावे. प्रहररात्र जाहल्यानंतर बाईसाहेबांनी डेऱ्यात जाऊन सहा घटका रात्र राहतांना निघून यावे अशी रूढ.'[२५]

यावरून अहिल्याबाईंचे संसार सुख कशा प्रकारचे होते हे दिसून येते. खंडेराव व अहिल्याबाई दोघांच्या स्वभावात विचारात व वर्तनात खूपच भिन्नता होती. अहिल्याबाईंना आपल्या पतीच्या स्वभावाची व वर्तनाची पूर्ण कल्पना आलेली होती असे असूनही देखील त्यांनी खंडेरावांचा कधीही अनादर केलेला दिसून येत नाही.

### अहिल्याबाई होळकरांचे राज्यकारभारविषयक शिक्षण :

मल्हारराव होळकरांची पत्नी गौतमाबाई अत्यंत कर्तव्यदक्ष होती. गौतमाबाई स्पष्टवक्ती आणि सत्यभिमानी असल्यामुळे प्रसंगी ती मल्हारजीचीही कानउघडणी करीत असे. राजकारणाची तिला चांगलीच जाण होती. 'खासगी' जहागीर मिळाल्यापासून जहागिरीची व्यवस्था त्याच पहात असत. अहिल्याबाई गौतमाबाईंच्या हाताखाली तयार होत असल्यामुळे त्यांच्यावर गौतमाबाईंचा प्रभाव होता. मुलगा व्यसनी असल्यामुळे मल्हारराव व गौतमाबाई यांचा ओढा आपल्या सुनेकडे अधिक लागला. कारण अहिल्याबाई होळकरांकडे राज्यकारभाराविषयक गुण होते. अहिल्याबाई जात्याच बुद्धीमान, कुशाग्र, संयमी, धर्मपारायण होत्या.

सुभेदार मल्हारराव होळकर जी कामे अहिल्याबाईंवर सोपवी ती सर्व कामे ती फारच चातुर्याने करी त्यामुळे ती लौकरच मल्हारजींच्या कसोटीस उतरली. 'थोरले सुभेदार यांचा अहिल्याबाईंवर पूर्ण लोभ कशीही तबीयत बेज्याह असल्यास बाईसाहेबांचा निरोप गेला असता त्याप्रमाणे व्हावयाचे दौलतीत उत्पन्नविशी सुभेदाराचे प्रारब्ध व पराक्रम, परंतु व्यवस्था करणे नफा नुकसानी पहाणे हे कारभारी याने बाईसाहेबांचे आज्ञेने करीत असावे, असाच ओघ याचप्रमाणे गौतमाबाई साहेबांचा लोभ करणे बाईसाहेबांचे काम करण्याची रीत प्रखर धनीपणाचे वाटे. काही एक न ठेविता कोणतेही काम करणे ते करावे.'[२६]

अशा प्रकारे अहिल्याबाईचे वर्तन व काम इतके चोख होते की, सुभेदार म्हणजे जमदग्नीचा अवतार आणि करारी वृत्तीचा माणूस परंतु त्याची प्रकृती कितीही बेज्याह असली आणि अहिल्याबाईंनी त्यांच्यापुढे प्रकरणांचा सांगोपांग विचार मांडला म्हणजे तो पूर्वपदावर येत असे. त्याचप्रमाणे त्यांना वेळोवेळी पत्रे पाठवून आपल्या सुनेस मार्गदर्शन करीत असे. त्यातून राज्यव्यवहाराचे, रणनीतीचे, युद्धसाहित्याचे प्रजापालन, न्यायदान याविषयी सूचना केल्या. त्यातून अहिल्याबाईचे राजकीय विचार वाढत गेले. वेळेप्रसंगी

मल्हारराव रागवतही असे एकदा अहिल्याबाई मथुरेत एक दोन दिवस अधिक थांबल्या वास्तविक मध्ये कोठेही न थांबता ग्वाहेरला ताबडतोब यावे असा मल्हाररावांचा अहिल्याबााईस आदेश असूनही त्या मथुरेस थांबल्या. हे पाहून मल्हाररावांनी अहिल्याबाईस चांगलीच ताकीद दिले. 'जाते समयी समझ आज्ञा केली असता त्या गोष्टी सर्व एकीकडे ठेवून मथुरेशी मुक्काम केले हे उत्तम नसे आम्ही सांगितले ते न करावे आणि आपल्याच चित्तास येईल, असे करणे असेल सुखरूप तीर्थ करून असणे सांप्रत पत्र लिहिले आहे तरी इतक्यावर पिण्याशीदेखील मथुरेशी न राहता थेर थेर मजला करून चमल उचरून, ग्वाल्हेरीस जाणे.... त्या स्थळी थोर तोफखाना ठेवून त्याचे गोळे व जुंबरियाचे गोळ्यांची तजबीज होईल तितके करावे... तोफखाना थोर ग्वाल्हेरीस ठेवून त्याची महिन्याभराची बेगामी खर्चाची करून देऊन मग पुढे तुम्ही जाणे. चौकी पहारा मार्गाचा जाबता करीत जावा.'[२७] हे पत्र मिळताच अहिल्याबाईने मथुरेहून कूच केले सोबत गाजीउद्दीनचा कबिला होता त्यांना आग्रा येथे सोडले व त्या स्वतः ग्वाल्हेरला रवाना झाल्या. ग्वाल्हेरला जाऊन अहिल्याबाईंनी तोफखाना तयार करावा त्यासाठी लागणारे गोळे व जंबुऱ्यांच्या गोळ्यांची तजविज करावी. तोफखान्याची महिनाभर पुरेल अशी व्यवस्था करावी आणि मग पुढे जावे. जाताना मार्गातील चौकीपहारा, मार्गाचा जाबता करणे अशा सूचना मल्हाररावाने अहिल्याबाईस केल्या होत्या. त्यांच्या सूचनेनुसार अहिल्याबाई सर्व कामे करीत त्यामुळे त्यांना प्रत्यक्ष शिक्षण मिळत गेले.

१७६५ मध्ये मल्हारराव होळकर शुजाउद्योला याला इंग्रजांच्या विरोधात मदत करण्यासाठी गेले असता त्यांना युद्धसाहित्य पुरविण्याचे मदत करण्यासाठी गेले असता त्यांना युद्ध साहित्य पुरविण्याचे काम अहिल्याबाई करीत होत्या. दारूगोळा पुरविण्याच्या संदर्भात मल्हाररावाने अहिल्याबाईला पुढीलप्रमाणे सूचना केल्या.

''तुम्हास दरमजल ग्वाल्हेरीस जाण्याविषयी अगोदर पत्रे लिहिली त्याप्रमाणे कूच दरकूच ग्वाल्हेरपर्यंत जाणे आणि तेथे गेलियावरही पाच-सात मुक्काम करून थोरल्या तोफेचे गोळे हजार पाचशे पावेतो व जंबुरियाचा गोळे होतील तितके जरूर करवावे याशिवाय जंबुरेही शंभर पावेतो कारखाना लावून तयार करवावे. बाणाच्या पातिका शेरे दारू मावे ऐसी पातिका उत्तम निवडक पाहूण ज्या मिळतील त्या घेणे येविषयी हयगय नसावी. जातेसमयी तुम्हांस जंबुरीया करीता सांगितले आहे. त्याप्रमाणे गोळ्याचा सल्ला करून जंबुरे करविणे ग्वाल्हेरी पलिकडे तुम्ही जाल, तेव्हा तोफखान्याचे खर्चाची बेगामी एक महिन्याची करून मग पुढे तुम्ही जाणे.''[२८] तोफा पाठविताना काय दक्षता घेतली पाहिजे याबद्दल मल्हाररावाने अहिल्याबाईस कळविले होते.

अशा प्रकारे मल्हारराव युद्ध मोहिमांवर असताना युद्धाची सविस्तर माहिती अहिल्याबाईस कळवीत असे. बऱ्याच वेळी युद्धाच्या वेळी अहिल्याबाई मल्हाररावांबरोबर जात. त्यामुळे त्यांना प्रत्यक्ष युद्धाचा रणभूमीचा अनुभव प्राप्त झाला होता. त्याचा उपयोग त्यांना त्यांच्या पुढील आयुष्यात झाला. १७६१ मध्ये गौतमाबाईचा मृत्यू झाल्यानंतर खासगीचा कारभार मल्हाररावाने आपल्या इतर दोन पत्नी असतानाही अहिल्याबाईकडे सोपविला होता. आपल्या मक्तेदारांना खासगीचा ऐवज अहिल्याबाईकडे जमा करण्यास सांगितला होता. 'राजश्री नारो बाळाजी यासी की मौजे लिंबगाव तालुका काल्हेर मक्ता करून दिला. त्याचा ऐवज इसनेसीतेला सालचा २१. २४७५-२.० प्रमाणे २१-१४८५०-१२-० पैकी वसूल खासगीकडे रूजी रुपये ९२०० बाकी ५६५०-१२-० ऐन बाळी ८१४-४-० व्याजाबद्दल एकूण ६४६५ एकूण सहा हजार चारशे पासष्ट रुपये खासगीकडे ठेविले आहेत तर सदर्हु ऐवज चिरंजीव अहिल्याबाई जमा करतील. चिरंजीव अहिल्याबाई याजकडे ऐवज जमा करविला.

८६३६-१०- महादजी रंगनाथ पिंपळसकर कडील

६४६५-०० - नारो बालाजी व्याजसुद्धा

१५१०१-१० - ० (१० ऑगस्ट १७६२).[२९]

मल्हारराव व खंडेराव बहुधा लढाईच्या कामात गुंतलेल्या असल्याने राज्याचा संपूर्ण भार अहिल्याबाईवर असे आणि ती तो यशस्वीपणे करीत असे. मल्हारराव मोठ्या विश्वासाने जबाबदारीचे कामे त्यांच्यावर टाकीत असत. ही कामे करीत असतानाच अहिल्याबाईंना प्रशासकीय शिक्षण मिळत गेले हे संशोधनातून स्पष्ट होते.

राजकीय आणि युद्धविषयक कामानिमित्ताने मल्हारराव आपल्या जहागिरीत व बाहेरील प्रदेशात जावे लागे. मल्हाररावांच्या आदेशाप्रमाणे अहिल्याबाईला कित्येक ठिकाणी जातीने जाऊन आवश्यक कामे उरकावी लागत होती. बऱ्याच वेळा त्या तीर्थयात्रेलाही जात. अशा रीतीने देशपर्यटन केल्याने त्यांना देशातील अनेक ठिकाणांचे रीतिरिवाज पाहावयास मिळून भूगोलाचेही ज्ञान झाले. 'एकदा पेशव्याचे एक पाहुणे त्यांच्याकडे इंदूरास आले. त्यांना काशीला जावयाचे होते. रस्ता त्यांना माहीत नव्हता. याबाबत त्यांना मार्गदर्शन करावे अशी विनंती पेशव्यांनी अहिल्याबाईस पत्र लिहून केली होती. ते पत्र मिळताच त्याच रात्री अहिल्याबाईंनी पाहुण्यांच्या काशी यात्रेची पूर्ण तयारी केली. इंदूरहून निघाल्यापासून काशीला पोहोचेपर्यंत वाटेत लागणारे गावे, नद्या, घाट, वगैरे सर्व बारकि तपशीलाचा एक नकाशाच त्यांनी स्वतः तयार केला आणि त्या बरोबरच वाटेवर ठिकठिकाणी असलेल्या आपल्या अधिकाऱ्यांना पत्राद्वारे जरूर ते हुकूम पाठवून त्या पाहुण्यांची सर्व सोय करून दिली.'[३०]

आपल्या पराक्रमी, शूर, विचारी सासऱ्याच्या सुयोग्य मार्गदर्शनाखाली राज्यकारभाराची धुरा अहिल्याबाईंनी इतक्या उत्तम प्रकारे सांभाळली की अत्यंत महत्त्वाचा राजाज्ञा आणि राजकीय पत्रे अहिल्याबाईंच्या नावे प्रस्तुत केली जात मल्हारराव सतत मोहिमांवर रहात असल्यामुळे अहिल्याबाईच करवसुली, न्यायदान, राज्यकारभार,

मल्हाररावांना जरुरीप्रमाणे पैसे पुरविणे, सैन्याची कुमक करणे, दारूगोळा पुरविणे, सनद पोहोचविणे इत्यादी कामे चोख रीतीने करीत  अशा प्रकारची राज्यकारभारविषयक व प्रशासनविषयक शिक्षण त्यांना सासरे मल्हाररावांच्या हाताखाली मिळाले असे संशोधनाअंती दिसून येते.

## कुंभेरीचा रणसंग्राम आणि खंडेराव होळकरांचा मृत्यू :

१७५४ मध्ये सफदरजंग वजीर आणि बादशहा यांच्यातील संघर्षात सुरजमल जाटाने बाजीरावाचा पक्ष घेतला आणि दिल्ली लुटली म्हणून बादशहाने मल्हाररावास आपल्या मदतीसाठी बोलाविले. सूरजमल जाट सैन्य व द्रव्य या दोनही दृष्टीने प्रबळ होता म्हणून राघोबा पेशव्याने जाटाकडे १ कोटी रुपयाची खंडणी मागितली परंतु जाटाने उलट पाच बंदुकीच्या गोळ्या व चाळीस रुपये घ्यायचे नसतील तर युद्धास तयार व्हावे असा निरोप पाठविला त्यामुळे रघुनाथरावाने चिडून मल्हाररावांच्या मदतीने कुंभेरीस मोर्चे लावले त्या वेढ्यात खंडेराव आपल्या परिवारासह हजर होता.

कुंभेरीला मराठे व जाट यांच्यात तुंबळ युद्ध सुरू झाले. हे युद्ध दीड महिना चालू होते. कुंबेरीस मोर्चे लावण्याची जबाबदारी प्रामुख्याने खंडेरावावर होती. '२४ मार्च १७५४ रोजी खंडेराव होळकर पालखीत बसून खंदक निरीक्षण करीत असताना किल्ल्यातून एकाकी तोफांचा मारा सुरू झाला खंडेरावास जांबोऱ्याची एक गोळी लागली आणि खंडेराव होळकराचा मृत्यू झाला.'[३१] हे वर्तमान्य मल्हाररावास कळताच ते घाबरले. पुत्र शोकाने त्यांचा धीर खचून गेला. परंतु मराठा फौजेतील लहान मोठ्या सर्व सरदारांनी मल्हाररावाचे सात्वंन केले.

## मल्हारराव होळकरांची प्रतिज्ञा :

खंडेरावाची उत्तरक्रिया मथुरेत झाली. उत्तरक्रियेसाठी पेशव्यांनी १० व मल्हाररावाने २५ हजार रुपये खर्च केला . मोठ्या प्रमाणात दानधर्म केला. तत्कालीन कालखंडात अशी

प्रथा होती की, व्यक्ती आजारी असली अथवा त्या मृत्यू झाला असता मोठ्या प्रमाणात दानधर्म केला जाई. त्याप्रमाणे मल्हाररावानेही आपल्या मुलाच्या मृत्यूनंतर केला. कुंभेरीस छत्री बांधण्याचे काम सुरू केले पुढे या छत्रीत अहिल्याबाईंनी खंडेरावाच्या मूर्तीची स्थापना केली. याशिवाय इंदोरला अहिल्याबाईंनी छत्री बागेत खंडेराव होळकरांची छत्री बांधली. खंडेरावच्या मृत्यूनंतर १३ दिवसांचे क्रिया कर्म संपल्यानंतर मल्हाररावाने एक प्रतिज्ञा केली की, 'सूरजमल जाटाचा शिरच्छेद करून कुंभेरीची माती यमुनेत टाकीन तरच जन्मास आल्याचे सार्थक नाही तर प्राणत्याग करीन.'[३२] परंतु ही प्रतिज्ञा पूर्ण झाली नाही. पेशव्यांनी मध्यस्थी करून मल्हाररावांस शांत केले.

## अहिल्याबाईस मल्हाररावाने सती जाण्यापासून परावृत्त केले :

कुंभेरीच्या रणसंग्रामात खंडेराव होळकरांचा मृत्यू झाला. त्यावेळी अहिल्याबाईंचे वय २९ वर्षे होते. खंडेराव होळकरांच्या मृत्यूमुळे अहिल्याबाईंवर वैधव्याची कुऱ्हाड कोसळली. खंडेरावाच्या मृत्यूचा आघात त्या सहन करू शकल्या नाहीत. त्यामुळे तत्कालीन प्रथेनुसार अहिल्याबाईंनी पतीबरोबर सती जाण्याचे ठरविले. त्या कालखंडात पतीच्या निधनानंतर सहगमनाची प्रथा प्रचलित होती. स्त्री सती जाणे परंपरेला अनुरून आहे, असे मानले जात. खंडेरावाच्या मृत्यूने मल्हारराव होळकर अधीच खचलेले. त्यातच अहिल्याबाईंनी त्यांना सती जाण्याविषयी परवानगी मागितली. या कल्पनेने मल्हाररावस अतीव दुःख झाले. मल्हाररावांची संपूर्ण भिस्त अहिल्याबाईवर होती. पुत्र मालेराव १० वर्षांचा होता. मल्हारराव होळकरांनी अहिल्याबाईस विनवणी केली. त्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतो, 'खंडेराव होळकर सुभेदाराचे चिरंजीव कुंभेरीस कामास आले ते समयी बाईसाहेबांचा आग्रह सहगमनाचा तेव्हा मल्हारजी होळकर यांनी पोटात डोकी घातली बोलले की बाई मला उन्हाळा करित्येस की काय? तर तू माझे पाठीवर आहेस तर अहल्या मेली खंडू आहें हा मला भरवसा.'[३३]

सुभेदार मल्हाररावांनी अहिल्याबाईस तूच माझा पुत्र आहे. अहिल्या मेली व खंडू जिवंत आहे. तूच माझा आधार तुलाच मी खंडू समजेन. तूच माझा आधार. राज्याची जबाबदारी खंडू असतानाही तुझीच होती. मला उन्हाळा करू नकोस अशा कितीतरी गोष्टी मल्हाररावाने आपले दुःख बाजूला ठेवून अहिल्याबाईस सांगितल्या. मल्हाररावांची ती अवस्था पाहून राज्यकारभाराचा विचार करून अहिल्याबाईंनी ती अवस्था वाहून राज्यकारभराचा विचार करून अहिल्याबाईंनी सहगमनाचा विचार सोडून दिला. वास्तविक पाहता तत्कालीन सती प्रथेला विरोध करून मल्हारराव होळखरांनी हा विचार मांडला हा विचार पुरोगामी होता. अहिल्याबाईनीही हा आदर्श सर्व स्त्रियांपुढे ठेवला. १८ व्या शतकातील समाजव्यवस्था अस्पृश्यता, स्त्री अस्पृश्यता यांनी ग्रासली होती. स्त्रीला गौण स्थान दिले जाई. यामुळे मल्हारराव व अहिल्याबाई यांचा हा विचार तत्कालीन प्रथेला दिशा देणारा होता. असे चिकित्सक वृत्तीने पाहिले असता दिसून येते. अहिल्याबाई जर सती गेल्या असत्या तर त्यांचे नाव सत्यशील रमाबाई त्यांची मुलगी मुक्ताबाई यांच्या मालिकेत आले असते. त्यांना लोकांनी साध्वी म्हणून ओळखले असते परंतु सती न गेल्यामुळे त्यांनी होळकर संस्थानातीलच प्रजेसाठी नव्हे तर संपूर्ण भारतातील लोकांसाठी, कल्याणकारी कार्य करून दाखविले.

तत्कालीन कालखंडाची आजच्या विसाव्या शतकातील समाज व्यवस्थेची तुलना करता अनेक सासू, सासरे, नवरे, हुंड्यांसाठी व इतर कारणांसाठी सूनेचा छळ करतात. त्यामुळे भारतातील वर्तमानपत्रात दरोज बातम्या येतात की सासू-सासऱ्याकडून सुनेचा छळ केला. स्त्रीला गौण स्थान दिले जाते परंतु मल्हारराव होळकरांनी १८ व्या शतकात आपल्या सुनेलाच मुलगा मानून त्यांना राज्यकारभाराचे शिक्षण दिले. मुलाप्रमाणेच सुनेवर प्रेम केले हा विचार तत्कालीन व आजच्या समाज व्यवस्थेला आदर्श देणारा आहे, असे संशोधनातून स्पष्ट होते.

## सुभेदार मल्हारराव होळकरांच्या कारकिर्दीचा शेवट :

१७६१ मध्ये पानिपतच्या युद्धाचे अपयश व हानी भरून काढण्यासाठी पेशव्यांनी उत्तरेच्या मोहिमेची आखणी केली. या मोहिमेत रघुनाथराव पेशवे व मल्हारराव होळकर हे होते. मल्हाररावाच्या मनात आपला पुत्र खंडेराव सुरजमल जाटाकडून मारला गेल्याचे दुःख होते म्हणून त्यांना सूरजमल जाटाचा बदला घेऊन आपली प्रतीज्ञा पूर्ण करावयाची होती. परंतु वाटेतच ग्वाल्हेरजवळ त्यांची प्रकृती बिघडली त्यामुळे मल्हारराव आलमपूर येथे गेले व आलमपूर येथे आल्यावर २० मे १७६६ रोजी मल्हारराव होळकरांचा मृत्यू झाला. हे पुढे दिलेल्या उल्लेखावरून स्पष्ट होते. 'अलंपूर प्रांत झासी या मुक्कामास आल्यावर श्रीमंत सुभेदार बहुतच काहली झाले दैवी मानवी उपाय करून अनुष्टान दानधर्म बहुत काही केले. आयुमर्याद करून गुणास न येता शेवटी भूमीवर उथरले. उपरातीक दुसरे रोजी वैशाख शं. ११ मंगळवारी पावने दोन प्रहर दिवस येताच देवाज्ञा झाली.'[३४] त्यांच्या मृत्यूनंतर कारभार त्यांचा नातू व अहिल्याबाईचा पुत्र मालेराव याच्याकडे आला परंतु मालेरावाला राज्यकारभार चालविण्याबद्दल मल्हाररावांना साशंका होती म्हणूनच मालेरावांचा हात आपला नातलग आणि आपल्या कर्तबगारीने मल्हाररावांचा विश्वास व प्रेम संपादन करणाऱ्या तुकोजी होळकरांच्या हाती दिला. तुकोजीनी मुलखगिरी करावी आणि कारभार अहिल्याबाईने करावा असे ठरले. याबाबतचे महादजी शिंदेंचे पत्र अतिशय बोलके आहे ते लिहितात. 'होळकरांच्या घराची चाल सर्वत्र माहितीच आहे. कै. सुभेदार असता गौतमाबाई कारभार करीत होती. ती वारल्यावर पुढे अहिल्याबाई करू लागली. ती चाल त्यांचे घरची पहिल्यापासोन आहे नवी नाही.'[३५]

## अहिल्याबाईंचा मुलगा मालेराव वारसदार त्यांच्या अल्प कारकिर्दीचा शेवट :

मल्हाररावांच्या मृत्यूनंतर खंडेरावांचा मुलगा मालेराव यांच्या हाती इंदोरचा राज्यकारभार आला परंतु मालेराव व्यसनी, दूराचारी होता. पेशव्यांनी मालेरावास

सुभेदारीची वस्त्रे दिली त्याचे उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतात. 'मालेराव होळकर ह्यांचे नावे सनद की तुम्हावर सर्व प्रकारे कृपा असे तर कैलासवासी मल्हारजी होळकर याप्रमाणे सरंजाम महाल गाव खेडी, सुदामत प्रमाणे सरहूकूम सरदारीचा बंदोबस्त करून सरंजामानीशी सेवा एकनिष्ठपणे करीत जाणे'[३६] २३ ऑगस्ट १७६६ रोजी मालेरावास सुभेदारीची वस्त्रे मिळाली त्याचवेळी त्याच आशयाचे पत्र पेशव्यांनी अहिल्याबाई होळकरांना पाठविले होते. ते पुढीलप्रमाणे 'सविस्तर गंगाधर यशवंत सांगतील त्याप्रमाणे तजवीज करून आपला सर्व बंदोबस्त महाल गाव खेडी याचा यथा पूर्ण करणे.'[३७]

पेशव्यानी मालेरावास सुभेदारीची वस्त्रे दिली परंतु राज्यकारभार अहिल्याबाई पहात होत्या. पेशव्यांच्या आदेशानुसार अहिल्याबाईंनी मालेरावास फौज देऊन जवाहरलाल जाटाच्या मोहिमेवर पाठविले. जवाहरलाल जाटाने गतवर्षाची खंडणी मान्य केल्याने मालेराव या मोहिमेहून इंदोरला परत आला. त्यानंतर मालेरावाची प्रकृती बिघडली त्याचे कारण असे की 'एका शिंप्याचा मालेरावाच्या दासीबरोबर अनैतिक संबंध असल्याचा त्याला संशय आला. त्यामुळे मालेरावाने शिंप्याला मारून टाकले. पुढे चौकशीत तो निरपराध असल्याचे सिद्ध झाले. त्यामुळे मनुष्य वधाचा गुन्हा आपल्या हातून घडला याचा मालेरावाच्या मनावर विपरित परिणाम झाला. पाश्चातापामुळे व मनाच्या कमकुवतपणामुळे तो मनोरुग्ण झाला. २७ मार्च १७६७ रोजी मालेरावाचे निधन झाले.'[३८]

## अहिल्याबाई होळकर विरोधी दिवाण गंगाधरपंत चंद्रचुडाचे कारस्थान (१७६७) :

मल्हारराव होळकरांनी होळकरशाहीची स्थापना केली. मल्हाररावाचा पुत्र खंडेराव हे कुंभेरीच्या रणसंग्रामात १४ मार्च १७५४ रोजी मारले गेले. त्यांचा पुत्र मालेराव हा २३ ऑगस्ट १७६६ ते २७ मार्च १७६७ पर्यंत गादीवर होता. मालेराव हा होळकर घराण्यातील शेवटचा वंशज निपुत्रीक अवस्थेत मरण पावला. त्यामुळे होळकरांच्या गादीला वारस उरला

नाही. अहिल्याबाई या सुरुवातीपासूनच राज्यकारभार पहात होत्या परंतु त्या मात्र रूढी, परंपरेनुसार गादीवर बसू शकत नव्हत्या. त्यांची मुलगी सौ. मुक्ताबाई फणसे ही एकमेव वारस होती. परंतु ती देखील गादीवर बसू शकत नव्हती. अशा परिस्थितीत होळकरशाहीला एकही वारस उरला नव्हता. यामुळे गादीच्या वारसाच्या गोंधळाचा फायदा घेण्याचा त्यांच्याच सेवेत असलेल्या दिवाण गंगाधर चंद्रचूड याने मनोमन मनसुब रचला.

पुत्र मालेराव वारल्यामुळे अहिल्याबाई होळकर या शोकमग्न होत्या. होळकरांजवळ प्रचंड द्रव्य होते. द्रव्याच्या लालसेने चंद्रचुडाची मती फिरली एकतर राघोबा दादांच्या सल्ल्याने अहिल्याबाईस घरी बसवावे अथवा एखादा अज्ञान दत्तक घ्यावा व आपण राज्यकारभार चालवावा या हेतूने प्रेरित होऊन त्याने राघोबा दादांशी संधान साधले व त्यांना निरोप पाठविला, 'दादासाहेबास प्रेष पाठविला की ही दौलत बैतलमाल जाली... तो वझी आपण दरमजल येऊन दौलत समेटावी'[३९] गंगाधर चंद्रचूडाच्या या कारस्थानाचा सुगावा शिवाजी गोपाल, राजाराम रणसोड निसबत, रावजी महादेव फडणीस या कारभारी लोकांना लागला. परंतु अहिल्याबाईंना सांगण्याची आमच्यात योग्यता नाही म्हणून त्यांनी हरकूहाई (मल्हाररावांची खांडाराणी) व उदाबाई वाघमारे (मल्हाररावांची कन्या) यांना सांगितला व उपाययोजना सूचविली. हरकूबाई व उदाबाई यांनी अहिल्याबाईंना संपूर्ण वृत्तांत सांगितला. वृतांत समजल्यावर अहिल्याबाईंनी आपल्या कारभाऱ्यांना बोलावून दुःख व चिंता काहीही न दर्शवता सांगितले की, 'मेल्या ब्राह्मणाने (गंगाधर चंद्रचुडाने) हरामखोरी आरंभिली आहे परंतु मी बायको (बाईमाणूस) असे मानू नका खांद्यावर बासडा टाकून उभी राहीन तेव्हा श्रीमंताच्या दौलतीस अवघड पडेल... ब्राह्मण म्हणतील दौलतीचा अभिलास करू तर ते होणार नाही.''[४०]

अहिल्याबाईंना हा मनसुबा कळल्यानंतर त्यांना अतिशय राग आला व त्यांनी हे कारस्थान हानून पाडण्याचा निश्चिय केला व तशा सूचना आपल्या कारभाऱ्यांना देऊन

भोसले, गायकवाड, शिंदे, दाभाडे यांना व पेशव्यांच्या मोहिमेवर असलेल्या तुकोजीस बोलविले तसेच माधवराव पेशव्यांकडे दादाजी वाघलीकर यांस पाठवून त्यांच्या नजरेत दादासाहेबांचा अत्याचार आणून दिला. माधवराव पेशव्यांनी निरोप पाठविला 'तुमचे दौलतीविषयी जो पापबुद्धी ठेवील त्याचे पारिपत्य बेलाशक करावे'[४१] असे सांगून तुकोजीच्या नावाने सरदारकीची वस्त्रे वा अहिल्याबाईच्या नावाने खासगी जहागीरीची सनद पाठविली. 'महेश्वर वगैरे जागा खासगीची होळकरांचे कुटुंबास इनाम जहागीर दिलेली असल्याने तुमचा पूर्ण हक्क आहे म्हणून दादासाहेबांस निक्षून ताकीद झाली आहे व तुकोजी होळकर यांचे नावे सनद व कपडे तयार होऊन येत आहे. आता काडीमात्राचा अंदेशा न धरिता सुरक्षितपणे चालवत आल्याप्रमाणे चालविले जाईल.'[४२] अशा रितीने माधवराव पेशव्यांनी खासगी जहागिरीचा अधिकार अहिल्याबाईकडे व लष्करी व्यवस्था तुकोजी होळकरांकडे सोपविली ही व्यवस्था शेवटपर्यंत म्हणजे अहिल्याबाईच्या मृत्यूपर्यंत चालू होती. अहिल्याबाईचा निरोप पोहचताच तुकोजीराव होळकर जलदगतीने येऊन दाखल झाले. इतर सरदारांचे जाब आले की 'मल्हारजी होळकरांचा उपकार नाही असे कोण आहे? प्रसंगास आपले जवळच समजावे'[४३] राघोबा दादानी महादजीस चालून जाण्यास सांगितले त्यांनीही स्पष्ट मत दिले की आमच्याकडून साह्य होणार नाही. तुकोजी होळकर येण्यापूर्वी अहिल्याबाईंनी राघोबा दादांना निरोप पाठविला की आपण स्त्री बरोबर युद्ध करू नये, नाही तर तुमच्या नावास कलंक लागेल, तो कशानेही निघणार नाही, मी तर बोलून चालून स्त्रीच, माझा जर युद्धात पराभव झाला तर मला कोणीही नावे ठेवणार नाहीत पण जर यदा कदाचित युद्धात तुमचा पराभव झाला तर सर्व जगात तुमचे हसे मात्र होईल म्हणून लढाईच्या भरीस न पडाल तर बरे कारण ते तुम्हास आमचे त्यात काही एक नुकसान नाही.

अहिल्याबाई होळकरांच्या या निरोपाचा मसुदा अत्यंत मार्मिक मुत्सद्दीपणाचा व दूरदर्शीपणाचा आहे, राघोबा दादांना हा निरोप पोहोचताच ते विचारात पडले याशिवाय

शिंदे व इतर सरदारांनी देखील अहिल्याबाईंशी युध्दाचे कामी सहाय्य होणार नाही असे स्पष्ट सांगितले. या विश्लेषणावरुन लक्षात येते की अहिल्याबाईंना इतर सरदारही मानीत होते. तुकोजी होळकर निरोपाप्रमाणे महेश्वरी दाखल झाले होते. अहिल्याबाईंनी त्यांस सैन्य देवून रवाना केले. सिप्रानदीच्या एका बाजूला तुकोजी आपले सैन्य घेवून तर दुसऱ्या तीरावर राघोबा दादांचे ५० हजार सैन्य ठाण मांडून बसले होते.राघोबादादांच्या सैन्याने शिप्रेत प्रवेश केला तेव्हा तुकोजीने दादासाहेबास निरोप पाठविला की 'सिप्रा उतराल तर तुमची आमची तलवार चालेल याचा विचार करुन पाउुल टाकणे.'[४४]

तुकोजीच्या निरोपाने दादासाहेब विचारात पडले, होळकर दुसऱ्यासाठी प्राणांची शिकस्त करणारे, आता तर त्यांच्या घरावरच संकट आले असता ते माघार कसे घेतील तसेच अहिल्याबाई दु:खात असून बाईमाणसावर शस्त्र धरले म्हणून जगांत आपणास तोंड दाखवावयास जागा राहणार नाही. अशा प्रकारचा विचार करुन राघोबा पेशव्यांनी तुकोजीकडे कारकूनाकडून निरोप पाठविला 'मालेराव बाबा वारले यास्तव आम्ही मातंगपोशिास (दुखवटा) येत असता तुमचे बुध्दीस विपर्यास येथून वाकडी गोष्ट सांगावयाचे आणि काय'[४५] त्यावर तुकोजीने कळविले की दुखवटासाठी येत असल्यास फौजेचे कारण नाही, घर आपलेच आहे. पालखीत बसून एकटे यावे त्यानुसार दादासाहेब आपल्या सेवक वर्गाला बरोबर घेवून, महेश्वरास आले. त्याठिकाणी त्यांचा मुक्काम एक महिनाभर होता. अहिल्याबाईंनी मनाचा मोठेपणा दाखवून त्यांच्या पाहूणचारात कोणत्याही प्रकारची उणीव राहू दिली नाही.

अशा पध्दतीने तत्कालीन काळखंडात एका स्त्रीचे ते धाडस होते ते वाखण्याजोगे होते. केवळ मुत्सद्देगिरीने व धैर्याने आपल्या राज्यावर आलेले संकट रक्तपात न करता परतवून लावले. आपल्या मदतीस आलेल्या सरदारांचा वस्त्रे अलंकार देवून सन्मान केला व

कृतज्ञता व्यक्त केली. सूत्रधार गंगाधर यशवंत याचा कोणताही राग न धरता त्याच्या मुलाला आपल्या पदरी नोकरी घेतले.

### मुलगी मुक्ताबाईचा विवाह व प्रजेचे हित:

अहिल्याबाईंनी राज्यकारभार हाती घेतला. त्यावेळी लोकांचे जीवन अनेक अडीअडचणीनी आणि संकटानी भरलेले होते. राज्यात सर्वत्र चोर व दरोडेखोरांनी धूमाकूळ घातला होता. राज्याच्या उत्तरेकडील भागात दरोडेखोरांनी उच्छाद मांडला होता. महेश्वराजवळ जामघाटाच्या पठारावर गणपतराव मराठा या दरोडेखोराने जबर दहशत बसविली होती. चोर व दरोडेखोरांच्या या धुमाकुळामुळे सर्वत्र अशांतता होती, प्रजा अतिशय कष्टी झालेली होती. त्यांनी प्रजेचे दु:ख दूर करण्याचा खूप प्रयत्न केला. पण समाधानकारक परिणाम दिसू शकला नव्हता. राज्यशासनाचे कोणतेही उपाय होत नाहीत पाहून दरोडेखोरांची हिंमत वाढली होती. ते प्रजेला जास्तच त्रास करु लागले होते शेवटी त्यांनी अचूक उपाय योजला आणि प्रजेला या संकटातून मुक्त केले. अशा प्रकारची आख्ययीका आहे की 'राजधानी महेश्वर येथे एक विशाल दरबार भरविला. या दरबारासाठी त्यांनी राज्यातील सर्व नागरिकांना निमंत्रणे पाठविली. राज्यप्रमुख नागरिक, गावोगावचे प्रमुख लोक, सर्व सरदार मंडळी व सैनिक अधिकारी या दरबारासाठी एकत्र बोलवण्यात आले. चोर दरोडेखोरांनी पसरवलेली दहशत किती भयंकर आहे याचे वर्णन भर दरबारात करुन अहिल्याबाईनी जाहीर केले की माझ्या राज्यातून चोर-दरोडेखोरांचे हे संकट जो वीर दूर करील, त्याच्याशी मी माझी एकुलती मुलगी एक मुलगी मुक्ताबाई हिचा विवाह करुन देईन'[४६] त्यावेळेस एक तरुण उठला तो म्हणाला मी हे काम करीन. या राज्यातून चोर दरोडेखोराचे कायमचे उच्चाटन करीन अशी मी प्रतिज्ञा करतो. परंतु या कामासाठी मला राज्यातून सैन्य आणि पैसा याचे पूर्ण सहकार्य मिळाले पाहिजे.

अहिल्याबाईने ताबडतोब सर्व व्यवस्था करुन दिली. तो वीर तरुण सैन्य बरोबर घेउुन राज्यात सर्वत्र पोचला आणि त्याने अत्यंत निर्दयतेने सर्व चोर-दरोडेखोरांचे पारिपात्य केले. त्या वीराचे नाव यशवंतराव फणसे होते. आपली प्रतिज्ञा पूर्ण करुन यशवंतराव महेश्वरला परतला तेव्हा अहिल्याबाईने आपल्या वचनाप्रमाणे त्याच्याशी मुक्ताबाईचे लग्न लावून दिले.

अशा प्रकारे प्रजेच्या सुखापुढे स्वत:ची सुखे गौण मानणारी अहिल्यादेवी होत्या. प्रजेवरील संकटाला आपले सुख मानीत असता. दरोडेखोराचा बंदोबस्त करणारा व्यक्ती कशा प्रकारचा असू शकेल याची तमा न बाळगता प्रजेच्या सुखासाठी आपल्या मुलीच्या सुखाचा विचार केला नाही. आजच्या कालखंडात राजकारणातील ढासळलेली नितीतत्वे, प्रचंड भ्रष्टाचार या राज्यकर्त्यांना अहिल्याबाईंचा आदर्श समोर ठेवणारा आहे.

## अहिल्याबाईंच्या जीवनातील गृहसंकटे व जीवनाची समाप्ती:

अहिल्याबाई होळकरांना आपल्या जीवनात घरातील अनेक संकटांना अप्तस्वकीयांच्या मृत्यूंना सामोरे जावे लागले. पती खंडेरावाचा मृत्यू १७५४ सासू गौतमाबाई २१ सप्टेंबर १७६१, सासरे सुभेदार मल्हारराव २० मे १७६६ पुत्र मालेराव २४ मार्च १७६७ भाउु महादजी शिंदे इ.स. १७८४ यामुळे अहिल्याबाई अधिक दु:खी असत तरीही प्रजेच्या सुखासाठी वैयक्तिक दु:ख बाजूला ठेवले. १७६७ मध्ये मालेरावाच्या मृत्यूनंतर पाच-सहा महिन्यांनी मुक्ताबाईंस पुत्र झाला त्याचे नांव धोंडीबा उर्फ नाथ्याबा फणसे ठेवण्यात आले होते. इ.स. १७८० मध्ये अहिल्याबाईनी नाथ्याबाचे लग्न आपल्या माहेरच्या नात्यातील मुलीशी लावून दिले होते. हा नाथ्याबा १७९० मध्ये क्षयाने आजारी पडला तेव्हा तो बरा व्हावा म्हणून वैद्यकिय, दैवी, मानवी उपचार करुन पाहिले परंतु त्यांचा काही उपयोग झाला नाही. डिसेंबर १७९० मध्ये त्याचा मृत्यू झाला. नाथ्याबाच्या मृत्यूला एक वर्ष होते न होते तो पर्यंत अहिल्याबाईवर दुसरा आघात झाला. ३ मार्च १७९१ या

दिवशी मुक्ताबाईचा पती कॉलऱ्याने आजारी पडून मृत्यू पावले. पुत्रशोकाने आधीच व्याकूळ असलेल्या मुक्ताबाईने पतीबरोबर सती जाण्याची तयारी केली. अहिल्याबाईवर दु:खाचे पर्वत कोसळले, आपल्या मुलीने सती जाउ नये म्हणून त्यांनी मुक्ताबाईला समजाविले. परंतु मुक्ताबाई पुढे पेच निर्माण झाला. तिचा आता कोणते मायेचे पाश राहिले नव्हते. आई होती तिचेही वार्धक्य झाले होते. म्हणून मुक्ता अहिल्याबाईस म्हणाली.'आई तिर्थ घ्यावे अशी तुझ्या पायाची योग्यता ..... माझं एकूलत बाळ गेलं आणि आता तर पती गेले. जगावं अस माझ्या जीवनात काही उरलं नाही. तू म्हातारी झाली थोड्या दिवसाची सोबतीण देव तुझ्या पाठीराखा आहे. प्रजा तुला लेकरासारखी आहे. दौलतीची अजून निरवानिरव करायची आहे. आपल्या कुलात सहगमनाची चाल ही संधी मला प्राप्त झाली आहे. तुला सारे कळते शोक आवर तुझ्यापुढे पदर पसरते.''[४७] शेवटी मुक्ताबाई आपल्या पतीबरोबर सती गेली.

अशा प्रकारे अहिल्याबाईनी ऐकून पाच जिवलग लोकांचे मृत्यू आणि अठरा स्त्रिया सती जातांना पाहिल्या अशा प्रापंचिक दु:खाने त्याचे जीवन दु:खी कष्टी झाले होते. तरीही त्या धीराने राज्य कारभार पहात होत्या. इ.स. १७९४ मध्ये पेशव्यानी खर्ड्याची मोहीम काढली. अहिल्याबाईनी संपूर्ण तजबीज करुन पुढील कारभाराविषयी तुकोजी व इतर सरदारानी उपदेश केला. 'कोणी कोणाचा व्देष करु नये सर्वांनी एकचित्त राहून आपली कामे करुन दौलत सांभाळावी. मागील गोष्टी जाली तिचे वैर स्मरु नये. वाहिली गंगा, राहिले तिर्थ या प्रमाणे होवून चार घटका दिवस रहाता भोजनास घालून दोन वस्त्रे शकुनाची देवून निरोप दिल्हा''[४८]

यानंतर खर्ड्याचे युध्द झाले, युध्दात मराठ्याना विजय प्राप्त झाला. घरातील ग्रह संकटे, उतरते वय, राज्य कारभारातील श्रम यामुळे अहिल्याबाईंचे शरीर झिजले होते. तरीही दैनंदिन जिवनात कोणताही बदल झाला नव्हता. मराठी वैभवाची शेवटची तेजस्वी चमक

१७९५ मध्ये खड्यांच्या विजयाने चमकली. विजयाचा वार्तेने अहिल्याबाई आनंदी झाल्या परंतु त्यांची तब्बेत खालावत चालली होती. 'श्रावण वरदांत चतुर्दशीस मातोश्री बाईसाहेबांचा (अहिल्याबाईंचा) काळ जाहला त्यासमई सुभेदारांचे (तुकोजीचे) कनिष्ट बंधू संताजी होळकर किल्ले सेंदव्यास जिम्मेस होते, ते समयास येवून हजर झाले उत्तर कार्य त्यानी केले. प्राणोत्क्रमण बहुत सावधानीने झाले, श्रावणमासाचा महिना बारा हजार तेरा हजार पात्र जेवण्याचे, त्यांचा संकल्प सोडून, आराम काळी मोक्ष धेनू उत्क्रांत धेनू (दिल्या) धर्माची प्रवृत्ती होवून नामस्मरणाचे घोषात देहवासन झाले. त्याच समई प्रांत:काळी दर्शनी गाय होती, तिने हामडोन प्राण सोडला."[४१]

अशा प्रकारे १३ ऑगस्ट १७९५ या दिवशी महेश्वर येथील वाड्यात अहिल्याबाईंचा मृत्यू झाला. अहिल्याबाईंच्या स्मरणार्थ यशवंतराव होळकरांनी महेश्वर येथे नर्मदा नदी काठी अहिल्याबाईंच्या नावाने अहिल्येश्वर देवालय बांधले. मंदिराचे काम १७९९ मध्ये सुरु केले. व यशवंतरावांच्या पत्नी कृष्णाबाईने ते पूर्ण केले. अहिल्याबाईंची छत्री आजही चांगल्या स्थितीत आहे हे पाहिल्यानंतर दिसून येते.

### अहिल्याबाई होळकर यांची विचारप्रणाली व त्यांचे सामाजिक योगदान:

कोणताही राजकीय विचारवंत, समाजसुधारक अथवा राजकीय नेता आपण पाहिल्यास त्याच्यावर जो ज्या समाजव्यवस्थेतून आला आहे त्या समाजातील राजकीय, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक परिस्थीतीचा प्रभाव पडलेला असतो. जगातील प्रख्यात विचारवंतांचा आपण अभ्यास करतो तेव्हा ते ठरावीक विचाराकडे का आकर्षित झाले असा प्रश्न आपल्यासमोर पडतो. उदा. प्लेटो, ॲरिस्टॉटल, कार्ल मार्क्स, छ. शिवाजी महाराज, महात्मा फुले, महात्मा गांधी यांची उदाहरणे डोळ्यासमोर घेतल्यास तत्कालीन परिस्थितीचा त्यांच्या विचारावर प्रभाव पडलेला आढळून येतो.

तशाच प्रकारे अहिल्याबाई होळकर यांच्यावर त्यांच्या आई वडिलांच्या धार्मिक, दानधर्म वृत्तीचा प्रभाव पडल्याचे आढळते. तत्कालीन कालखंडात आजच्या सारखे शिक्षणाचा प्रसार झालेला नव्हता. परंतु माणकोजी शिंदे त्यांच्या वडिलांनी त्यांना घरीच शिक्षण दिले. अहिल्याबाई मुळातच बुध्दिमान होत्या. धार्मिक पोथीपुस्तकाची आवड त्यांना होती. त्यामुळे होळकरांच्या घरी आल्यानंतरही त्यांच्याकडे सर्व क्षेत्रातील ग्रंथ होते. अहिल्याबाईंची आई मोठी ज्ञानी, विनयशिल, धर्माचारणी आणि कर्तव्यपारायण असल्यामुळे आई वडिलांच्या विचारांचा प्रभाव त्यांच्यावर पडला. अहिल्याबाईंच्या सासू गौतमाबाई अत्यंत कर्तव्यदक्ष होत्या. त्यामुळे त्यांचाही प्रभाव त्यांच्यावर पडला. सासरे मल्हारराव हे पेशवे कालखंडातील पराक्रमी, मुत्सद्दी धोरणी व्यक्तिमत्व होते. मल्हारराव होळकर अहिल्याबाईंना वेळोवेळी पत्र पाठवून राज्य कारभाराविषयी सुचना करत त्यातूनच त्यांना राजनिती, प्रजापालन, न्यायदान, युध्दसाहित्याचे शिक्षण त्यांना मिळत गेले. असे संशोधन अंती दिसून येते. अहिल्याबाईंना पुराने ऐकण्याची आवड होती. त्यांच्या राजदरबारात आंबादास नावाचा पुराणीक होता. त्याकडून अनेक ग्रंथांचे अर्थ त्या समजून घेत. वेळोवेळी त्याचा सल्ला व मार्गदर्शन घेत. त्यांनी जे अनेक ग्रंथ वाचन केले त्यातून त्याना मानवी आचार विचारांचे महत्व समजून आले. अहिल्याबाईंच्या कालखंडाच्या अगोदर छ. शिवाजी महाराजांनी आदर्श राज्यकारभार मराठा कालखंडात केला, त्यांच्या राज्यातील जनता सुखी समाधानी होती. त्यांनी जिजाबाईंच्या मार्गदर्शनाखाली स्वराज्य स्थापन केले. व सर्व राजे-महाराजापुढे आदर्श निर्माण केला त्यांच्या कल्याणकारी राज्यव्यवस्थेचा व आदर्श प्रशासन व्यवस्थेचा प्रभाव अहिल्याबाईंच्यावर पडला असावा असे संशोधनातून दिसून येते.

मराठी, संस्कृत या भाषा त्यांना अवगत होत्या. मोडीही त्याना चांगल्या प्रकारे येत असे. निरनिराळ्या प्रसंगी त्यांनी संबंधीताना पाठविलेली पत्रे आपल्यापरिने अभिनव

आहेत. अहिल्याबाईंच्या स्वभावात गांभीर्य, राजकारणातील धोरणीपना आणि थोरवी या सर्वांचे स्पष्ट दर्शन त्या पत्रातून स्पष्ट घडते. अनेक वेदशास्त्रसंपन्न विद्वानांचा यथोचित्त गौरव करुन अहिल्याबाईंनी त्यांना पूर्ण राजाश्रय दिला. अनेक विद्वानांना त्यांनी वंशपरंपरागत वतने बहाल केली होती. सुप्रसिध्द कवी मोरोपंत देखील अहिल्याबाईंची कीर्ती ऐकून महेश्वरला आले होते. सुप्रसिध्द विद्वान व कवी खुशालीराम हेही अहिल्याबाईंच्या आश्रयास रहात होते. त्यांच्याच प्रेरणेने अहिल्या 'कामधेनू' हा संस्कृत ग्रंथ रचला होता. अहिल्याबाई म्हणत असत की ईश्वराने माझ्यावर सोपविलेली जबाबदारी मला पार पाडायची आहे. प्रजेला सुखी करणे हे माझे काम आहे. माझ्या प्रत्येक कामाची जबाबदारी माझ्यावरच आहे. सामर्थ्य आणि सत्ता यांच्या बळावर मी जिथे जे काही करत आहे त्याचा जाब मला परमेश्वराच्या दरबारात द्यावा लागणार आहे. पेशव्यानांही अहिल्याबाईबद्दल पूर्ण विश्वास होता. अनेक राजकीय व इतर प्रकरणात ते अहिल्याबाईंचा बहूमोल सल्ला व सहकार्य घेत असत.

अहिल्याबाईंची राहणी साधी असे त्यांचे निवासस्थानही साधे होते. स्वत:कडे कोट्यावधींची मालमत्ता असताना ती सर्व जनतेसाठी खर्च केली. अशा प्रकारची विचारसरणी अहिल्याबाईंची होती असे संशोधनातून दिसते.

अहिल्याबाईंच्या सामाजिक योगदानाचा विचार करता तत्कालीन कालखंडातील सामाजिक स्थिती अतिशय गंभीर होती. सर्वत्र प्रथा परंपरा, अंधश्रध्दा यांचा प्रभाव होता. सर्वत्र अशांतता असंतोष अराजक होते. देश अनेक संस्थानात विभागला होता. राज्यात सदोदित आपसात लढाया चालू असत. सैन्याची घोडदोड आणि लढाया यामुळे शेती व्यापार आणि कारभार व्यवस्था दिवसेंदिवस बिघडत चाललेली होती. देशांतर्गत कारभाराकडे शासकांचे मुळीच लक्ष नव्हते. राज्यकर्त्यांचा अनैतिकपणा, अधिकारी अम्मलदारांचा भ्रष्टाचार, चोर दरोडेखोरांचे दहशत यामुळे प्रजा असुरक्षित होती. अशा

परिस्थितीत अहिल्याबाई होळकर सत्तारुढ असूनही त्या सत्तेच्या असक्तीत कधीही गुरफटल्या नाहीत. त्याच प्रमाणे विपुल धनसंपत्ती असूनही त्या संपत्तीचा विनियोग भोगविलास करण्यासाठी बाळगला नाही. आपल्या जिवनातील प्राथमिक आवश्यकतेनुसार कमीतकमी खर्च करुन त्यांनी आपल्या उत्पन्नातील अधिकाधिक खर्च दानधर्म, घाट, मंदिरे, रस्ते, पाणपोया, मंदीरांचे जीर्णउध्दार, पशुपक्षांचे हितसंवर्धन यासाठी वापरला.

अहिल्याबाईचे कौटुंबिक जीवन अत्यंत दु:खी होते परंतु इच्छाशक्ती प्रबळ असेल तर वैयक्तिक दु:खही लोककल्याणाच्या मार्गापासून विचलीत करु शकत नाहीत हे अहिल्याबाईनी स्वत:च्या आचरनातून सिध्द करुन दाखविले. अशाच प्रबळ इच्छाशक्तीच्या लोकांची सध्या देशाला गरज आहे. गुंडांचा बिमोड करुन प्रजेला न्याय मिळवून दिला. राज्यरक्षणासाठी सदैव दक्ष राहिल्या त्याचबरोबर राज्यकर्त्यांना आवश्यक असलेला कठोरपणा त्यांच्याकडे होता. आचार्य विनोबा भावे आपल्या तेरा वर्षाच्या अखंड पदयात्रेत जिथे जिथे गेले तिथे त्यांनी अहिल्यादेवीचे पुण्यस्मरण केले. जनतेला त्यांच्या परोपकारी जीवनाचे दर्शन घडविले. १९६० मध्ये जेव्हा ते मध्यप्रदेशात फिरले त्यावेळी त्यानी श्रोत्यांना अहिल्यादेवींच्या जीवनकार्याची आठवण करुन दिली.

अशा प्रकार अहिल्याबाईच्या व्यक्तिमत्वाचे विविध पैलू या प्रकारणात साकार झाले आहेत.

**संदर्भ ग्रंथ सूची:**


१) जोशी लक्ष्मणशास्त्री, मराठी विश्वकोश, खंड आठ, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९७९, पृ. क्र. ८८८.

२) उपरोक्त, पृ. ८८८.

३) सरदेसाई गो. स., मराठी रियासत खंड ३ रा, पुण्यश्लोक, शाहू पेशवा बाळाजी विश्वनाथ, पेशवा बाजीराव, संपा. स. मा. गर्गे, प्रकाशक, पॉप्यूलर प्रकाशन, रामदास भटकळ १९८९, पृ. ३२३.

४) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध झाला. होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, वर्षे १९४०, पृ. १.

५) केळकर य. न., होळकरांची कैफियत, प्रकाशक कोकाटे सदाशिव लक्ष्मण, द्वितीयआवृत्ती, १९७२, पृ. १ व २.

६) पाटील सुलोचना, होळकर कुलभूषण अहिल्यादेवी प्रकाशक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर प्रगती मंडळ जळगाव, डिसेंबर २०००, पृ. २३.

७) उपरोक्त, पृ. २३, २४.

८) उपरोक्त, पृ. २५.

९) दिक्षित स.का., *अहिल्याचरितम - एक अध्ययन*, गर्ग रामसेवक, शर्मा हिरालाल (संपा.) अहिल्या स्मारिका प्रकाशक खाजगी देवी अहिल्याबाई होळकर चेरिटीज ट्रस्ट, इंदोर, १९७०, पृ. ५०.

१०) पाटील सु. आ. - होळकर कुलभूषण अहिल्यादेवी. प्रकाशक अहिल्यादेवी प्रगती मंडळ, जळगाव २००, पृ. ४.

११) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध. होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, वर्षे १९४०, पृ. १.

१२) लेले मुक्ताबाई, होळकर कुलभूषण देवी अहिल्याबाई प्रकाशक दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई, १९३६, पृ. ८.

१३) शर्मा हिरालाल, अहिल्याबाई, प्रकाशक नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया, प्रथमावृत्ती १९६७, मुंबई, पृ. ५९.

१४) पाटील सु. आ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी प्रकाशक अहिल्यादेवी प्रगती मंडळ, जळगाव, २०००, पृ. ८.

१५) उपरोक्त, पृ. १५२.

१६) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध झाला. होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, वर्षे १९४१, पृ. १९३.

१७) उपरोक्त, पृ. १९३.

१८) उपरोक्त, पृ. १९४, १९५.

१९) ठाकूर वा. वा. लाईफ ॲण्ड लाईप वर्क्स ऑफ देवी अहिल्याबाई होळकर, नई दुनिया प्रेस इंदोर, पृ. ८४-८५.

२०) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर प्रगती मंडळ जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ३०.

२१) शास्त्री अवधूत (संपा.), धर्मभास्कर देवी अहिल्याबाई होळकर विशेषांक, जून १९७५ मुंबई, पृ. ६७.

२२) शर्मा हिरालाल, अहिल्याबाई नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया, मुंबई, १९८९, पृ. २९.

२३) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध झाला. होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, वर्षे १९४०, पृ. २१.

२४) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर प्रगती मंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ३२.

२५) केळकर य. न., होळकरांची कैफीयत ७४, प्रकाशक, कोकाटे सदाशिव लक्ष्मण, १९७२, पृ. १२०.

२६) उपरोक्त, पृ. १२०.

२७) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध झाला. होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, वर्षे १९४०, पृ. १२९, १३०.

२८) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग २ रा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध झाला. होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, वर्षे १९४५, पृ. १६१, १६२.

२९) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध झाला. होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, वर्षे १९४०, पृ. १०७.

३०) शर्मा हिरालाल, अहिल्याबाई नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया, प्रकाशक नई दिल्ली १९८९, द्वितीय आवृत्ती, पृ. १८, १९.

३१) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर प्रगती मंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ३४.

३२) खोबरेकर वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास मराठा कालखंड भाग २ रा. प्रकाशक महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९८४, पृ. २३१.

३३) केळकर य. न., होळकरांची कैफियत प्रकाशन, केळकर सदाशिव लक्ष्मण, पुणे १९७२, पृ. ४७.

३४) आपटे द. वि., चंद्रचुड दप्तर कला १ ली गंगोबा तात्या कारकिर्द प्रकाशक पोतदार द.वा. व मुजूमदार ग. वा. शके पुणे, १८४२, पृ. ९८.

३५) लोही म. ना. देवी अहिल्याबाई होळकर, वास्तवदर्शन ज्ञानेश प्रकाशन, नागपूर, जून २००१, पृ. ४८.

३६) वाड चि. ग. व पारसनीस द. ब., इतिहास संग्रहात प्रसिद्ध झालेले पेशवे दप्तरातील सनदा पत्रातील माहिती (शाहूराजे व त्यांची पुढील कारकीर्द) प्रकाशक तुकाराम जावजी, मुंबई, १९१७, पृ. २०९.

३७) उपरोक्त, पृ. २१०.

३८) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण देवी अहिल्यादेवी, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ३९.

३९) केळकर य. न., होळकरांची कैफियत, प्रकाशक कोकाटे सदाशिव लक्ष्मण, व्दितीय आवृत्ती १९७२, पुणे, ले. ३३ पृ. ४२-४३.

४०) उपरोक्त, पृ. ३४.

४१) सरदेसाई गो. स., गर्गे स.मा. (संपा.) मराठी रियासत खंड ५ वा निग्राहक माधवराव अपेशी नारायणराव दुराग्रही रघुनाथराव प्रकाशक रामदास भाटकळ मुंबई, १९९०, पृ. ५४.

४२) भागवत अ. ना. होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, पत्रव्यवहार, पूर्वाध खंड १ ला १९२४, पृ. १४-१५.

४३) केळकर य. न., होळकरांची कैफियत प्रकाशक कोकाटे सदाशिव लक्ष्मण १९७२. ले. क्र. ३५, पृ. ४४.

४४) उपरोक्त, पृ. ४५.

४५) केळकर य. न., होळकरांची कैफियत, प्रकाशक कोकाटे सादाशिव लक्ष्मण, ले. क्र. ३५, पुणे, १९७२ पृ. ४६.

४६) शर्मा हिरालाल, अहिल्याबाई, प्रकाशक नॅशनल बुक ट्रस्ट मुंबई, १९६७, पृ. ३७.

४७) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक अहिल्यादेवी प्रगती मंडळ, जळगाव डिसेंबर २०००, पृ. ५६.

४८) पारसणीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग २ रा, प्रकाशक, तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना मुंबई प्रसिद्ध १९३०, पृ. २४७, २४८.

४९) केळकर य. न., होळकरांची कैफियत, १९७२, पृ. ११९.

# प्रकरण दुसरे

# अहिल्याबाई होळकर यांचे राजकीय व प्रशासकीय कार्य

**प्रास्ताविक :**

मानव हा समाजशील प्राणी आहे हे सत्य सर्वमान्य आहे. तथापी मानव समाजशील असल्याकारणाने तो विविध संस्था निर्माण करतो. या संस्थेद्वारा एकमेकाशी संबंध वाढवतो म्हणून तो राजकारणात ओढला जातो. या संबंधातून प्रभाव निर्माण होतो. प्रभावयुक्त संबंध हळूहळू स्थिर होवून त्याची पुनरावृत्ती होवू लागली की राजकीय व्यवस्था निर्माण होते. या अर्थाने मानव हा राजकीय प्राणी आहे असे म्हणता येईल. मानवाची स्वत:ची मूल्ये अगर हीतसंबंध कोणतेही असोत समाजशील प्राणी म्हणून तो कोणत्या ना कोणत्या राजकीय व्यवस्थेत राहतो. ह्या अर्थाने अहिल्याबाई होळकर यांच्या राजकीय व प्रशासकीय नेतृत्वाचा अभ्यास या प्रकरणात केला आहे.

मॅक्स वेबर यांच्या मते राजकारण हे सर्वव्यापी आहे. मानवाचा सर्व इतिहास राजकारणाने भरलेला आहे. इतिहासाच्या ओघात राजकारणाने अनेक रुपे धारण केली आहेत. राजकारणाने अनेक संस्था निर्माण केल्या आहेत म्हणून केवळ राज्य म्हणजे राजकारण किंवा राजकीय कृती अशी गल्लत करून चालणार नाही. राज्य म्हणजे राजकारणाच्या अनेक अविष्कारापैकी एक ऐतिहासिक अविष्कार आहे. राज्याशिवाय 'नगर' साम्राज्य, पक्ष, दबाव गट असे अनेक राजकीय घटक आहेत. राज्यापूर्वीही सत्तेचे राजकारण अस्तित्वात होते यावरुन केवळ राज्य म्हणजेच सत्तेचे राजकारण असे मानता येणार नाही तर ते व्यापक असे आहे.

अहिल्याबाई होळकर यांचे राजकीय नेतृत्व अत्यंत मुत्सदी होते. गंगाधर चंद्रचूडांनी रघुनाथरावांच्या मदतीने अहिल्याबाईवर आक्रमण करून राज्य गिळंकृत करण्याची योजना आखली. त्याचा अहिल्याबाईंनी बिमोड केला. हा त्यांच्या राजनितीचा विजय होता. बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे, थोरला माधवराव पेशवा, नाना फडणीस, महादजी शिंदे, इंग्रज सेनानी मेजर जनरल जॉन माल्कम, संतकवी मोरोपंत इत्यादी समकालीन थोर मंडळींनी अहिल्याबाईंची कारकीर्द पाहिलेली, अनुभवलेली, ऐकलेली होती. त्या समकालीन राज्यकर्त्यांनीही अहिल्याबाईंची मुक्तकंठाने प्रशंसा करावी यातच त्यांची थोरवी दिसून येते. अहिल्याबाई ह्या राज्यावर आरूढ असताना कोट्यवधी रुपयांची धनदौलत ताब्यात असताना अत्यंत साधेपणाने व्यक्तिगत जीवन जगणारी राज्यकर्ती स्त्री होती. राज्यकर्त्यांचे चरित्र शुद्ध असेल तर अधिकअधिक कठीण परिस्थितीतही कल्याणकारी राज्य कार्यक्षमतेने राबविता येते. हे अहिल्याबाईंनी दाखवून दिले.

पुन:निर्माण ही आज राष्ट्राची गरज आहे. त्यामध्ये महिलांच्या भागीदारीची फार मोठी गरज आहे. स्त्री मुक्तीचे काम आता बाळसे धरत असले तरी अजूनही फार मोठा पल्ला गाठावयाचा आहे. महिलांचा सन्मान ठेवून त्यांना बरोबरीचा अधिकार व स्थान दिले पाहिजे. महिलांच्या शक्तीचा व क्षमतेचा स्वीकार करून त्यांचा विकास घडवून आणणे महत्त्वाचे आहे जेणे करून त्या समाज परिवर्तन कार्यात आपला वाटा उचलू शकतील. मात्र, ही जबाबदारी समाजाची आहे. ज्या कालखंडात स्त्रीला अत्यंत हीन लेखले जायचे. चूल आणि मूल व पतीच्या निधनानंतर सती जायचे त्या कालखंडात अहिल्याबाई आपल्या राजकीय व प्रशासकीय कार्याचा ठसा उमटवून स्त्रियांपुढे एक आदर्श निर्माण केला. त्यांच्या अंगी असलेल्या नेतृत्व गुणांचा या प्रकरणात शोध घ्यावयाचा आहे. आजही २१ व्या शतकात स्त्रीला पुरुषाबरोबर राजकीय व्यवस्थेत समान संधी मिळावी म्हणून तेहतीस टक्के आरक्षण मागावे लागते आहे. अहिल्याबाईच्या काळखंडातील समाज व राजकीय व्यवस्था

अत्यंत विषम होती त्या राजकीय व्यवस्थेतील ठळक घटना यांचे विश्लेषण या प्रकरणात आहे. या प्रकरणात राजकीय व प्रशासकीय कार्याचा एकत्र आढावा घेण्याचे कारण की पेशवे कालखंडात जे अनेक सरदार होते, शिंदे, भोसले, होळकर, गायकवाड, पवार त्यामध्ये होळकरांच्या स्त्रियांना फक्त खासगी दौलतीचा अधिकार होता. अहिल्याबाई होळकरांनी प्रशासन करीतच राजकीय कार्य केले आहे. हे येथे चिकित्सक वृत्तीने लक्षात घेतले पाहिजे.

## तत्कालीन परिस्थिती व पार्श्वभूमी :

मल्हारराव होळकरांकडून अहिल्याबाईंच्याकडे राज्यकारभाराची सुत्रे येण्यापर्यंतचे विश्लेषण पुढीलप्रमाणे:

तत्कालीन कालखंडात भारताची राजकीय आणि सामाजिक स्थिती अतिशय गंभीर होती. सर्वत्र अशांतता, असंतोष आणि अराजक यांचे थैमान सुरू होते. देश अनेक लहान लहान राज्यांत विभागला गेला होता. ह्या राज्यांत सदोदित आपसांत हाणामाऱ्या व लढाया चालू असत. सैन्यांची घोडदौड आणि लढाया यामुळे शेती, व्यापार आणि कारभार व्यवस्था दिवसेंदिवस बिघडत चालली होती. देशांतर्गत कारभाराकडे शासकांचे मुळीच लक्ष राहिले नव्हते. कारभार व्यवस्था अशी उरलीच नव्हती. सत्तेसाठी राजघराण्यांत कुटील कारस्थाने आणि खून, कत्तली चालू होत्या. राज्यकर्त्यांचा अनैतिकपणा, अधिकारी अंमलदारांचा भ्रष्टाचार आणि चोर दरोडेखोरांची दहशत यामुळे प्रजा गांजून गेली होती.

दिल्लीत मोंगल सम्राट महंमदशहा नुसता नावाचाच राजा होता. त्याच्या सभोवती स्वार्थी आणि निष्क्रिय लोकांचा गराडा हेता. त्याचा सारा वेळ विलासी जीवनात जात असे. त्यामुळे मोंगल साम्राज्य झपाट्याने नष्ट होत चालले होते. त्या काळात अफगाण, फ्रेंच आणि मराठे या तीन शक्ती भारतातच्या इतिहासात उंच होत होत्या. सिंध, पंजाब आणि कश्मीर यावर वर्चस्व स्थापन करून अहमदशाह अबदाली वेगाने पुढे सरकत होता.

युरोपातील साम्राज्यवादी राष्ट्रेही भारतात झपाट्याने आपले पाय रोवू पहात होती. पोर्तुगालने तर काही स्थाने घेऊनही टाकली होती. इंग्रजाचे वर्चस्व वाढत होते. फ्रेंचाचा प्रभाव दक्षिण भारतात बराच वाढला होता. उत्तर भारताची विशेषकरून राजपुताना आणि माळवा यांचा प्रभाव कमी होत चालला होता.जर मोगलशाहीनी हिंदूंचा विकास साधला असता तर हिंदू छत्रपतींच्या नेतृत्वाखाली स्वतंत्र राज्याची गरज निर्माण झाली नसती व कदाचित शिवाजी राज्यांच्या स्वराज्याची स्थापना झाली नसती परंतु मोगल राजवटीत प्रजेच्या हिताकडे पूर्णपणे दुर्लक्ष झाले. मुसलमान राज्यात न्याय अपवादात्मक होता. स्त्रियांवर बलात्कार, हिंदूंचे खून, हिंदूंची मंदिरे फोडणे इत्यादी प्रकार उघडपणे सर्व समाजापुढे घडत. म्हणूनच सर्वधर्म समभावाला मानणाऱ्या शिवाजीची आवश्यकता निर्माण झाली. इ. स. १६६४ मध्ये छत्रपती शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक होऊन हिंदूपदपादशाहीची संस्थापना त्यांनी केली. काही काळाने मराठ्यांचे स्वराज्य भावनेचे रूपांतर मराठा साम्राज्यात झाले. त्या काळात मराठ्यांचे राजे साताऱ्याला राहात असत.

इ. स. १७०७ मध्ये औरंगजेबाच्या मृत्यूनंतर छत्रपत्री शाहूची सुटका झाली. पुढे शाहू आणि ताराबाई यांच्यात इ. स. १७०८ मध्ये खेडचे युद्ध होऊन ताराबाईचा पराभव झाला आणि शाहू विजयी झाले. परंतु सेनापती चंद्रसेन जाधवांचा कल ताराबाईंकडे असल्याने छत्रपती शाहूंची स्थिती अस्थिर झाली. अशा वेळी श्रीवर्धन येथील बाळाजी विश्वनाथाने सैन्य गोळा करून शाहू महाराजांचे शासन स्थिर करण्यासाठी कठोर परिश्रम केलो. म्हणूनच छत्रपती शाहूने इ. स. १७ नोव्हेंबर १७१३ मध्ये मंजरी या गावी बाळाजी विश्वनाथ याला पेशवा नेमला. कारण त्याने पश्चिम किनाऱ्यावरील कान्होजी आंग्रेला बुद्धी चातुर्याने ताराबाईकडून आपल्याकडे वळविण्यात यशस्वी झाले होते. कान्होजी सारखा दर्यावर्दी सारंग शाहू महाराजांच्या सेवेत रूजू केला. साताऱ्यास जाऊन महाराजांचे दर्शन घेतले आणि कान्होजी आंग्रे यास सारखेलची पद देऊन वस्त्रे व सिक्के कट्यार पाठविली.

'बाळाजी विश्वनाथ याने सय्यद बंधूना मदत करून मोगल सम्राट फरूखसियरकडून इ. स. १७ मार्च १७१९ ला तीन सनदा १. स्वराज्य २. सरदेशमुखी आणि ३. चौथाई प्राप्त केल्या. ता. ३ मार्च १७१९ रोजी चौथाई व ता. १५ मार्च १७१९ रोजी सरदेशमुखीचा करार बादशहाने करून दिला व शाहूच्या कुटुंबातील सर्व मंडळीची मुक्तता केली. २० मार्च १७१९ रोजी बाळाजीने दिल्ली सोडली आणि ४ जुलै १७१९ ला साताऱ्यास येऊन पोहोचला'.[१] परंतु ह्या सनदेची अंमलबजावणी होण्यापूर्वीच २ एप्रिल १७२० रोजी बाळाजी विश्वनाथाचा मृत्यू सासवड येथे झाला. बाळाजी विश्वनाथाच्या मृत्यूनंतर १७ एप्रिल १७२० रोजी त्यांचा मुलगा बाजीराव यास पेशवा नेमला. चिमाजी अप्पास पंडित ही पदवी दिली आणि दाजी थोरात कडील काढून घेतलेली सरंजाम व सरदारकी दिली. पुरंदरे यास मुतालकीची वस्त्रे दिली ह्याच गोष्टी जुन्या अनुभवी मंडळींना आवडल्या नाहीत. त्यामध्ये नागपूरचे रघुजी भोसले, श्रीपतराव प्रतिनिधी आनंदराव सुमंत, दाभाडे नाशिराम यांचा समावेश होतो.

श्रीपतराव प्रतिनिधी आणि पेशवा बाजीरावात मराठा राज्याच्या धोरणाविषयी मतभेद निर्माण झाले. अशा वेळी घरात भांडत बसण्यापेक्षा बाहेर पडावे. मराठी साम्राज्याचा विस्तार होईल. या उत्तरेकडील आक्रमक विस्तारवादी धोरणाला जुन्या जाणकार अनुभवी सरदार मंडळींचा विरोध राहील याची खात्री थोरल्या बाजीरावाला असल्यामुळेच त्याने जुन्या मंडळींना बाजूला सारून आपले नवीन धोरण अंमलात आणण्यास नवीन सरदार निर्माण केले. बाजीरावाने मराठा स्वराज्याचे रूपांतर मराठा साम्राज्यात केले. हे साम्राज्य निर्माण करीत असताना बाजीरावाने तरुण नवीन सरदार घडविले. त्यात राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, उदाजी पवार इत्यादी होते. राणोजी बाळाजी विश्वनाथाच्या काळापासून पेशव्यांकडे होते. शिंदे-होळकर एकाच मालकाचे नोकर असले तरी पालखेडच्या मोहिमेने एकत्र आले आणि मग मात्र जोडी जमून बहुतेक सर्व स्वाऱ्यांत शिंदे-

होळकर असत. इ. स. १७२० ते १७४० पर्यंत बाजीराव पेशव्यांनी राणोजी शिंदे व मल्हारराव होळकरांच्या मदतीने मराठी राज्याचा विस्तार केला. 'बाळाजी पंताच्या कारकिर्दीच्या अखेरीस मल्हारराव होळकरांनी पवारांच्या मदतीने माळव्याचे राजकारण सुरू केले होते. बाळाजीने दिल्लीहून परत येताना बाजीरावास उत्तरेतच ठेवले. इ.स. १७२३-२४ च्या दरम्यान मल्हाररावाने आपले ठाणे इंरोरास नेले आणि उदाजी पवाराने धारचा कब्जा घेतला.[२]

**बाजीरावांकडून मल्हारराव होळकरांना माळव्यांची सनद :**

माळवा विजयाने होळकर शिंदेंच्या कर्तृत्वाला सुरुवात झाली. या विजयाचे श्रेय प्रामुख्याने होळकर शिंदे आणि उदाजी पवारांचे आहे. माळवा विजयात उदाजी पवारांची कामगिरी मोलाची ठरली. 'वाटणी संबंधी वाद निर्माण झाला. पवारांना माळव्यात अर्धा मोकासा हवा होता. त्यांना अर्धा प्रांत दिला तर होळकर शिंद्यांचे काय करायचे असा प्रश्न होता. या प्रकरणामुळे पवार दुरावले. होळकर शिंदे बळावले. माळव्यांचा स्वतंत्र कारभार होळकर, शिद्यांना देण्यात आला.[३] २२ नोव्हेंबर १७३१ रोजी मल्हारराव व राणोजीच्या नावे संयुक्त सरंजाम दिला. पेशव्यांच्या उत्तरेकडील राजवटीचे पहिले मोठे सरंजामदार होळकर शिंदेच होते. इ. स. १७३३ साली होळकर व शिंदे यांच्या ताब्यात माळव्यातील जो मुलुख होता तो पाच परगणे व साडेतेरा सरदारे पेशव्यांच्या ताब्यात यावेळी आला असून त्यांनी शिंदे व होळकर सरदारांत वाटून दिली 'यादी ...... सन सालासीन (इ.स. १७३२-३३) जमा झाले. मजकूर महात्मा निहाय सुभा प्रांत माळवा, --------, १० सफर, सरंजामी राजश्री मल्हारजी होळकर व राणोजी शिंदे, श्रीमती राजश्री चिमणाजी बल्हाळ महाल वितपशील.

५. कित्ता परगणे मजकूर

१.परगणे डोंगरपूर यांचे वाटणीपैकी एकूण महाल

१. परगणे दाहाद

१. परगणे सालोत

१. परगणे सुप

१. परगणे आळी

१३. कित्ता सरकारने

१. सारंगपूर व उज्जैन

१. सरकार मंदसोर

१. सरकार पिंडावा कोळी गांगुर्णा

१. सरकार भेलसे

१. सरकार मांडवगड

१. सरकार चंदेरी बुदरक व खुर्द

१. सरकार अढयाबाद

१. सरकार आलमगीरपूर

१. सरकार गदे

१. सरकार रहाबाद

१. सरकार हांडेपैकी महाल ७ एकूण निमे

१, सरकार कोटे

१. सरकार बुंदी

---

१३. सरकार

मल्हारराव होळकरांनी बाजीरावांच्या कारकिर्दीत प्रत्येक युद्धात, मोहिमेत भाग घेऊन मदत केली. माळवा बुंदेल खंड आणि दिल्लीपर्यंत मराठ्यांचे राज्य व प्रभा प्रस्थापित झाली. [४]

## होळकर शिंदेंच्या स्वतंत्र मोहिमा :

'इ. स. १७३५ च्या सुरुवातीला खानदोरा, जयसिंग, अभयसिंह व महाराज काटेकर दोन लक्ष स्वार, पाच तोफखान्यासह मुकुंदऱ्याचा घाट उतरून रामपुरा प्रांतात आले. होळकर शिंद्यांनी बुंदी कोटाकडे मोर्चा वळवून सवाईजीच्या प्रदेशात लुटालूट करून पिछाडीचा मुलुख उद्ध्वस्त केल्याने राजपुतांचा धीर सुटला. सवाईजी विजयनगरकडे वळले.'[५] या संघर्षात मोगलांची भिस्त तोफखान्यावर तर मराठ्यांची घोडदळावर होती. २८ जानेवारी १७३५ मराठ्यांनी सांबर लुटले. राजपुत्रांनी खंडणी देऊन आपला बचाव केला. जयसिंहांच्या मध्यस्थीने होळकर शिंदेंशी तहाचे बोलणे झाले. 'माळव्याची चौथाई म्हणून दरवर्षी २२ लाख खानदौराने कबुल करून तो दिल्लीला निघून गेला मल्हारराव व राणोजी माळव्यातून जुलै १७३५ मध्ये पुण्यास निघून गेला. मल्हारराव व राणोजी माळव्यातून जुलै १७३५ मध्ये पुण्यास आले. त्यांच्या सन्मानप्रित्यर्थ पेशवा होळकरांस संगमपावेतो तर शिंबास घोरपडी पावेतो समोर गेला.'[६] राणोजी शिंदे व होळखरांनी स्वतःच्या भरवशावर केलेली ही पहिली मोहीम होती. बाजीराव सरदारांना बरोबरीने व मित्रत्वाने वागवी त्यामुळे तेही सदैव त्यांचा मान राखीत.

## पेशवा बाजीरावाचा मृत्यू व नानासाहेब पेशवा बनतो :

'नासिरजंग १२ डिसेंबर १७३९ रोजी बाजीरावांवर चालून आला. रघुजी भोसल्यांनी नारायण व हुमनाबाद या पेठा मारल्या. सुलतानजी निंबाळकरांनी चंद्रसेन जाधवांचा समाचार घेतला.'[७] निजामाने २७ फेब्रुवारी १७४० रोजी मुंगी-शेगांव पैठण येथे व ३ मार्च १७४० मध्ये वयाच्या ४० व्या वर्षी नर्मदा तिरी रावेरखेडी येथे बाजीरावांचा अकाली मृत्यू झाला. बाजीरावांच्या मृत्यूनंतर छत्रपती शाहू महाराजांनी मराठा साम्राज्यांची बाजीरावाने केलेली सेवा लक्षात घेऊन त्याचा ज्येष्ठ पुत्र बाळाजी ऊर्फ नानासाहेब यास १९ जून १७४० रोजी पेशवाईची वस्त्रे देऊन पेशवा केले. 'नानासाहेबांच्या काळात म्हणजे इ. स. १७४० ते

१७६० च्या दरम्यान मराठ्यांचे साम्राज्य उत्तरेकडे अधिकच विस्तारीत गेले. १७ डिसेंबर १७४९ मध्ये छत्रपती शाहू महाराजांचा मृत्यू झाला. परंतु मृत्यूपूर्वीच सर्व सत्ता शाहू महाजारांनी नानासाहेब पेशवे आणि त्यांच्या उत्तराधिकाऱ्यांच्या हाती सोपविली होती. पेशव्यास माळव्याची नायब सुभेदारी मिळाली.[८]

**होळकर-राजपूत संबंध :**

राजपुतण्यास मराठ्यांचा दरारा निर्माण झाला होता. मराठे राजपुतण्यास पोहोचताच अभयसिंहाने त्यांच्याशी लढण्याचे टाळल्याने या मोहिमेत द्रव्य प्राप्ती झाली नाही म्हणून पेशव्याने लिहिले. 'अभयसिंहाचे मैत्रीची ममता, सर्वाशी न धरता द्रव्य साध्य होय तो अर्थ करणे, तुम्ही त्यासी निष्टुरता केली या खेरीज राजकारणावर येऊन सध्याचे कार्य करू देत नाहीत.'[९] या गोष्टीला चिडून मल्हाररावाने पेशव्यास लिहिले. 'स्वामीचे नाव आमचे पदरी त्यामुळे राजपुतांशी स्नेह अगर केव्हाही विरुद्ध त्यास हे राजपूत त्याजपासून निर्माण जाले अथवा साक्षात बंधू ते परस्पर एकाचे एक नव्हेत आमचे कोठून होणार. आम्ही त्याचा भरवसा कोठून धरणार, अभयसिंहाने आपणावर कधी कधी कृतोपकारही केला नाही अथवा लालचेचा प्रसंगही घडला नाही. मग कोणी गोष्टीनिमित्त स्वामी सेवेशी चुकावे त्यास काया वाचा मने करून एकनिष्ठ स्वामीचे पायी आहे.'[१०] यावेळी बुंदेले मराठ्याविरुद्ध एक झाल्याने त्यांच्या बंदोबस्ताची कामगिरी होळकर, शिंदेवर आली. इ. स. १७४० मध्ये सवाई जयसिंहाचा मृत्यू झाल्याने त्याच्या ईश्वरसिंह व माधेसिंह या मुलांमध्ये गादीसाठी कलह निर्माण झाला. या संघर्षात होळकर शिंदेंनी भेलसा जिंकून घेतला. २१ जुलै १७४५ रोजी सुजालपूर येथ राणोजीचा मृत्यू झाला. 'जय्यापास बुंदी कोट्याहून पैसा मिळाला. ६५ लाख रुपये देतो. तुमची मदत आम्हाला द्या असे माधेसिंगाने होळकरास कळविले. ही गोष्ट मान्य करून होळकरांनी ईश्वरसिंगावर मात केली.'[११] त्यामुळे शिंदे-होळकर मतभेद निर्माण झाले. शिंदे-होळकरांचे जमेना तेव्हा स्वतः नानासाहेब उत्तरेत गेले. या स्वारीस पेशवाईची स्वारी

म्हणतात. माधेसिंगाने आपला परगाणा होळकरास मदतीदाखल दिला. मल्हाररावास न दुखवण्यासाठी नानासाहेबाने या प्रकरणी जी धरसोड केली त्यामुळे मराठ्यांचा दुलौकिक झाला. पैशाच्या लोभाने वचन मोडून पाहिजे त्या पक्षास मिळतात असे दिसून येताच राजपुतास जयसिंगापासून मराठ्यांविषयी हिंदूत्वाच्या अभिमानामुळे जो आदर वाटे तो लयास गेला.

**जाटांशी संघर्ष:**

बादशहाने सफदरणेगाची वजीर पदावरून हकालपट्टी केल्याने त्या दोघांत संघर्ष सुरू झाला. त्यामुळे बादशहाने मराठ्यांना मदत मागितली. त्यानुसार पेशव्यांनी रघुनाथदादा, होळकर व शिंदेंना पाठविले परंतु मराठे दिल्लीत पोहोचण्यापूर्वीच सफरदरजंगाचे पारिपत्य झाले होते. थोड्याच दिवसांत सफरदरजंगाचा मृत्यू झाला. इ. स. १७५४ मद्ये याचवेळी आग्रा अजमेरच्या सुभ्यावरून मराठ्यांचे सुरजमल जाटाशी वितुष्ट येऊन युद्ध सुरू झाले. रघुनाथराव मल्हारराव होळकर यांनी कुंभेरीस पेठा दिल्यावर गाजीउद्दीन बादशहाचा तोफखाना घेऊन मराठ्यांच्या मदतीला आला. मराठे व गाजीउद्दीनाचे सख्य पाहून बादशहाने सुरजमलास गुप्त पत्र पाठवून त्यास टिकाव धरण्यास सांगितले व स्वतः बाह्यत मराठ्यांना पण आतून जाटास मदत करण्यास फौजेसह येऊ लागला. पण हे कारस्थान गाजीउद्दीनास कळताच त्यांनी मल्हाररावांना सोबत घेऊन दिल्लीच्या सैन्यावर छापा घालून फडशा उडविला. बादशहा पळून दिल्लीला परत गेला तर होळकर व गाजीउद्दीन यांनी वेढा घातला. कुंभेरीचा किल्ला मजबूत असून वाळवंटामुळे सुरूंग लावणे शक्य नव्हते. जाट चाळीस लक्ष रुपये देण्यास तयार होता, तर रघुनाथरावांची मागणी एक कोटीची होती. कुंभेरीस मोर्चे लावण्याची जबाबदारी खंडेरावावर होती. ''खंडेराव खंदक निरीक्षण करीत असताना खंडेररावास जांबोऱ्याची एक गोळी लागली आणि खंडेररावांचा मृत्यू झाला.''[१२] पुत्राच्या मृत्यूची बातमी ऐकून मल्हारराव फार दुःखी झाले शेवटी जय्याप्पाच्या मध्यस्थीने

रघुनाथरावांनी ६० लाख रुपये खंडणी घेऊन वेढा उठविला. जिय्याप्पा रामसिंगच्या मारवडला गेला. या घटनेमुळे होळकर-शिंदे तेढ परत वाढली. 'सुरजमल जाटाचा शिरच्छेद करून त्याचे शिर यमुनेत टाकण्याची प्रतिज्ञा मल्हाररावांनी केली'.[१३] ही बातमी सुरजमलाची पत्नी किशोरीदेवीला कळली. त्यामुळे ती भयभयीत होऊन रूपराम काटारीमार्फत शिंदेंशी तहाची बोलणी लावली. रघुनाथरावांचे मन कुंभेरीचा वेढा उठविण्यासाठी वळविले. प्राप्त परिस्थितीत सूजरमल जटांशी तह करावा असे शिंदेंचे मत होते. अशाप्रकारच्या अनेक प्रसंगांतून शिंदे-होळकर वाद वाढत गेला.

**अहिल्याबाईंच्या राजकीय व प्रशासकीय नेतृत्वाचा विकास :**

मल्हाररावांचा पुत्र खंडेरराव हा शूर, धाडशी होता. परंतु दुर्दैवाने तो व्यसनी होता. पुत्राच्या या वागण्यामुळे मल्हाररावास दुःख होई. परंतु मल्हाररावांचा आपल्या सुनेच्या योग्यतेवर पूर्ण विश्वास होता. अहिल्याबाई बुद्धीमान, कुशाग्र असल्याने राजकारभाराची जबाबदारी अहिल्याबाईंवर सोपवत. अहिल्याबाई ती सर्व कामे अतिशय चातुर्याने करीत असत. खंडेररावाच्या मृत्यूनंतर सासरे मल्हाररावांच्या विनंतीवरून सती न जाता राजकारभारात सक्रिय झाल्या. मल्हारराव लढाईवर असताना अहिल्याबाईंना वेळोवेळी पत्र पाठवून राजव्यवहाराचे, रणनितीचे, युद्ध साहित्याचे, प्रजापालन, न्यायदान, प्रशासन याविषयी सूचना करत असत. अहिल्याबाईंस राजकीय व प्रशासकीय कारभाराचे शिक्षण मिळत गेले. मल्हारराव होळकर हे अहिल्याबाईचे राजकीय गुरू झाले. मल्हाररावाने अहिल्याबाईस पाठविले पत्र पुढीलप्रमाणे -

'चिरजीव अहिल्याबाई प्रति, मल्हारजी होळकर आशीर्वाद उपरी कुशल जाणोत राजकीय लिहित जाणे. विशेष आपणास पत्र श्रीमंतांचे की, रा. कुसाजी शिंदे मौजे पिंपरखेड येथील संबुगीर गोसावी याने कुसाजी मजकूर याचा शेतमळे व घर जप्त केले म्हणून कळले त्यास वाफगावी व जेथे मुले माणसे त्याची असतील तेथे तुम्हा गोसावी यासी ताकीद उत्तम

प्रकार करून इसम मजकुराची जप्ती सेतमळे याची जे असतील त्याची ताकीद करून सोडून द्यावी यावरून हे पत्र लिहिले आहे. (३.१२.१७६२)''[१४]

वरील पत्राच्या विश्लेषनाचा विचार करता शंभूगीर गोसावीयाने पिंपरखेडच्या कुसाजी शिंदे पाटलाचे शेतमळे व घर जप्त केले होते व त्याच्या पुतण्यास वाफगावी कैदेत ठेवले होते. पेशव्याने दिलेल्या आज्ञेप्रमाणे जप्ती दूर करून शेतमळ्याची मोकळीक करावी व वाफगावाहून त्याच्या पुतण्यास सोडवावे याबाबत मल्हाररावाने अहिल्याबाईस सांगितले होते. मल्हाररावाने आपल्या हयातीतच एखाद्या व्यक्तीस इनाम देणे, रोजगार देणे, अशी राज्यकारभारविषयक कामे अहिल्याबाईकडे सोपविली होती व तिला राज्यकारभारात तरबेज करून पुढील तजवीज करून ठेवली होती. अशा प्रकारे आपल्या सुनेला मुलगा मानून मल्हाररावाने अहिल्याबाईच्या नेतृत्वगुणांना वाव दिला. अहिल्याबाईंच्या सासू गौतमाबाई यासुद्धा कर्तव्य कठोर होत्या. त्याचा प्रभावही अहिल्याबाईंच्यावर पडल्याचे दिसून येतो. मल्हारराव युद्ध मोहिमेवर असताना युद्धाची सविस्तर माहिती अहिल्याबाईस कळवीत असे. दुसऱ्या पत्रात पुढील प्रमाणे उल्लेख मिळतात. ''सोनपत पानपतचे लढाईवर जाते समयी हरी प्रसाद भट परसोई यांनी प्रश्न दिला होता याज करीता भटची यास २५ बिगे जमीन व चार आणे प्रमाणे रोजींदा करुन देण्याबद्दल अहिल्याबाईचे नावे पत्र होते.(०६.०९.१७६२)''[१५]

अशा प्रकारे मल्हारराव पानिपतच्या लढाईवर निघते समयी हरिप्रसाद भट परसाई याने ज्योतिष विषय सल्ला दिला होता. त्यामुळे त्यास २५ बिघे जमीन व रोजचे ४ आणे देण्याविषयी पत्रातून मल्हाररावानी अहिल्याबाईस सांगितले होते.

अशा प्रकारे वरील विश्लेषणाचा विचार करता पुस्तकी शिक्षणापेक्षाही प्रत्यक्ष शिक्षण व्यवहाराला अत्यंत उपयोगी पडते व तेच अहिल्याबाईला जास्त मिळाले. पुस्तकी शिक्षण कथा पुराणांच्या माध्यमातून झालेले होते. परंतु प्रत्यक्षरित्या घेतलेल्या व्यवहारी शिक्षणाचा त्यांना राज्यकारभारात उपयोग झाला. इंदोर स्टेट गॅझेटिअरमध्ये असे म्हटले

आहे की, मल्हारजी हा जेव्हा जेव्हा बाहेर जात असे तेव्हा तो आपला सर्व कारभार सुनेवरच सोपवून जाई. त्यावेळची कागदपत्रे पाहिली म्हणजे तोफांच्या गाडीचे पाटे घेणे अथवा संस्थांच्या बगीच्यास लागणाऱ्या बैलगाड्या घेणे ह्या व्यवहारी गोष्टींचा व राजकीय नेतृत्वाचा विकास झाला.

### नानासाहेब पेशव्यांचा मृत्यू व माधवरावास पेशवेपद :

पानिपतातील दुःखद घटनांमुळे पेशव्यांच्या मनावर जबरदस्त आघात झाला. ते सतत चिडचिड करीत असत रागाचे त्यांना झटके येत. इ. स. १२ जून रोजी नानासाहेब शनिवार वाड्यातून पर्वतीवर रहायला गेले आणि तिथेच त्यांचा इ. स. २३ जून १७६१ पहाटे मृत्यू झाला. पानिपतच्या पराभवाचा सर्वात महत्त्वाचा परिणाम म्हणजे नानासाहेब पेशव्यांचा मृत्यू होय. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचा मुलगा माधवराव याला इ.स. १७ जुलै १७६१ रोजी पेशवाईची वस्त्रे मिळाली. यावेळी माधवरावांचे वय अवघे १६ वर्षाचे असल्याने सुरुवातीला ३ वर्षे कारभार गोपिकाबाईच्या हाती होता. वयाच्या १८ व्या वर्षी संपूर्ण सुत्रे माधवरावांनी हातात घेतली.

### राझसभुवनचे युद्ध : (इ.स. १० ऑक्टोबर १७६३)

मराठ्यांच्या पानिपताच्या पराभवाने निजाम शेफारून त्याने रघुनाथराव व माधवरावाच्या कलहाचा फायदा घेण्याचे ठरविले त्याला ती सुवर्णसंधी मिळाली. पेशव्याने सखाराम बापूच्या साह्याने निजामाशी गनिमी काव्याने लढण्याचे ठरविले. गनिमी काव्याचे भीष्माचार्य मल्हाररावांची गरज पडल्याने माधवराव स्वतः त्यांना आणायला गेले व मल्हारराव मोहिमेत सामील झाले. 'निजामाच्या पक्षात सामील झालेल्या सरदारांना फोडण्याची त्याची समजूत घालून मोगलांच्या कटातून फोडून इकडे आणण्याचे काम सर्व सरदारांनी मल्हारराव होळकरांकडे दिले. त्यांच्या इतका जुना वजनदार सरदार दुसरा कोणीच राहिला नव्हता. मल्हाररावांनी निजामाकडे गेलेल्या गोपाळराव पटवर्धन, मोरोबा फडणीस

पिराजी नाईक व भोसले यांना परत आणले.'[१६] 'इ. स. १० ऑक्टोबर १७६३ रोजी राक्षस भुवन येथे युद्ध होऊन त्या युद्धात निजामाचा पराभव झाला. माधवराव लिहितात 'पूर्वी दोन तीन लढाया झाल्या परंतु मोगलास या तऱ्हेची जरब कधीच बसली नव्हती.'[१७]

पानिपताने हताश न होता मराठ्यांनी पुन्हा कंबर बांधली. या कामात श्रीमंत भोसले माधवराव व सुभेदार मल्हारराव होळकर हे अग्रगण्य होते. माधवरावांनी दक्षिणेकडील मोहीम हाती घेतली व शिंदे व होळकरांनी उत्तरेकडील मोहीम हाती धरली. इ. स. १७६१ पासून इ. स. १७६६ पर्यंत म्हणजे आयुष्याच्या शेवटच्या घडीपर्यंत मल्हाररावांनी उत्तरेच्या राज्याला समर्थपणे धरून मराठ्यांची घडी पुन्हा पूर्ववत बसवून दिली. वरील विश्लेषणावरून मल्हाररावांच्या अंगी असलेल्या विविध नेतृत्व गुणांचा परिचय होतो. ते तत्कालीन कालखंडातील अत्यंत शूर, मुत्सदी, धाडसी नेतृत्व मराठ्यांना लाभले होते.

इ. स. १७६६ मध्ये दुसऱ्यांदा मराठ्यांनी उत्तर मोहीम आखली. या मोहिमेचे नेतृत्व रघुनाथरावराव दादाकडे होते. होळकर शिंदेही सोबत होते परंतु त्याचवेळी मल्हाररावांना कानाची व्यथा झाली. 'अलंपूर प्रांत झासी या मुकामास आल्यावर श्रीमंत सुभेदार बहुतच काहली झाले दैवी मानवी उपाय करून अनुष्ठान दानधर्म बहुत काही केले आयुमर्याद करून गुणास न येता शेवटी भूमीवर उतरले, उपरातीक दुसरे रोजी वैशाख श. ११ मंगळवारी पावणे दोन प्रहर दिवस येता देवाज्ञा झाली.'[१८]

अशा रितीने मल्हाररावांच्या मृत्यूनंतर खंडेरावांचा मुलगा मालेराव याच्या हाती इंदोरचा राज्यकारभार आला. पेशव्यांनी त्याला सुभेदारीची वस्त्रे दिली. 'मालेराव होळकर ह्यांचे नाव सनद की तुम्हावर सर्व प्रकारे कृपा असे तर कैलासवासी मल्हारजी होळकर याप्रमाणे सरंजाम महाल गाव, खेडी, सुदामतप्रमाणे सरहुकूम सरदारीचा बंदोबस्त करून फौज सरंजामनिशी सेवा एकनिष्ठपणे करीत जाणे.'[१९] १७६६ मध्ये मालेरावास सुभेदारीची वस्त्रे दिली. त्यावेळी पेशव्यांनी अहिल्याबाई होळकरांना पत्र पाठविले होते. ते पुढीलप्रमाणे

'सविस्तर गंगाधर यशवंत सांगतील. त्याप्रमाणे तजवीज करून आपला सर्व बंदोबस्त महाल, गाव, खेडी याचा अर्थ पूर्ण करणे.'[२०]

पेशव्यांच्या आदेशानुसार मालेरावास फौज देऊन जवाहरमाल जाटाच्या मोहिमेवर पाठविले. जवाहरमल जाटाने गतवर्षाची खंडणी मान्य केल्याने मालेराव या मोहिमेहून इंदोरला परत आला. परत आल्यावर मात्र, त्याची प्रकृती बिघडली. १७६७ रोजी मालेरावाचे निधन झाले. यानंतर तुकोजींनी मुलखगीरी करावी आणि कारभार अहिल्याबाईंनी करावा असे ठरले. याबाबतचे महादजी शिंदेंचे पत्र अतिशय बोलके आहे ते लिहितात, 'होळकरांच्या घरची चाल सर्वत्र माहितीच आहे. कै. सुभेदार असता गौतमाबाई कारभार करीत होती. ती वारल्यावर पुढे अहिल्याबाई कारभार करू लागली. ही चाल त्यांचे घरी पहिल्यापासोन आहे नवी नाही.'[२१] म्हणजे पर्यायाने तुकोजींना होळकरशाहीची वस्त्रे मिळाली तर सर्व कारभाराचे अधिकार मात्र अहिल्याबाईंच्याच हातात होते. केवळ मोहिमेची जबाबदारीच ती काय तुकोजींरावांकडे होती.

**अहिल्याबाई होळकरांच्या जहागीरीचे स्वरूप :**

होळकरांच्या सरदारीचे राज्यकारभाराच्या दृष्टिकोनातून अहिल्याबाईंच्या कारकिर्दीत प्रामुख्याने दोन भाग होते. १) खासगी जहागीर, २) जाहगिरी ऊर्फ दौलत

**खासगी जहागीर :**

इ. स. १७३३ मध्ये सुभेदार मल्हारराव होळकरांनी बाजीराव पेशवे यांचेकडून आपली पत्नी गौतमाबाईच्या नावाने खासगी जहागीर मागून घेतली. त्या जहागीरीचे उत्पन्न पुढीलप्रमाणे होते. २६३००० प्रो. महेश्वर चोळी व प्रो. इंदूर पो (पैकी) हरसोल व प्रो. महतपूर पो. जगोटी व करंज माकडोन, वगैरे ३६०१० दक्षिण प्रांती चांदवड पो गाव कोरेगाव मोगलाईकडील वगैरे ३६०१० दक्षिण प्रांती चांदवड पो गाव कोरेगाव मोगलाईकडील बरहुकूमयाद २९९०१० यावरून असे दिसून येते की, गौतमाबाईंच्या

काळात खासगी जहागीरीचे उत्पन्न ३ लाख रुपये होते. नंतर खासगी जहागिरीचा प्रदेश वाढत जाऊन अहिल्याबाईच्या कारकिर्दीत १५ लाख रुपये खासगी जहागिरीचे उत्पन्न झाले होते. गौतमाबाईंच्या काळात खासगी जहागिरीचा विनियोग फारसा झालेला आढळत नाही. अशा प्रकारची खासगी उत्पन्नाच्या जहागिरीचे स्वरूप फक्त होळकरांच्या स्त्रियांसाठीच होते. शिंदे, पवार,  भोसले, गायकवाड या सरदारांच्या स्त्रियांना ही व्यवस्था नव्हती. मल्हारराव होळकरांनी पेशव्यांकडून ती मागून घेतली होती. त्यामुळे होळकरांच्या स्त्रिया खासगी उत्पन्नाचे प्रशासकीय काम पहात असत. याचप्रमाणे गौतमाबाईंच्या मृत्यूनंतर खासगी व सरकारी प्रशासन अहिल्याबाईच पहात होत्या. यातूनच त्यांच्या राजकीय व प्रशासकीय नेतृत्व गुणांना वाव मिळाल्याचे संशोधनातून दिसून येते. ‘गौतमाबाईंच्या तीन सवती आणि अहिल्याबाईंच्या ८ सवती यांना मिळालेले धनही या खासगी मिळकतीत सामावलेले असावे कारण त्या सती गेल्यामुळे त्यांचे किडूकमिडूक असेल ते अहिल्याबाईंच्या गंगाजळीत आपोआप आले असावे.’[२२] याशिवाय राजपुरुषांना संक्रांत, दसरा या निमित्ताने आणि इतर मंगल कार्याच्या निमित्ताने भेटी मिळत. अहिल्याबाई स्वतःला या निमित्ताने दर वर्षी चोळीसाठी म्हणून एक लाख तेरा हजार आठशे रुपये मिळत अशारितीने सुभेदार मल्हाररावांच्या मृत्यू समयी १६ कोटी रुपये खासगी जहागिरीचे उत्पन्न शिल्लक असल्याचे उल्लेख मिळतात. या १६ कोटी रुपये शिल्लक असलेल्या रकमेवर आणि १५ लाख रुपये उत्पन्नाच्या खासगी जहागिरीच्या प्रदेशावर अहिल्याबाईंची संपूर्ण मालकी होती. १६ कोटींचे द्रव्य आणि १५ लाखांची मिळकत तसेच प्रत्येक महालातून येणारी शेरी नजराणा असे उत्पन्न खासगी जहागिरीचे होते. प्रत्येक परगण्यातून अहिल्याबाईस दरमणी दोन शेर या हिशोबाने शेरी नजराण्याचे उत्पन्न मिळत असे. इ. स. १७८० साली पुढीलप्रमाणे शेरी नजराण्याचे उत्पन्न मिळाले होते.

‘२४,१४५-९-० प्रांत स्वदेश पैकी

०७८६६-११-० प्रांत नेमाडपैकी

५७,२९७ - ०-० प्रांत माळवापैकी

८९,०३०९, ४-० गावगन्ना

शेरी नजराण्याऐवजी गावे

११६६-१०-० प्रांत दक्षिण भाळनेर येथील मौजे भामरे उखलवाडी

१६१५०-०-० प्रांत हिंदुस्थान

२७,३१६-११-००

११६६-१०-० प्रांत दक्षिण भाळनेर येथील मौजे भामरे उखलवाडी

१६१५०-०-०

---

२७,३१६-११-०० चोळीऐवजी फुटगाव

२६,३०० प्रांत दक्षिण

८७,५०० प्रांत हिंदुस्थान

१३,५०० परगणे सावेर

७००० तालुके केली विजेता परगणे निंबहेडा

१००० तालुके सोमानी प्रांती नखर

१००० मौजे दुर्जनपुरा परगणे हसलपूर

१०००० परगणे कस रिया

१५००० परगणे भोरू पिंपळी प्रांत जैपूर

२०० मौजे सेत

८५,५००

१,१३,८००-०-० तेरीज एकदर जमेबद्दल

८९,३०९-४-० शेरी नजराणा

१,४३,८००-०-० गावगन्ना चोळी व फूटगाव व जहागीर

२५,३१६-०-० प्रांतवार गावगन्ना

२,३०,४२५-१५-० शिवाय भेटी व नजराणे भेटीची पातळे व बागांपैकी उत्पन्न.[२३]

अशा रीतीने प्रांत स्वदेश, प्रांत माळवा, प्रांत नेमाड, प्रांत हिंदुस्थान, प्रांत दक्षिण येथून येणारी शेरी नजराण्याचे उत्पन्न आणि खासगी जहागिरीतील महत्त्वाचे उत्पन्न खासगीकडे जमा होत असे. खासगी जहागिरीच्या कामकाजासाठी निराळी स्वतंत्र यंत्रणा कार्यरत होती. यातूनच अहिल्याबाईंचे प्रशासकीय नेतृत्व घडत होते. खासगी जहागिरीचा हिशोब सरकारी हिशाबापेक्षा वेगळा ठेवला जात असे. त्यासाठी स्वतंत्र नोकरवर्गाची नेमणूक करण्यात आलेली होती. अहिल्याबाईंच्या काळात गोविंदपंत गानू हे खासगी जहागिरीचे कारभारी म्हणून कामकाज पहात होते.

अहिल्याबाईंनी जी लोककल्याणकारी कामे केली जे दानधर्म केला, संपूर्ण भारतभर जी मंदिरे बांधली तो सर्व खर्च खासगीच्या उत्पन्नातून केला, असे संशोधनातून स्पष्ट होते.

सुभेदार मल्हाररावांच्या कारकिर्दीत त्यांच्या जहागिरीत वाढ म्हणजे खासगीच्या जहागिरीतही वाढ होत असे हीच पद्धत अहिल्याबाईच्या काळातही अस्तित्वात होती. त्यामुळे दौलतीच्या उत्पन्नाबरोबर खासगी जहागिरीचेही उत्पन्न वाढे. उदा. 'इ. स. १७७० माधवराव रघुनाथ कमाविसदार परगणे मजकूर येथील गाव साल. मजुकरापासून खासगीकडे ठेवित असे... एकूण अठरा गावांची लावणी आबादी उत्तम होणेचा बंदोबस्त करणे. तेथील कामकाज तहसील वगैरे निराळी दाखवित जाणे.'[२४] अशा रीतीने खासगीच्या महालात भर पडत असे. गौतमाबाईंच्या कारकिर्दीत गौतमाबाई आणि सुभेदार मल्हारराव होळकरांच्या इतर पत्नी यांचे द्रव्य खासगीच्या जहागिरीत जमा होत होते. याशिवाय सुभेदार मल्हारराव होळकरांची जी खासगी गावे होती यांचे उत्पन्न सरकारात जमा होता. खासगीत जमा होत असे तसेच अहिल्याबाईंना अनेक राजपूत राजे, खुद्द मोगल बादशहा यांच्याकडून खासगी

इनाम मिळाले होते. वरील विश्लेषणाचा विचार करता अहिल्याबाईंचे वैयक्तिक राहणी अत्यंत साधी होती. त्यांच्याकडे मोठ्या प्रमाणात धन-संपत्ती असूनही त्या कधी विलासी जीवनात राहिल्या नाहीत. हा त्यांच्या व्यक्तिमत्वातील गुण दिसून येतो.

## २. दौलत, सरंजामी प्रांत आणि जहागीर :

सुभेदार मल्हाररावांच्या मृत्यूसमयी ७४११ लाख रुपये उत्पन्न होते. तो अहिल्याबाईंच्या कारकिर्दीत १ कोटी ५११ लाखांच्या आसपास झाला. संपूर्ण माळव्याचे उत्पन्न १ कोटी असून त्यापैकी निम्यापेक्षा जास्त माळवा होळकरांच्या ताब्यात होता. महेश्वर, इंदोरे, नेमावर, पंचमहाल, देपालपूर हा संमपूल बेरमा, सुदरणी, नारायणगड, रामपुरा, भानपुरा, सावेर, तराना, कामथा, महिदपूर, जीरापूर, माचलपूर, पिंपलोर इत्यादी उत्तरेकडील परगाणे तर दक्षिणेकडील वाफगाव, चांदवड, संगमनेर, अंबड, वेरूळ, अडगाव, खानदेशात खुलतानपर, नंदूरबार, नेमाडमध्ये खरगोन, सनावद, बढवाल, सेंधवा, भीवनगाव, जामली, इस्लामाबाद, हवेली, रामपुऱ्यात टोक, तोडा, रामपुरा, अन्य प्रदेशात झाबुका, जाबदा, सिरोंज हे प्रदेश होळकरांच्या जहागिरीचे होते.

खासगी जहागिरी प्रमाणेच दौलतीच्या उत्पन्नावरही अहिल्याबाईंचे नियंत्रण होते. तथापि राज्यकारभाराच्या सोयीसाठी दौलतीचे तीन भाग करण्यात आले होते. सातपुड्याच्या दक्षिणेचा भाग... स्वदेश व खानदेश, सातपुड्याचा भाग महेश्वर व जवळपासचा प्रदेश, महेश्वरच्या पलीकडचा उत्तर विभाग प्रांत, इंदोर, तराणा व राजपुतन्यातील काही प्रदेश या ठिकाणी अहिल्याबाईंनी प्रशासनात केलेल्या काटेकोर नियोजन लक्षात येते. तुकोजी होळकर जेव्हा दक्षिण भागाची व्यवस्था पाही तेव्हा उत्तर विभागाची व्यवस्था अहिल्याबाई पहात. तुकोजी उत्तरेत असेल तर तो उत्तरेची व्यवस्था पहात असे. त्यावेळी अहिल्याबाई मध्यविभाग आणि दक्षिण विभागाची व्यवस्था पहात असे. मध्य विभागावर अहिल्याबाईचे कायम नियंत्रण असले तरी माळव्यातील तीन महाल,

नेमाडमधील महाल असे चार महालाखेरीज संपूर्ण माळव्यातील होळकरांचा प्रदेश तुकोजी आपल्या नियंत्रणाखाली पहात असे. याशिवाय देशीचे व खानदेशाचे २५ लाख उत्पन्नाचे महाल तुकोजीकडे होते. हिंदुस्थानातील प्रदेशाचा कारभारही तुकोजीकडेच होता. तुकोजी उत्तरेत स्वारीत असतानाही अहिल्याबाईंनी देशीच्या महालाची व्यवस्था पाहिली. परंतु कारभारात हस्तक्षेप मात्र केला नाही. परंतु निकड भासली म्हणजे देशीच्या कामविसदारांना बोलावून हिशोब केलेत आणि ते तुकोजीकडे रवाना केले आणि खासगी बरोबरच सरकारी दौलतीचे व्यवहार चोख ठेवले. वरील विश्लेषणावरून अहिल्याबाईंचे प्रशासकीय नेतृत्वाचे विविध पैलू या ठिकाणी लक्षात येतात.

## तुकोजी होळकर :

सरकारी कागदपत्रात तुकोजी होळकरांचा पहिला उल्लेख इ. स. १७५० मध्ये येतो. नानासाहेब पेशव्यांच्या कारकिर्दीचे प्रारंभीस ते पुढे येतात 'मल्हारराव सुभेदार झाले तेव्हा त्यांच्या हाताखाली तुकोजीराव वाढत होते. इ. स. १७६० मध्ये अहमदनगर जिल्ह्यात कोळ्यांनी मोठी बंडाळी केली होती. त्याचा बिमोड तुकोजीरावांनी मोठ्या शिताफिने केल्याचा उल्लेख त्या जिल्ह्याच्या गॅझिटीयरमध्ये केलेला आहे. (इ.स. १७७०)[२५] तुकोजी होळकरांचा उल्लेख मल्हारराव होळकरांच्या सोबत राजपुतण्याच्या स्वारीत आढळतो. तत्पूर्वी भवानी शंकर बक्षीच्या रोजनिशीतही तुकोजीबदल्लचा गोषवारा दिला आहे. 'मल्हारराव बांडे साहेबांकडे अधिकारी झाल्यावर त्यांनी आझमातून आणखी लोकांची जमवाजमव केली. नंतर तो मौजै वाफगावी तुकोजीराव होळकर राहात होता. त्याचजवळ गेला. तुकोजीराव होळकर हाही दहा स्वार आपले बरोबर घेऊन त्याजजवळ चाकरीस राहिला.'[२६] तुकोजी मल्हाररावांजवळ काम करीत होते. आपल्या कर्तबगारीने व स्वभावाने, स्वामीभक्तीने तुकोजीने मल्हाररावांचा विश्वास संपादन केला होता. पेशव्यांच्या मंजुरीने अहिल्याबाईने कारभार करावा आणि तुकोजीने सरदारी घेऊन सैन्यानिशी पेशव्यांची चाकरी

करावी अशी अधिकाराची दुहेरी व्यवस्था केली होती. तुकोजी मल्हाररावांच्या वंशात जन्माला आला नव्हता. तो शूर होता. परंतु स्वतःची निर्णय शक्ती नसल्याने तो त्याची पत्नी रखमाबाई कारभारी नारो गणेश, महादजी शिंदे व नाना फडणीस यांच्या सल्याने वागत असे, मुत्सदेगिरीचा त्याच्या ठिकाणी अभाव होता. सैन्याचा कारभार त्याच्याकडे असल्याने त्याला पेशव्यांच्या आज्ञेनुसार मोहिमेवर जावे लागे.

**तुकोजी होळकरास पेशव्याकडून सनद : (इ.स. १८-५-१७६७)**

'तुकाजी होळकर यास ६४ जिल्हेजी वस्त्रे दिली. नवी जागीर पौ सामाहाल सरकारात घेईन दहा लाख रुपये करार केले. त्या उपरी हाली मनसबा ठरला की गंगाधर यशवंत व विष्णू महादेव या उभयताचे विद्यमाने नजर पंधरा लक्ष रुपये द्यावे आणि बरोबर नवा जुना सरंजामपैकी देवपूर वर्क तीन महाल सरकारत द्यावे बाकी पूर्ववत प्रमाणे करावे.'[२७] 'इ. स. ५ जून १७६७ तुकोजी होळकर याचे नावे जाबकी तुम्हास मालेराव होळकर मृत्यू पावले त्यांचे सरदारीचा बंदोबस्त सांगोन ऐवज करार १६६२००० रुपये येऊन करार केल्यापैकी दहा लक्ष रुपये नजर पै सरकार जया जाहाला असेल म्हणोन.'[२८] १७६७ रोजी राघोबदादा पेशवे तुकोजींना लिहितात मालेराव होळकर मृत्यू पावले त्यास सरदारीचा बंदोबस्त पूर्ववत प्रमाणे तुमच्या तुम्हाकडे सांगून पेशजी कै. मल्हारराव होळकरांकडे, सरंजाम नवाजुना, वतनी, इमानी, बंदोबस्त चालत आल्याप्रमाणे तुम्हाकडे करार असे सेवा एक निष्ठेने करीत जाणे. दादांचा हा हुकूम मान्य होईल की नाही याची शंका वाटून तोच करार मागाहून इ.स. २१-८-१७६७ रोजी तुकोजींनी थोरले माधवराव पेशव्याकडून ताजा करवून घेतला.

पेशव्यांच्या आज्ञेनुसार तुकोजीला मोहिमेवर जावे लागे. होळकरांच्या राज्याचे १) सातपुड्याच्या दक्षिणेकडील २) सातपुड्याच्या उत्तरेकडच्या महेश्वर ३) राजपुतण्यालगतचा असे तीन भाग पाडलेले होते. तुकोजी दक्षिणेकडे असला तरी तिकडील वसूल त्याच्याकडे

जात असे. उत्तरेस असला तर उत्तरेकडील वसूल तो घेत असे बाकीचा अहिल्याबाईकडे असून ती त्याला लष्करी खर्च देत असे. दौलतीचा खजीना अहिल्याबाईच्या ताब्यात होता. जमा-खर्चाचा हिशोब त्या चोख ठेवीत असे. तुकोजी मुत्सदी नसल्यामुळे उपद्व्यापी मंडळींनी त्याचे मन कलुषीत केले त्यामुळे अहिल्याबाई तुकोजी यांच्यात मतभेद निर्माण झाले होते.

## तुकोजीची उत्तरेकडील कामगिरी :

१४ जानेवारी १७६१ रोजी पानिपतच्या युद्धात मराठ्यांच्या झालेल्या दारूण पराभवाचा परिणाम केवळ दक्षिणेच्या राजकारणारच नव्हे तर उत्तरेच्या राजकारणावरही होणे स्वाभाविकच होते. ह्या पराभवामुळे आणि झालेल्या अपार हानीमुळे मराठे निष्प्रभ व दुबळे झाल्याचे पाहून दक्षिणेस निजाम आणि हैदर याने वर्चस्व स्थापण्यास सुरुवात केली. त्याचप्रमाणे दिल्ली, आग्रा, दोआब, बुंदेल खंड, माळवा ह्या भागातील लहानमोठ्या राज्यकर्त्यांनी उत्तरेकडील मराठा प्रभुत्व संपुष्टात आणण्याचे प्रयत्न सुरू केले होते. श्रीमंत माधवराव पेशव्यांचे स्वप्न दक्षिणेपुरतेच मर्यादित नव्हते तर उत्तरेतही मराठ्यांचा प्रभाव पूर्ववत प्रस्थापित करण्याचा होता आणि म्हणून 'पेशवे माधवरावांनी दक्षिण कामगिरी स्वतः स्वीकारून उत्तरेच्या कामगिरीवर रामचंद्र गणेश कानडे आणि विसाजी कृष्णा बिनीवाले ह्यांच्या नेतृत्वात इ. स. १७६९ च्या एप्रिल महिन्यात एक मोठी सेना रवाना केली. ह्यांच्या मदतीला तुकोजी होता आणि महादजी शिंदेही होते. उत्तरेत आल्यावर रामचंद्र गणेश कानडे व होळकर शिंदे ह्या तिघांनी तीन कार्यक्रम वाटून घेतले. कानडे बुंदेल खंडाकडे वळले होळकर बुंदीकोट्याकडे, शिंदे उदेपुराकडे आपापल्या परीने खंडणी वसुलीसाठी ही मंडळी गुंतील होती.'[२९] मराठ्यांच्या उत्तरेतील आगमनामुळे नजीबखान घाबरला. पानिपतच्या पराभवाचा बदला मराठे घेतील व भीतीपोटी त्याने तुकोजी होळकरांमार्फत मराठ्यांशी मैत्री केली.

जाटांचे परिपत्य इ. स. १७६१ च्या अखेरीस सर्व फौजा निरनिराळ्या कामगिऱ्या आटपून चंबलपूर एकत्र येऊन जाटाचे मुलुखात शिरल्या. ५ एप्रिल १७७० रोजी गोवर्धन येथे जाट आणि मराठे ह्यांच्यात झालेल्या लढाईत जाटांचा पराभव झाला. त्यांची संपूर्ण फौज लुटली गेली. 'नवलसिंगांकडे मिस्टर सुमरू व फ्रेंच जनरल गाडेल हे युरोपियन अंमलदार होते. ह्यांचा सुभेदार तुकोजीरावांनी पराभव केला.'[३०] नवलसिंग जाटाच्या पराभवामुळे मराठ्यांच्या मार्गातील एक महत्त्वाचा काटा नाहीसा झाला. त्यानंतर लगेच मराठ्यांनी आग्रा आणि मथुरा ही ठिकाणे हस्तगत केली. एप्रिल १७७० मध्ये मराठे यमुना नंदी ओलांडून अहमदखान बंगशाच्या प्रदेशात शिरले. ह्यावेळी नजीबखान अहमदखान बंग ह्यांच्याशी संधान साधून मराठ्यांचा घात करण्याच्या गुप्त कारवाया करीतच होता. इ.स. ३१ ऑक्टोबर १७७० रोजी नजीबखानाचा मृत्यू झाला. त्याचा मुलगा झबेतखान हा पित्याच्या संपत्ती व सत्ता यांचा वारस झाला. झाबेखानाने बादशहा शहाआलमकडून मीर बक्षीचे पद जबरदस्तीने मिळवून घेतले. मराठ्यांना तोंड देणे अशक्य होऊन अहमदखान बंगशाने प्राणाची भीक मागत पानिपत युद्धापूर्वीच मराठ्यांच्या ताब्यात असलेला दोआबातील सर्व प्रदेश परत त्यांना दिला. त्यामुळे दौआबात मराठ्यांची सत्ता आणि प्रतिष्ठा प्रस्थापित झाली तसेच जाट रोहिले नामोहरम झाले. नजीबझौला व बंगशा मृत्यू पावले. इंग्रज कंपनी सरकार तटस्थ राहिले. अशा प्रकारे तुकोजी शूर व पराक्रमी होता हे दिसून येते.

### अहिल्याबाईच्या विरोधात चंद्रवतांनी केलेला उठाव :

चंद्रावत चंद्र वंशातले म्हणून त्यांना चंद्रावत हे नाव मिळाले. सुमारे सातशे वर्षापूर्वी उदयपूरच्या घराण्यात मुनसी नावाचा शूर राणा झाला. त्याला चंद्र नावाचा एक मुलगा होता. त्याने रामपूर, बानपूर येथे आपले राज्य स्थापन केले होते. चंद्रावत उदयपूर घराण्यातील होते. नवव्या शतकापासून तर चौदाव्या शतकापर्यंत हा जिल्हा परमार राजपूतांच्या ताब्यात होता. पंधराव्या शतकात माळव्याच्या सुलतानाच्या ताब्यात व नंतर उदयपूरकडे आला.

'उदयपूर, जयपूर, जोधपूर या संस्थानचा आपसांत तह झाला त्यानुसार सवाई जयसिंगानंतर. त्याचा मुलगा माधेसिंगास ती गादी मिळावी असे ठरले परंतु मोठा मुलगा ईश्वरसिंहाने गादी मिळविली. १७२९ मध्ये उदयपूरला राणाने माधेसिंहास हा परगणा दिला. माधेसिंहाला मल्हारराव होळकरांनी जयपूरची गादी मिळवून दिली. म्हणून माधेसिंहाने १७४९ मध्ये मल्हाररावाला परगणा दिला.'[३१] माधेसिंहाने जयपूरच्या गादीवर बसल्यानंतर हा परगणा सुभेदार मल्हारराव होळकरांना त्यांच्या मदतीच्या मोबदल्यात दिला होता. त्यामुळे चंद्रवतास मोठा पेच पडला. उदयपूर, चंद्रावत व होळकर या तिघांचा या प्रश्नाशी संबंध आला परंतु मल्हाररावांपुढे आपला निभाव लागणार नाही म्हणून ते स्वस्थ बसले तरी त्यांच्या मनात रोश कायम होता.

इ.स. १७६६ मध्ये मल्हाररावांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मनातील सुडाची भावना जागृत झाली. मालेरावाच्या मृत्यूनंतर सत्ता अहिल्याबाईकडे आली तेव्हा आपल्याला अनुकूल परिस्थिती आहे, असे वाटून त्यांनी उठाव करायला सुरुवात केली. 'चंद्रवतांना शांत करण्यासाठी मल्हारराव होळकर यांनी लक्ष्मण सिंह चंद्रवताला २१ गावांची जहागिरी दिली होती आणि रामपुरा येथे गोविंदकृष्णला कमाविसदार नेमले होते.'[३२]

मालेरावाच्या मृत्यूनंतर निर्माण झालेल्या परिस्थितीचा फायदा घेऊन चंद्रावतांनी इ. स. १७७१ मध्ये पहिला उठाव केला. यावेळी तुकोजी होळकर उत्तरेतील मोहिमेत गुंतले असल्यामुळे अहिल्याबाई स्वतः पुढाकार घेऊन शरीफभाईच्या नेतृत्वाखाली सैन्य देऊन पाठविले. मेवाडच्या सैन्याचा सामना करण्यासाठी राधोरामचंद्रला तोफासह पुढे येण्याचा आदेश दिला. तो निमच या गावी गोविंदकृष्णच्या सैन्याला येऊन मिळाला. होळकरांच्या सैन्याने जावेदला वेढा दिला. त्यामुळे राजपूत सैन्य घेरले गेले. नंतर चारदिवसांनी केशरसिंह घाबरला व आत्मसमर्थन करून तहाच्या वाटाघाटी सुरू केल्या. ही माहिती कळताच राणा आरिसिंह जावेदला आला. अहिल्याबाईंनी राधोरामचंद्रला निरोप पाठविला की राणाशी

मैत्री करून सन्मानपूर्वक व्यवहार करावा. त्याने राणाशी करार केला आणि त्याला चितोड परगण्यातील अचोलपर्यंत पोहोचविले. १७७१ मध्ये राणा अरिसिंहाशी समेट होत असताना चंद्रावतनी आपले सामर्थ्य वाढवून मल्हारगड व मन्दसारच्यामध्ये पळसुडा येथे होळकरांच्या सैन्याचा पराभव केला. अहिल्याबाईने त्याला शह देण्याची तयारी सुरू केली. तीन महिन्यानंतर आक्रमण करून पराभव केला. तेव्हा अरिसिंह व रावतासिंहाने अहिल्याबाईस कळविले की, मेवाड व चंद्रावतांशी तह करण्यास आपला राजदूत पाठवावा. 'चितोडहून राजश्री रावत भीमसेनाने पत्रे पाठविले की, चंद्रवतांशी जाबसालासाठी तुम्हाकडील माणूस पाठवून देणे.'[३३] त्यानुसार नारोविश्वनाथ याला पाठविण्यात आले.

अहिल्याबाईंनी चंद्रवताबरोबर तह करून पुन्हा त्यास त्याच्या प्रदेशावर बसवून दिले. 'उदयपूरच्या अरिसिंहाने होळकरांचे वर्चस्व मान्य करून अहिल्याबाईस आपली धर्म बहीण मानून साडी-चोळीसाठी मेवाडची तीन गावे टाटरमालो, बिनोता, ही गावे इनाम दिली.'[३४] चंद्रवतांशी तह केला असला तरी पुन्हा इ. स. १७८३ मध्ये चंद्रावतांनी पुन्हा उठाव केला. १७८२ मध्ये भिल्ल आणि सोंधी यांना घेऊन चंद्रावतांनी होळकरांच्या राज्यातील गावे लुटायला सुरुवात केली. तेव्हा अहिल्याबाईंना आबाजी विष्णुला सैन्य देऊन पाठविले. त्याने पडदा आणि मनासा येथील चंद्रावतांची तटबंदी पाडून टाकली. व्यंकोजी बाबूरावला घोडदळ देऊन पाठविले तरी उपयोग झाला नाही. 'इ.स. १७८३ मध्ये भाटेखेडीचा विजयसिंह चंद्रावत आणि दत्तोजीचा सालमसिंह यांनी बंड करून कंजाडी गाव ताब्यात घेतले. तेव्हा तनाजी भास्करासोबत सैन्य पाठविले. लक्ष्मण मानदेवला दोनशे घोडेस्वार, एक हजार पायदळ व दोन तोफा देऊन रवाना केले. झालेल्या लढाईत चंद्रावत पराभूत घेऊन त्यांनी तह केला. त्यात असे ठरले की, यानंतर विजयसिंह व लक्ष्मणसिंह युद्ध करणार नाहीत. रामपुऱ्यातील होळकरांच्या मामलेदाराला सहकार्य करतील.'[३५]

वरील विश्लेषणाचा विचार करता दोन वेळा चंद्रावताने अहिल्याबाईच्या राज्यावर स्वारी केली. परंतु अहिल्याबाईने त्याला आपल्या सैन्याशी चोख प्रतिउत्तर दिले. अहिल्याबाई होळकर यांच्या सामर्थ्यापुढे चंद्रावत दबून गेले तरी संघर्षासाठी योग्य वेळीची प्रतिज्ञा करीत होते. दोन वेळा चंद्रावताचा उठाव मोडून काढण्यात आला. परंतु अहिल्याबाईनी त्याला दोन्ही वेळा संधी देऊनही चंद्रावताने पुन्हा उठाव केला. १७८७ च्या लालसोटच्या युद्धात राजपुतांनी महादजीचा पराभव केला. या संधीचा फायदा घेऊन जयपूर, जोधपूर व उदयपूरने राजपुतण्यातून मराठ्यांचे वर्चस्व समाप्त करण्याचे ठरविले. मेवाडच्या राणाने १७८८ मध्ये पालदास मेहताच्या नेतृत्वाखाली होळकरांना दिलेले किंवा त्यांनी घेतलेले प्रदेश पैसा मिळविण्याच्या उद्देशाने सैन्य पाठविले. त्यांनी निंबहेडा जिंकून जावदला वेढा दिला. तेथील शिवाजीनाना कमाविसदार याने शरणागती स्वीकारली म्हणून त्याला नगराबाहेर जाऊ दिले. बेगू-सिंगोली येथील सैन्याचीही हकालपट्टी केली. याचवेळी रामपुऱ्याचे चंद्रावतही बंडाला सिद्ध झाले. राजपूत जेव्हा चकरड्या व चलदू गावापर्यंत आले तेव्हा चंद्रावत त्यांना येऊन मिळाले आणि दोघांनी मिळून होळकरांच्या प्रांतात धुमाकूळ घातला. अहिल्याबाईने आबाजीपंत आणि राधोरणछोड सोबत सैन्य पाठविले. चकरदा येथे जोरदार युद्ध होऊन आबाजीपंत मारला गेला. राजपूत सैन्य आक्रमक बनले होते. चंद्रावतांचा त्रास कायमचा मिटवून, टाकण्यासाठी अहिल्याबाईंनी शरीफभाई यांस पेंढाऱ्याचे सैन्य देऊन पाठविले व स्वतः रणक्षेत्राकडे निघाली. सैन्याला प्रोत्साहित केले आणि बजावून सांगितले. "मेले हो तोंड दाखवावयास आला,तर मेकसू घालून मारून टाकीन मेवाड होते की नव्हते असे करून टाका."[३६] यावेळी अहिल्याबाई स्वतः युद्धावर गेल्या होत्या. रोज फौजेची हजेरी घेणे स्वार रवाना करणे, सैन्याला प्रोत्साहित करणे, व्यूहरचना करणे या सर्व गोष्टींकडे स्वतः जातीने लक्ष देत होत्या. तुळाजी शिंदे याला पाच हजार घोडेस्वारासह शिवाजी नानाच्या मदतीने पाठविले. पराभवाच्या वेळी किंवा दमलेल्या

शस्त्रूवर मारा करताना उपयोगी पडावे म्हणून रणक्षेत्रापासून काही अंतरावर नाला व झाडीत तीन हजार सैन्य ठेवले. हकींयाखाल जवळ चल्दू या गावी येथे युद्ध झाले. राजपूत सैन्याचा पराभव झाला. मालदास मेहता, कुशलसिंह मारले गेले. सुतलानसिंह जखमी होऊन कैद झाला. तेथून पुढे दाऊन निंबहेडा व रानीखेडा जिंकले. चंद्रवतांना दडपण्यासाठी रामपुऱ्यास सैन्य पाठविले. सैन्याने तोफांचा मारा करून मोर्चेबंदी मोडून काढली. भवानीसिंहाचे भाऊ 'सोभागसिंह हा हाती सापडला. त्याने रदबदली फार केली परंतु न ऐकता सोभागसिंह चंद्रावतास तोफेच्या तोंडी देऊन उडवून दिला.'[३७] चंद्रवतांनी यापुढे त्रास देऊ नये म्हणून अहिल्याबाईंनी सोभागसिंहास तोफेच्या तोंडी दिली. चंद्रावतांची जहांगीर जप्त केली. पुढे १७९२ मध्ये भवानिसिंह चंद्रावतानी चांगली वागणूक ठेवावी. बंड करू नये. मामलेदारास मदत करावी, नियमित वार्षिक कर द्यावा या अटीवर जहागीर परत दिली.

अशाप्रकारे दक्षिण राजस्थान व मेवाड येथे अहिल्याबाई होळकरांनी आपला वचक निर्माण केला. अहिल्याबाईंच्या शौर्याच्या, पराक्रमाच्या, मुत्सदेगिरीच्या बातम्या पुणे दरबारापर्यंत पोहोचल्या. तेव्हा 'नाना फडणवीस यास वर्तमान समजून तोफा सोडून शिरेदरबार बाईसाहेबांचे स्तुतीस्त्रोत्र सहा घटकापर्यंत केले. शापादपि शरादपि असे बायकांत अहिल्याबाई दिसण्यात आली. आज पावेतो स्नान संध्या धर्माची प्रवृत्ती ऐकण्यात येत होती. आज मात्र पराक्रमाची गोष्ट मोठीच केली. पुण्याचा दरवाजा म्हणजे महिष्पती नर्मदा तीर ते आम्हास आज समजले संपूर्ण मानकरी सरदारांनी माना डोलवल्या.'[३८] अशारितीने अहिल्याबाईंचा पुणे दरबारी गौरव केला.

वरील विवेचनाचा विचार करता अहिल्याबाईंच्या राज्यावर तीनदा चंद्रवतांनी स्वारी केली. तीन्ही वेळेस तुकोजी होळकर मोहिमेवर होते. अशा वेळी आपल्या मुत्सदेगिरीने अहिल्याबाईने चंद्रवताचे बंड मोडून काढले. अहिल्याबाईच्या संपूर्ण कारकिर्दीत फक्त चंद्रावतीचीच बंडाळी झाली. त्यांच्या कारकिर्दीत कोणत्याही इतर परकीय शक्तीने

आक्रमण केले नाही. परंतु आवश्यकता असेल तेव्हा कर्तव्यकठोर होऊन शह दिला. अहिल्याबाई पेशव्यांनी काढलेल्या मोहिमेवर गेल्या नाहीत कारण तुकोजीच्या नेतृत्वाखाली होळकरांची फौज मोहिमेवर जात असे. तुकोजी लष्करी मोहिमेवर जात असले तरी तुकोजीला युद्धविषयक, राजकारणविषयक सल्ला अहिल्याबाई पाठवित असत. परराज्याशी युद्द व तह इत्यादी कामे त्या स्वतः जातीने करत. परकीय संस्थानात वकील यांच्या नेमणुका अहिल्याबाई स्वतः करीत. या ठिकाणी अहिल्याबाईची परराष्ट्रनितीचे धोरण स्पष्ट होते. त्यांनी नेहमी शांततेचा प्रयत्न केला. स्वतःहून कोणाच्या राज्यावर आक्रमण केले नाही. काही अभ्यासकाने अहिल्याबाईंच्या धार्मिक धोरणाबाबत टीका केली आहे. परंतु त्या फक्त धार्मिक नव्हत्या वेळेप्रसंगी स्वतः रणांगणावर जाऊन रणनिती आखली म्हणूनच नाना फडणविसांनी त्यांच्या राजनितीचा गौरव केल्याचे उल्लेख मिळतात. यावरून अहिल्याबाईंची राजकीय निती स्पष्ट होते. त्यांनी सैनिकाला स्वतः जाऊन प्रोत्साहित केले. त्यांच्या कर्तव्याच्या जाणीव त्यांना करून दिली. अहिल्याबाईचे शेजारील राज्यांशी अत्यंत मैत्रीपूर्ण संबंध होते. टिपू, निजाम यांनी अहिल्याबाईंच्या राज्यावर कधीही आक्रमण केले नाही. उलट काही मुस्लिम राजे अहिल्याबाईंच्याकडे विश्रांतीसाठी येत असल्याचे उल्लेख मिळतात यावरून तत्कालीन कालखंडात मोठ्या प्रमाणात धर्माची विषमता असूनही त्यांनी खऱ्या अर्थाने धर्मनिरपेक्षता तत्वांचा अवलंब केला.

### अहिल्याबाई तुकोजीमध्ये मतभेद :

मल्हाररावांच्या मृत्यूनंतर सर्व राज्यकारभार स्वतः अहिल्याबाई करीत होत्या. लष्करी कामगिरीवर मात्र तुकोजी जात असे म्हणजे होळकरांच्या घरात मालेरावांच्या मृत्यूनंतर दुहेरी शासनव्यवस्था स्थापन झाली. ही दुहेरी व्यवस्था विलक्षण यशस्वी झाली नाही. तुकोजी आणि अहिल्याबाई यांच्यात तीस वर्षात फारसे पटले नाही असे संशोधनातून दिसून येते. कारण त्या भांडणात नाना फडणवीस व महादजी शिंदे हे पडल्याने चौरंगी झगडा

सुरू झाला तो तीस वर्ष राज्याला भोवला. सुरुवातीला तुकोजी व अहिल्याबाई संबंध चांगले होते पण पुढे कारभारावरून व पैशावरून त्यांच्यात वाद होऊ लागला. 'नाना व महादजी ही मंडळी तुकोजींना अनुकुल असल्यामुळे तुकोजीच मालक अशी मराठ्यांची समजूत होती. लैकिकी तेच मल्हाररावाचे पुत्र मानले गेले. त्यांचा उल्लेखही तसाच होत गेला.'[३९] 'तुकोजीचा शिक्काही अहिल्याबाईच्या विद्यमानाने श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर मल्हारजी सुत तुकोजी होळकर'[४०] असा तयार झालेला होता. अगदी शेवटपर्यंत तुकोजींना मल्हाररावाचा पुत्र म्हटले जात होते. अहिल्याबाईचे व तुकोजी मतभेदास स्वतः तुकोजी त्याचा दिवाण नारो गणेशही जबाबदार होता.

तुकोजीची पत्नी रखमाबाई महत्त्वकांक्षी स्त्री होती. आपला पती लष्करी जबाबदारी सांभाळतो. मोहिमेवर जातो तेव्हा आपल्याला कारभाराची संधी मिळावी असे रखमाबाईला वाटत असे. नारो गणेश तिच्या महत्त्वकांक्षेला खतपाणी घालण्याचे काम करीत असे. अहिल्याबाई व तुकोजी यांच्यात मतभेद झाले की नारो गणेश त्याचा फायदा घेत असे. असे अभ्यासावरून दिसून येते. माणसाची निवड करण्याची हातोटी अहिल्याबाईला विलक्षण होती. त्यामुळे अहिल्याबाईंनी निवड केलेली व त्यांनी कामावर नेमलेली माणसे आजन्म त्यांच्या हाताखाली राबली. 'शिवाजी गोपाळ हा अशा माणसांपैकी एक होता. अहिल्याबाईंचा त्याच्यावर पूर्ण विश्वास होता. शिवाजी गोपाळामुळे आपलेपण कमी होणार अशी शंका नारो गणेशाच्या मनात उत्पन्न झाली म्हणून नारो गणेशांनी असे कारस्थान केली की अहिल्याबाईला न विचारता पुणे दरबाराकडून शिवाजी गोपाळची बदली पुण्यास केली आणि त्याबाबतीत तुकोजीने विशेष चौकशी न करता ह्या बदलीस संमती दिली. हा आपल्या अधिकार पदाचा अपमान आहे, असे अहिल्याबाईस वाटले.'[४१] त्यामुळे अहिल्याबाई तुकोजीरावावर नाराज झाल्या. नारो गणेशाच्या प्रामाणिकपणाबद्दल अहिल्याबाई साशंक होत्या. त्यामुळे त्याच्यावर गैरव्यवहाराचा आरोप ठेवून नारो गणेश

यास अहिल्याबाईंनी अटक केली होती. अहिल्याबाईंनी नारो गणेशाच्या जागेवर आपला माणूस दादाजीची नेमणूक केली. दादाजीने सहा महिने काम केले परंतु दादाजी व तुकोजी या दोघांचे पटत नव्हते. याचवेळेस 'नारो गणेशाने मोठ्या चलाखीने महादजीशी संधान साधून स्वतःची सुटका करून घेतली आणि महादजीच्या वशिल्याने नारो गणेश पुनः तुकोजीचा दिवाण झाला होता.''[४२] याबाबतीत तुकोजींनी अहिल्याबाईस विचारले नव्हते. ही गोष्ट अहिल्याबाईस मतभेद होण्यास आणखी तीव्र झाली. 'इ.स. १७८० मध्ये तुकोजी गुजरातच्या स्वारीवरून परत आल्यावर महेश्वरास अहिल्याबाईस न भेटता परस्पर निघून गेला आणि महादजी शिंदे यास इंदोरास बोलावून तुकोजीने त्याच्याशी बोलणी केली. ''तुम्ही आमचे बंधू ते पक्षी मातुश्री साहेबांकडे जाऊन आपसातील सफाई करावी.''[४३] यावरती महादजी शिंदे यांनी उत्तर दिले ''श्रीमंत, मोगल, भोसले याप्रकरणी अधिक ऊणे जाण असल्यास त्यातील व्यवस्था आपले मनोगतानुरूप घडून येईल. पण बाईसाहेबापाशी जाऊ यश यावे असे मनोत्साहास वाटत नाही.''[४४] वरील विश्लेषणावरून अहिल्याबाई व तुकोजी मतभेद स्पष्ट होतात.

इ. स. १७७५-१७८२ मध्ये प्रथम इंग्रज-मराठा युद्ध झाले. त्यातही तुकोजीच्या सैन्याचा खर्च अतोनात झाला होता. तेव्हा तुकोजीनी अहिल्याबाईकडे पैशाची मागणी केली परंतु मागणीप्रमाणे अहिल्याबाईंकडून पैसा येईना तेव्हा तुकोजीने पुणे दरबाराकडे तक्रार केली. ''बाईकडून वेळेवर पैसा मिळत नव्हता फौज उपाशी मरत असता बाई भटभिक्षुकांच्या नादी लागून बराच पैसा धर्मात खर्च करीत आहे.''[४५] 'अहिल्याबाई दान धर्मात अमाप पैसा खर्च करते परंतु फौजेच्या खर्चात काटकसर करते असे तुकोजीला वाटत होते. वस्तुस्थिती तुकोजीने कधीच समजून घेतली नाही. ''हिशोब पहा.'' असे वारंवार अहिल्याबाईने सांगूनही ते पाहण्याची तुकोजीनी कधीच हिंमत केली नाही. दानधर्म ती दौलतीच्या पैशातून नव्हे तर खासगीतून करीत असे.''[४६]

वरील विवेचनाचा विचार करता तुकोजी हा शूर लढवय्या होता. परंतु धोरणी, मुत्सदी नव्हता हे स्पष्ट होते तो दुसऱ्याच्या सांगण्यावरून सर्व गोष्टी करी त्यामुळे अहिल्याबाई व तुकोजी मतभेद वाढत गेले.

**पैशाच्या हिशोबावरून मतभेद :**

तुकोजीला सरदारकी मिळाली तेव्हा पेशव्याच्या संमतीने अधिकाराची विभागणी केली होती.१ दक्षिण म्हणजे सातपुडा पर्वताच्या दक्षिणेकडील भाग.२ मध्य म्हणजे सातपुडालगतचा उत्तरेकडील महेश्वर ३ उत्तर म्हणजे राजपुताना कडचा भाग. तुकोजी दक्षिणेकडे असेल तर त्याकडील वसूल त्यांच्याकडे जात असे. उत्तरेस असताना उत्तरेकडील वसुली तो घेत असे. उर्वरित भागाची वसुली राजकोषात होत असे. अहिल्याबाई तुकोजीला लष्करी खर्च देत असे. दौलतीचा खजीना तिच्या ताब्यात असे 'तुकोजी फौज कमी ठेवून हिशोबाच्या कागदावर जास्त खर्च दाखवित असे. फौजेसाठी पैसा घेऊन चैनीसाठी खर्च करीत असे. तुकोजीकडून खर्चाचे हिशोब वेळेवर येत नसत. पण आलेले पुष्कळदा खोटे असत. नैमित्ती खर्चाचा हिशोब भलताच दाखवित असे.''[४७] अहिल्याबाईचा हिशोब चोख असे हिशोबातील माहिती त्यांना असल्यामुळे नारो गणेशाची लबाडी उघडी पडत असे तिने ह्या प्रकारच्या वाटा बंद केल्या हीच तुकोजीची व्यथा होती.

तुकोजीनी आपल्या खासगी चैनीसाठी किंवा इच्छेसाठी ठराविक रकमेपेक्षा जास्त पैसा खर्च करू नये तसेच दौलतीचा पैसा खासगीसाठी वापरणे म्हणजे फसवेगिरी व्यवस्थेची अव्यवस्था करणे योग्य नाही. असा अहिल्याबाईचा विचार होता. मल्हारराव होळकरांची पद्धत अशी होती की मोहिमेचा खर्च मोहिमेवर भागवून राजकोषावर भार पडू द्यायचा नाही. तुकोजीकडून अहिल्याबाईंची अपेक्षा हीच होती परंतु त्यांना ते कधी जमले नाही.

**अहिल्याबाईच्या मनात विकल्प :**

तुकोजीचे राज्यकारभारविषयक गैरवागणे पाहून 'अहिल्याबाईच्या मनात शंका आली की आपण सर्व दौलत स्वतःच तुकोजीच्या स्वाधीन केली. ह्यात काही चूक तर झाली नाही ना? ते आपली आज्ञा पाळतील की नाही? आपल्या सोबत विचारविनिमय करतील की नाही. अशा नाना तऱ्हेच्या शंका मनात आल्या. तुकोजी होळकर इंदोर मुक्कामी असताना बाईसाहेबांच्या मनात विकल्प आला कारण दौलत ईश्वरेच्छाने आपले हाती दुसऱ्यांच्या घरात घातली.'[४८] दौलतीचा आमचा संबंध राहिला नाही. 'महेश्वर नर्मदा तटाक पुण्यक्षेत्र आले आहे. तेथे स्नान संध्या करून सार्थकाचा विचार करावा हा आमचा मनोधर्म दौलत तुमचे स्वाधीन केलीच आहे. वडिलांचा लौकिक संरक्षण करून यजमान श्रीमंत यांच्या लोभाचा ओघ शुष्क न पडे यास जपावे आमचा परामर्श कराल न कराल याचे चेष्टित दिसतच आहे.'[४९] हे ऐकताच तुकोजीनी कंपीत होऊन म्हटले की, 'महाराज कै. सुभेदार असता भाऊबंदकी एकीकडे ठेवून गुलामखानदान या वृत्तीने हुकूम बजावीत आलो. प्राप्त प्रसंगी सुभेदारांचे आशीर्वादाचा अनुषंग पाहून मजका माणूस केले. तेव्हा माझे सुभेदार व मातुश्री प्रत्यक्ष आपणच आहात. आपले चरणाशी प्रतारणेचा विचार साक्षात मार्तंड येऊन बोलला असता पायाशी अंतर होणार नाही. प्राण जाणे की राहो ही गोष्ट महाराजांनी खचीत मनात वागवून कुर्मदृष्टी ठेवावी यात दौलतीचे व माझे कल्याण.'[५०] यावरून अहिल्याबाई म्हणाल्या की, "या भावी बहुत खात्री केली मातुश्रीने उत्तर केले बोलण्यात अर्थ नाही. दिसण्यात येईल ते खरे बोलण्याप्रमाणे चालावे म्हणजे झाले अशता ईश्वर त्याची उपेक्षा करीत नाही.'[५१] अशा प्रकारचे बोलणे झाले. अहिल्याबाई त्यावेळेस महेश्वरला राहण्यास होत्या. माळव्यातील महालाच्या बंदोबस्ताची देखरेख अहिल्याबाईकडे होते. या कारभारास नारो गणेशाचे, मुकुंदराव हरी व कृष्णाजी मुऱ्हार पारनेरकर बुळे यांचे सरदारीचे दिवाण म्हणून कामगिरी सोपविली होती. अहिल्याबाईची आज्ञा घेऊन तुकोजीराव होळकर

हिंदुस्थानात रवाना झाले. तुकोजी होळकर गुजरातची स्वारी करून खानदेशात होते. कारण महेश्वराला जाण्यास ते नाराज होते. महेश्वराची दिवाणगिरी दादाजी गंगाधर यांनी केली परंतु काही दिवसानंतर पुन्हा राजकारण सुरू झाले. नारो गणेशाची मुक्तता व कारभार सुरू झाला याची खबर नारो गणेशाची मुक्तता व कारभार सुरू झाला याची खबर अहिल्याबाईस नव्हती. त्यावेळी संशयाचे वातावरण सुरू झाले. त्यावेळी महादजी शिंदे यास बोलावून तुकोजीनी म्हटले की, 'तुम्ही आमचे बंधु तेव्हा मातोश्री साहेबांकडे जाऊन आमची समाई करावी. तेव्हा पाटील बाबा बाईस बोलले की आपण इतकी अगवळणाची बोलणी बोलता परंतु आम्ही पुरुष आहोत. आपले ढंगावर आले असता, आपण काय कराल. बाईंनी याचे उत्तर दिले की, तुम्ही जसे आपल्या बाया सुपारीच्या खांडासारख्या तोंडात टाकून गिळून गेला तोच बोध तुकोजी होळकरास करून उभयता फौजबंदीने येण्याचे करावे. इंदुरीहून तुमचे कूच त्याचदिवशी हत्तीचे पायात अंडी घालून तुमची खात्री करीन तरच मल्हारजी होळकरांची सून तुमचे मनात गुबार होता तो तुम्ही बाहेर काढला या गोष्टीस चुकाल तर तुम्हास मार्तंडाची शपथ'[५२] अशा प्रकारचे बाणेदार उत्तर अहिल्याबाईंनी महादजी शिंदेंना दिले. वरील विवेचनावरून असे दिसून येते की अहिल्याबाई जेवढ्या धार्मिक होत्या तेवढ्याच त्या राज्यकारभारात मुत्सदी व धैर्यशील होत्या. त्यांच्यावर बाईमाणूस म्हणून अनेकांनी दबाव टाकण्याचा प्रयत्न केला. परंतु तत्कालीन कालखंडात एक स्त्री असून कोणत्याही शत्रूबरोबर लढण्यास आपले सैन्य सदैव तयार ठेवले होते. त्यांच्या राजकीय नीतीच्या अभ्यासावरून असे स्पष्ट होते की, त्यांनी अनेक युद्ध, विरोध नुसत्या शाब्दीक बोलण्यानीच जिंकली आहेत. त्यांच्याबद्दल शेजारी मित्रांना जेवढा आदर तेवढाच धाक ही होता, असे संशोधनातून स्पष्ट होते. महादजींना अहिल्याबाईंनी जी सुनावणी केली यावरून तुकोजी होळकर महादजींना म्हणतात. ''बाईसाहेबांच्या पायापाशी हरामखोरी मजकडून व्हायची नाही कदाचित ढंग दोघे करून तिचे मनात मजविषयी माझा प्राणात प्राण आहे

तोपर्यंत होणार नाही. याकरिता दौलत उद्या जात असेल तर आज जातो मी जोडा सांभाळून उभा राहीन परंतु माझे वस्तू ही गोष्ट सुतराम होणार नाही.''[५३] तुकोजीची अशी निष्ठा पाहून महादजी शिंदे नारो गणेशासी बोलून उज्जनी परत गेले. सुभेदारही आल्या वाटेने पुण्यास गेले. इंदोरला तुकोजी होळकरांनी अहिल्याबाईची भेट घेऊन कारभाराच्या नेमणुकीविषय विचारणा केली. पुण्याच्या आज्ञेवरून दोघे गृहस्थ खासगी कडील कारकून नारो गणेस व दौलती पैकी शिवाजी गोपाळ निजबतरावजी, महादेव फडणीस याची रवानगी पुण्यास केली. उभयतांनी पुण्यास श्रीमंताची भेट घेतली आणि विनंती केली की, ''बाई साहेबांचे सुभेदारांचे सांगणे की आम्हास कारभारी कोणी नेमूण द्यावा यावर श्रीमंतांना तुकोजीचा व बाईसाहेबांची तारीफ करून त्यांना आज्ञा केली की, तुमच्या दौलतीपैकी विश्वासू माणसाची नियुक्ती करा त्यास आम्ही आमचे म्हणून वस्त्रे देऊ.''[५४] त्याप्रमाणे मातोश्रींनी नारो गणेशाची नियुक्ती केली. श्रीमंतांनी दुसऱ्या दिवशी वस्त्रे पाठविले. अशा प्रकारे तुकोजी हा अहिल्याबाईस मातोश्री म्हणत त्यांच्या शब्दाच्या बाहेर जात नसत परंतु तो स्वतःची बुद्धी न वापरता दुसऱ्याच्या सांगण्यावरून काही गोष्टी करत असत.

**महालाच्या बंदोबस्तावरून मतभेद :**

महालाच्या बंदोबस्तात कोणाची नियुक्ती करावी याबद्दल तुकोजी आणि अहिल्याबाई मध्ये मतभेद झाल्याचे उल्लेख सापडतात. तुकोजींनी नेमलेल्या कमाविसदाराला दूर करून अहिल्याबाई आपला कमाविसदार पाठवित तर तुकोजी त्याला दूर करून आपला पाठवित त्यामुळे वाद निर्माण होऊन कोणताही निर्णय लागत नसून उलट वाद वाढत होता. अहिल्याबाई कोणत्या परगण्याचा कमाविसदार जवळून रसद घेऊन कमाविसदार परगण्यावर पाठवित असे. याचा उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतो, 'तुकोजी बाबांनी ये प्रांती जितके महालाचे कमाविसदार बाईचे उठवून आपले कमविसदार बसविले होते. तितक्या महालवर बाईंनी आपले कमाविसदार पाठवायचे सिद्ध केले.'[५५]

अशा प्रकारे दोघांमध्ये प्रशासकीय वर्ग नेमण्यात स्पर्धा सुरू झाली त्यामुळे प्रशासकीय दिरंगाई वाढू लागली राज्यकारभारातील कार्यक्षमता कमी होत चालली.

**पेशव्यांची मध्यस्थी :**

एकाने महालाचे ठेवलेले कमाविसदार दुसऱ्याने उठवून आपले ठेवावे असा वाद सुरू होता. तेव्हा पुण्याहून श्रीमंतांनी अहिल्याबाईस त्याबाबत पत्र पाठविण्याचे उल्लेख मिळतात त्यांनी आज्ञा केली की, 'राजश्री तुकोजीबाबा इकडे चाकरीस येतात त्यांनी तिकडे महाली बंदोबस्त केला आहे. यांचे ठेवलेले कमाविसदार बाई उठवून आपले कमाविसदार पाठवितात हे न करावे. ते चाकरीस येतात. त्यांचा बंदोबस्त राखून त्यास बाईनी पत्र टाकून दिली की आम्ही कृष्णाजीपंतास मामलत सांगितली आहे हे तुम्हा ठाऊक असता तुम्ही मामलत का केली? विसाजी अनाथ बोलला. आम्ही धन्याचे चाकर आम्हा जवळून असे होणार नाही. बाई चाकर खरे परंतु फितुरी चाकर । असो मामलत देणे नाही असे उत्तर केले.''[५६] अशा प्रकारे पेशव्यांनी पत्र पाठवून वाद मिटवण्याचा प्रयत्न केला परंतु वाद मिटला नाही.

**महादजी शिंदेंची मध्यस्थिती :**

अहिल्याबाई होळकर व तुकोजी होळकर यांच्या वादात अनेकांनी मध्यस्थी केली. यात तत्कालीन शूर व मुत्सदी महादजी शिंदे यांनीही मध्यस्थी केली. महादजी शिंदे, नाना फडणवीसास लिहितात, ''ज्याप्रमाणे पहिलेपासून होळकरांचे घरची चाल आहे. त्याप्रमाणे बाईंनी सारी वहिवाट करून चाकरी तुकोजी बाबांनी करावी यात बाईचे महत्त्व, सरदारीचे स्वरूप व सरकार चाकरी तीनही गोष्टी सिद्धीस जातात. बाईचा अपमान झाल्यास पुढे सरकारी चाकरी होणार नाही. होळकरांची सून तिचा अपमान झाल्यास सरकारचा लौकिक राहणार नाही इतके असून हीच गोष्टी करावी असा आपला आग्रह असल्यास आमच्याने बाईस सांगवणार नाही की तुम्ही पोटास घेऊन स्वस्थ बसावे. बाई आमचे ऐकावया जोगी

नाही त्यात होळकरांचा आमचा भाऊपणा.'[५७] आम्ही गैर गोष्टीवरून सांगू शकत नाही पूर्वी तुम्हीच बाईंना महालांच्या वहिवाट करून फौजेस खर्चास घ्यावे असे ठरविले ते बाईंनी मान्य केले होते परंतु आता महालांची वहिवाट तुकोजींनी करावी, असे आपण लिहता यात शाश्वती वाटत नाही. अशा गोष्टी आम्ही सांगू शकत नाही.

यावरून नाना फडणवीस लिहितात की, 'घोडे एकाच्या हाती व लगाम दुसऱ्याच्या अशाने सरकारी चाकरी व सरदारीचे स्वरूप कसे होईल. दो हाती कारभारामुळे दुःखाचे अनुभव कसे येतात ते पाटील बाबांनी अनुभवलेच आहेत पैका मधच्या मधे जातो. सरकारचाकरी नाही. मसलत नाही. सरकारचा ऐवज येणे त्यास ठिकाण नाही. या दुहीने सरकार काम नासते व दौलत पेचात येते. सबब चांगले सांगत असता बाईन ऐकले नाही तर याचा बंदोबस्त सरकारातून करावा लागेल.'[५८] यावर महादजी शिंदे, नाना फडणविसास लिहितात की, 'नाना समजत असतील की चिंता काय, पाच हजार फौज महेश्वरी पाठवून बाईचा बंदोबस्त करू त्यास तुम्ही सारे शहाणेच आहात पण बाई साऱ्यापेक्षा अधिक शहाणी आहे. अशा गोष्टी घडतील हे समजून तिनेही तयारी केली असेल तिच्या हातात मातबर जागा आहेत. संशय तिला समजला तर मग ती कोणासच बघावयाची नाही. पैका व बुद्धी दोन्ही तिजमध्ये मजबूत आहेत. बाईस पाटील बाबा शिकवून खेळ करवितात हा नानांचा भ्रम आहे. अशा व्यंगोक्तीने लिहणे ठीक नाही. येणेकरून दौलतीचा नारा होईल मग सर्वांचे डोळे उघडतील. बाई दुसऱ्याचे हाताने घास घेत नाही. शत्रू छातीवर आहेत याचा विचार नानांनी पाहवा.'[५९]

वरील विश्लेषनावरून असे दिसून येते की अहिल्याबाई सर्व राज्यकारभार करीत होत्या. तुकोजी होळकर बाहेर मोहिमेवर असत. तुकोजी शूर परंतु दुसऱ्याच्या ऐकण्यांनी चालणारा होता. नारो गणेश शौचे भोरजवळच्या रांझेगावचा राहणारा तुकोजीचा कारभारी होता. प्रथम अहिल्याबाईंनी आपल्याजवळ कारभारास घेतले. पुढे त्यास तुकोजीने

त्यांच्याकडे घेतले. तो धनलोभी व मत्सरी असल्यामुळे त्याने तुकोजीला भर देऊन बाईंशी त्यांचे वितुष्ट पाडले. सन १७६८ पासून १७७८ पर्यंत तुकोजीच्या सर्व स्वाऱ्यात तो लष्करी हालचाली करीत असे. वसूल हिशोबाचे काम अहिल्याबाई पाहत. तुकोजीकडून हिशोब घेऊन त्यास खर्चाच जरुरी प्रमाणे देई. तुकोजीकडून खर्चाचा हिशोब वेळेवर येत नसे व आलेला पुष्कळ वेळा खोटा ठरत. यामुळे तक्रारी उपस्थित होऊन तुकोजी नेहमी पैशांच्या पेचात असे पगार वेळेवर न पोचल्यामुळे फौज सदा बिथरलेली आणि निकामी असे. सांगितलेली कामगिरी पार न पाडल्यामुळे पुण्यास पेशवे नाराज होत असे, 'बाई आम्हास पैसा पुरवीत नाही. आम्ही काय करणार अशी तक्रार तुकोजी नेहमी कारभाऱ्यास सांगे. कारभाऱ्यांच्या व त्यांच्या समक्ष भेटी होत असल्यामुळे तो अहिल्याबाईबद्दल वाटेल ते गैरसमज कारभाऱ्यास कळवी. उलट बाईची बाजू कारभाऱ्यास स्पष्ट कळत नसे. बाई खर्चास देत नाही. अपरंपार धनसंचय करून ठेवते किंवा निष्कारण दानधर्मात पैसा उधळते जवळचे कारकून वाटेल तशी तिची समजूत करून तिला फसवितात अशा प्रकारच्या तक्रारी तुकोजी नाना फडणवीसाकडे करीत असे.'[६०]

वरील प्रकारच्या तक्रारी ऐकून नाना फडवणीस म्हणतात की, एकमुखी कारभार असल्याशिवाय सुरळीत व्यवस्था राहणार नाही, असे ठरवून त्याने महादजी शिंदेना लिहलेले की, 'तुम्ही बाईची भेट घेऊन तिची समजूत घालून सर्व कारभार तुकोजीचे हवाली करावा परंतु ती गोष्ट महादजीला शक्य वाटली नाही. चार महालाची वहिवाट तुम्ही करावी बाकीची तुकोजी बाबा करतील अशे आमच्याने बाईस सांगवत नाही. जे समयी मल्हारजी होळकरास देवज्ञा जाली तेव्हा आमच्या हाती मालजी होळकर व बाईस दिले आणि आम्हास त्यांच्या हाती देऊन परस्परे भाऊपणाची निखाल सत्ता करून स्वामीसेवा एकनिष्ठेने करावी अशी शपथक्रिया आम्हापासून घेऊन देहविसर्जन केले त्यास बाईंनी नेमणुके प्रमाणे कालझेप करावा आणि तुकोजी बाबांनी सर्व दौलतीचा कारभार करावा हे उत्तम की काय?

आम्हाला सरकार चाकरी करावी इतकेच समजते. होळकरांचा बंदोबस्त सरकार मर्जीप्रमाणे हुजुरूनच करावा आमच्याने काही होत नाही.'[६१] शेवटी महादजी नानास सांगतात की, होळकरांच्या परंपरेप्रमाणे तुकोजीने चाकरी करावी व कारभार अहिल्याबाईनीच पाहवा.

वरील विश्लेषणाचा विचार करता अहिल्याबाई व तुकोजी यांच्या भांडणात महादजी शिंदेंनी नाना फडणविसांना पत्राद्वारे सविस्तर माहिती कळविली. महादजी शिंदेंनी अहिल्याबाईकडे राज्यकारभाराबाबत समर्थता दाखविली तर नाना फडणवीस तुकोजीकडे राज्यकारभार असावा असे वाटे त्यामुळे हा वाद वाढत गेला.

**अहिल्याबाईंची पुण्यास तक्रार :**

अहिल्याबाई व तुकोजी वादाविषयी अहिल्याबाईंनी पुण्यास तक्रार केली. अहिल्याबाईंनी जरी तुकोजीरावांना प्रथम चाकरी करावयास सांगितले तरीही ते अहिल्याबाईंना न भेटता गेल्यामुळे अहिल्याबाईंना त्याबद्दल वैषम्य वाटले त्यांनी पुण्यास तक्रार केली. 'अहिल्याबाईंनी पुण्यास श्रीमंतांना कळविले की तुकोजीबाबा व नारो गणेश उभयता आपली भेट न घेता गेले त्यांनी इतकी अमर्यादा करून जायचे नव्हते. ते फौज ठेवतील पण तुकोजीच्या त्या फौजेला देण्याचे संकट श्रीमंतास पडेल त्यांनी काय समजून त्यास बोलविले आहे. श्रीमंतांच्या बुद्धीस विपर्यास घालूनही मसलत केली आहे, हे वाईट दिसते.'[६२] हरकुबाई म्हणाल्या, ''श्रीमंतांनी घरात अशी फूट पाडू नये. ज्यापक्षी अहिल्याबाई आम्ही त्यांच्या पायापाशी निष्ठेने एकविद्या भक्तीने बसलो आहोत. तेव्हा श्रीमंताकडून हे अपेक्षित नाही. तुकोजी व नारोपंत कोण आहोत? तुकोबाबासह बाईंनीच केले आहे आणि त्याची अमर्याद वर्तणूक पाहून त्यांचेविषयी प्रसन्नता नाही. ज्यास हाती धरतील तो सवाई तुकोजी करून दाखवतील त्यानीही अशी अमर्याद करायचे नव्हते आणि श्रीमंतानाही भलत्याचेच मसलतीवर अशी घरात फूट पाडू नये. नारो गणेश आपल्या बचावासाठी

दोहीकडील खराबी करीत आहेत.''[६३] अशा प्रकारे हरकूबाईंनीही तक्रार पेशव्यास केली होती.

तुकोजीबाबा व नारो गणेशांनी बळवंतराव वाकडे यांच्याकडे महाल सांगितले त्यांचा बंदोबस्त करून उभयता देशात गेले. अहिल्याबाईंनी पेशवांना पत्र पाठविले की, 'आम्हाजवळही तोच दिल्लीचा लवाजमा हत्तीपागा आहेत. त्यांच्या खर्चास तुकोजी काय ठेवून गेले हे बळवंतरावासच श्रीमंतांनी विचारावे. सरकारपर्यंत बोभारा आमच्या नावाचा करतात की सर्व मामलतीचा पैसा बाईच खर्च करतात. श्रीमंतांनी लिहिले तुकोजी बाबास चाकरीस बोलाविले आहे. त्यास खर्चास पोहोचवीत जा कोठून खर्चास पाठवावे. हे धन्यानी त्यास विचारावे सारे पाहणे विचारणे धन्याकडे आहे. ज्यांची गृहकृत्य त्यासच पुसले पाहिजे. दुसऱ्यास काय कळे? तुकोजी बाबास आधी चाकरीस जाऊ द्या. पूर्ववत प्रमाणे येथून जे घडेल महाल जाणे आम्ही जाणू.'[६४] अशा प्रकारे तुकोजी होळकर अहिल्याबाईंना न भेटता निघून गेल्याने अहिल्याबाई अतिशय संतप्त झाल्या व त्यांनी श्रीमंतांना तुकोजींना समज देण्याविषयी सांगितले. अशा अनेक कारणांनी तुकोजी व अहिल्याबाई यांच्या वादात पेशव्यांनी हस्तक्षेप केला. अहिल्याबाईंनी तुकोजी विरुद्ध केलेल्या तक्रारीबद्दल पेशवे इंदूरच्या वकिलास लिहितात. 'तुकोजीस बाईची अमर्याद कर्तव्य नाही. त्यांनी दुसरा अर्थ मनात आणू नये ते तेथे आल्यावर बाईची मर्यादा रक्षीत असेच होईल. तरी अमर्यादा केली म्हणून आपण तिकडे मामलतीची घालमेल किंवा जप्त्या करू नये, तसे केल्यास त्यांच्याकडून चाकरी कशी होईल. तुकोजीबाबा येताना भेटून आले नाहीत म्हणून चित्तात राग का आणावा. आपणच म्हणाला होता. स्वामी चाकरीपेक्षा भेटीचे कार्य अधिकोत्तर नाही यास्तव आम्हीच येऊ दिले नाही.'[६५] यावरून असे स्पष्ट होते की सरकारी कार्य महत्त्वाचे असून त्यावर सर्वांची दृष्टी असावी याची जाणीव अहिल्याबाईंना होती, असे बोलून अहिल्याबाईंची समजून काढण्याचा प्रयत्न पेशव्यांनी केला.

**शिंदे–होळकरांचे वैमनस्य व लाखेरीचे युद्ध :**

लाखेरीचे युद्ध प्रत्यक्षात १ जून १७९३ रोजी झाले असले तरी त्याची पार्श्वभूमी मात्र फार आधीपासून तयार होत गेली. नानासाहेब पेशव्यांच्या काळात शिंदे-होळकरांनी जयपूरच्या वारसा हक्काच्या प्रकरणात दोन परस्पर विरोधी पाठिंबा दिला होता तेव्हापासून ह्या दोन घराण्यात वैमनस्याचे बिजारोपण झाले. राजस्थानच्या राजकारणावरूनही तुकोजी महादजी वाद निर्माण झाला. त्यात वाटणीच्या प्रश्नावरून भरच पडली. 'महादजी इ. स. १७९२ मध्ये दक्षिणेत गेले तर अलीबहादूर बुंदेल खंडात उत्तरेत तुकोजीरावच काय ते एकमेव मातब्बर सरदार उरले होते. तुकोजीने जोधपूर जयपूरच्या सैन्याला नमवून रामपुरा जिंकले. रोडे खवसाचे पारिपत्य करून १७ लक्ष खंडणी वसूल केली.'[६६] राजपुतण्यात मराठ्यांचा परत अंमल स्थापन झाल्यानंतर जोधपूर पूर्वीप्रमाणे शिंदेंच्या ताब्यात आले. जयपूर-उदयपूर ही पूर्वपार होळकरांची ती पूर्वपार शिंदेंची नसतानाही ती आता त्यास अंकीत झाली होती. ह्याचा मनस्वी संताप होळकरांना होणे स्वाभाविक होते.

महादजीस नव्हे तर शिंदे घराण्याशी संघर्ष करण्याची अहिल्याबाईंची इच्छा नव्हती. 'ती लिहिते पहिलेही धनी होते. त्यांनीही या गोष्टी समजूनच जोडफळाचा सांधा सांधूनच टाकला आहे.... भोसले राज्याचा दावा सांगतील, गायकवाड गुजराथ सांभाळून राहतील हे उभयंता सरदार ते दौलतीचे बरेच इच्छितील. कितीक कळवळा पहिले सुभेदार व राणोजी शिंदे यांनीच परिहार केल्या आहेत आणि आताही ममता पुरस्कार ते उभयंता सरदार अर्थ प्राण वेचतील तितके अन्यत्राच्यांनी होणार नाही. यास्तव सरदारात श्रीमंतांनी फूट होऊ देऊ नये.'[६७] तुकोजीनी महादजीच्या वाटणीबाबत लिहिले तेव्हा अहिल्याबाई त्यांना कळवितात 'आग्रह करावा तर तुम्ही घरी बसून वाटा मागता पाटील बाबा बरोबर तुमचे कोण होते? ज्या अर्थी चाकरीच घडली नाही तेव्हा जे देतील ते घेऊन ओढ न करावी. २९ डिसेंबर १७९२ रोजी अहिल्याबाईंनी तुकोजीस लिहिले आपसात फूट दिसोन आल्याने हलके पाहून पडून

कोणतीही गोष्ट सिद्धीस जावयास लागेल. त्याअर्थी तुम्ही एक विचारे चालावे हे उभयपक्षी चांगले. दोन्ही दौलतीचे भाऊपण आजकालचे नाहीत. लोभावर दृष्टी देऊन त्यांनी तुम्हासी वाकेली दाखवू नये तुम्हीही त्यांची थोडकस गोष्टीसाठी तोडू नये.'[६८] अशा प्रकारे लढाईपूर्वी समेट व्हावा म्हणून अहिल्याबाईंनी प्रयत्न केला.

नाना फडणविसाचे चरित्रकार वासुदेव शास्त्री खरे लिहितात 'शिंदे हे कर्ते व शूर सरदार खरे पण ते इतके डोईजड होऊन आतापर्यंत राज्यशासनास कारण झाले आहेत ते होळकरांच्या मदतीमुळे होत. याकरिता ती डोईजड झालेली शिंदे-होळकरांची जोडू फोडून त्या दोघा सरकारात किंचित तेढ उत्पन्न करावी दोघापैकी कोणातरी एकास नेहमी आपले लगामी लावून ठेवावे. याप्रमाणे मसलत योजून तिच्याच अनुरोधाने नाना आमरणांत वागत गेले. भोसले, गायकवाड, टिपू व इंग्रज याकडे त्यांनी आपली स्वतंत्र राजकारणे राखली आणि शिक्षांची जबरदस्ती कमी होऊन त्यांना शह बसावा या हेतूने त्यांनी आता तुकोजी होळकरांशी सख्य जोडले. नाना व होळकर घराणे यांचे हे सख्ये जमले ते मात्र आमरणात टिकले. नाना व होळकरांच्या या सख्यातच नाना व शिंदे यामधील स्पर्धेचे बीज साठविलेले आहे.'[६९]

वरील विश्लेषणाचा विचार करता होळकर, शिंदेच्या पूर्वपार वैमनस्य, व नानांची होळकरांस पाठिंबा अशातूनच लाखेरीचे युद्ध घडले. तुकोजीचा उपयोग स्वतःचे पद सत्ता टिकवण्यासाठी नियंत्रण व संतुलनाकरीता नानांनी केला. शिंदे होळकरांचे महत्त्व अहिल्याबाईंना कळले ते नानांना कळले नसेल असे म्हणता येणार नाही. पण केवळ स्वतःच्या स्वार्थासाठी त्यांच्यातील मतभेद कायम ठेवलेत. ह्या मतभेदाचा परमोच्च बिंदू म्हणजे १ जून १७९३ चे लाखेरीचे युद्ध होय.

'महादजी पुण्यास आला मागे तुकोजी उत्तरेत राहिला. तेथे इरादा केला की शिद्यांचा पाडावा करण्याचा हा समय आहे. अशा समयाची तयारी तुकोजी वगैरींनी वर्ष दोन वर्षे

सारखी चालविली असून पुण्यास येताना महादजीने आपल्या सर्व हस्तकास या धोक्याची सूचना निक्षून दिली होती. मुख्य कारभार त्याने गोपाळराव भाऊला सोपवला आणि इतर सरदारांस त्याची साथ करण्याची ताकीद दिली. कवायती कंपूवर सर्व सत्ता ही डी बॉयनची असून त्याजवर हुकमत गोपाळभाऊची होती.[७०] तुकोजी व त्याचा मुलगा याने निश्चित केला की आता महादजी जाग्यावर नाही तो आपण एकवार त्याच्या फौजेचा गर्व उतरवून दाखवू महादजीच्या फौज ठिकठिकाणी दूर अंतरावर विभागलेल्या होत्या. त्यास वेगवेगळे ठिकाणी गाठून सडकणे सुलभ आहे असे त्यांनी ठरविले आणि तो तशा संधीची वाट पहात राहिला. अहिल्याबाईचा युद्धाला विरोध असतानाही तुकोजीचा पुत्र मल्हाररावाने अहिल्याबाईची समजूत काढून त्यांची संमती मिळविली. ऑगस्ट-सप्टेंबरात महादजी पुण्यास कारभाऱ्याच्या उखळ बेऱ्या मोठ्या तावाने करीत असता इकडे उत्तरेत तुकोजीने शिंद्यांच्या मुलखावर हल्ला केला. महादजीचा हस्तक गोपाळराव रघुनाथ ताबडतोब बंदोबस्तास आला उभय फौजाचा सामना मधुपूरनजीक बनास नदीचे दक्षिणेस सुरवली येथे झाला. चार घटकापर्यंत लढाई ऑक्टोबर १७९२ रोजी होऊन होळकरांचा पराभव झाला व ते पळून लाखेरीस गेले. दरम्यान उभयतांत तहाच्या वाटाघाटी सारख्या चालू राहिल्या. होळकरांचा आपला खलशा तोडावा यासाठी पुण्यास श्रीमंताचे उभयता कारभारी मध्यस्थित पडोन त्यांची पत्रे होळकरास आली परंतु होळकरांचा आग्रह होता की विना लढाईचे ऐकायचे नाही. यावरून महादजी शिंदेनीही त्यांच्या हस्तकांना होळकरांचा मुकाबला करण्यास पत्रे पाठविली. 'इंदोरहून मल्हारराव होळकर नव्या उमेदीने वडिलांजवळ आले. मी एक लढाई कोणाचेही न ऐकता करणार असे बोलोन कूच करून चालोन गेले. संग्राम टळणे अशक्य झाले. २८ मे रोजी लाखेरीजवळ लढाईस तोंड लागले तीन-चार दिवस सामना होऊन १ जून रोजी शेवटच्या संग्रामात होळकरांचा निकाल लागला.'[७१] डी बॉयनची अप्रतिम कल्पकता आणि जीवबा बक्षीचे प्रसंगावधान यामुळेच या लाखेरीच्या लढाईत शिंद्यांचा विजय झाला.

मल्हारराव गोळी लागून पळत असता एका तलावात सापडला. तुकोजी दूर अंतरावर असल्यामुळे पकडला गेला नाही. लढाईचे विपरित वर्तमान ऐकून त्यास पराकष्ठेचे दुःख झाले. त्या आवेशात त्याने शिंद्यांचे उज्जनी नगर लुटून जाळून खाक केले. उत्तरकालीन इतिहासात या लाखेरीच्या संग्रामाला मोठे महत्त्व आहे. शिंदे होळकर मतभेद विकोपाला गेले.

या लढाईनी होळकर व शिंदे या दोघांनाही दुःख झाले. महादजी शिंदे यांनीही लाखेरीच्या युद्धाला शोक दिवस मानले. यावरून असे स्पष्ट होते की अहिल्याबाईप्रमाणे महादजी शिंदेंना हा संघर्ष होऊ नये, असे वाटत होते.

'लाखेरीच्या लढाईचा नाना फडणीवासांवर झालेला परिणाम खरे लिहतात की नानांच्या मनास मोठा धक्का बसला. आपल्या पक्षातील तुकोजी होळकर यांची शिंद्यांनी दुर्दशा केली त्याचा अर्थ ते आता आपलीही गठडी वळवणापर आणि दिल्लीच्या बादशहाप्रमाने पेशवेही शिद्यांच्या हातचे मेणाचे बाहुले असणार असे त्यांना वाटे.'[७२] ऐतिहासिक लेख संग्रहात खरे स्पष्ट कबुली देतात की तुकोजी होळकरास पूर्वीपासून नानांचे पाठबळ होते. दुसऱ्या ठिकाणी लिहितात राज्याच्या बचावासाठी त्या दोघा सरदारांत दुही उत्पन्न करणे नानास भाग पडले व तोच त्या प्रसंगात योग्य उपाय होता म्हणजे विशिष्ट परिस्थितीत नानांनी शिंदे-होळकर दुही निर्माण केली होती ही गोष्ट खरे कबुलच करीत नाहीत तर त्याचे समर्थनही करतात.

'कारस्थाने रचण्यात व यशस्वी करण्यात नानांचा हातखंड होता. याबाबतीत त्यांची बरोबरी करू शकेल अशी त्या काळात संबंध पेशवाईत एकही व्यक्ती नव्हती. खरे लिहितात राजकीयदृष्ट्या नानामध्ये एक मोठेच व्यंग होते ते व्यंग म्हणजे त्यांच्या अंगी लष्करी कसावाचा पूर्ण अभाव होता हे होय. त्यांच्या या वैगुण्यामुळे त्यांना नेहमी दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी प्यावे लागे.'[७३] अशा प्रकारे वरील विश्लेषणाचा विचार करता या

लाखेरीच्या लढाईचा मोठा परिणाम इतिहासात झाल्याचे दिसते. शिंदे-होळकर मतभेद विकोपाला गेले. नाना फडणवीस यांनी महादजी शिंदे प्रबळ होतील म्हणून त्यांचा राजकीय प्रभाव कमी करण्याचा प्रयत्न केला. असे वरील विश्लेषणावरून स्पष्ट होते व शिंदे-होळकरांचे झगडे हे वैयक्तिक संपत्तीतून झाल्याचे स्पष्ट होते.

**देवराव हिंगणेची मध्यस्थी : (२०-९-१७९२)**

१७९२ मध्ये शिंदे-होळकरांच्या लाखेरीतील युद्धात होळकरांचा पराभव होऊन तुकोजी होळकर इंदूरास परतले. येताना त्यांनी उज्जैन हे शिंद्यांचे शहर लुटले. तुकोजीची समजूत घालून त्यास दक्षिणेत आणण्याकरिता नाना फडणीसांनी देवराव महादेव हिंगणे व बळवंत काशी कात्रे यास इंदूरास पाठविले. सन १७९४ च्या अखेर तुकोजी दक्षिणेत आला. तुकोजी आता वृद्ध झाले होते. त्यामुळे तुकोजीचा ज्येष्ठ पुत्र काशीरावास कारभाराची वस्त्रे देण्याचा ठराव आला असता कनिष्ठ पुत्र मल्हाररावाने विरोध करून वाटणी मागितली. वाटणी न दिल्यास बखेडा करण्याची धमकी दिली. यावर तुकोजी अहिल्याबाईंना म्हटले की वाटणी करून उभयतांना समजावून करावे ते करणे यावर अहिल्याबाई म्हणाल्या तुम्ही धन्यापाशी जावून तुम्ही व तुमचे कारभारी करणे ते करा त्यानंतर तेथील आज्ञेप्रमाणे मी वस्त्रे देईन, लढाईत कमी बापू होळकरांनी केली नाही. आपकिर्ती फार झाली. तुम्ही शहाणे असता अशी गोष्ट कशी झाली? यावर पाराजीपंत म्हणाले, ''आम्ही व बापूनी अंतर केले नाही वचनासही गुंतलो नाही. सुलुख केला त्यात उणी कोणती गोष्ट सरदाराचे मर्जिस न येऊन चिरंजीवाचे मसलतीवर हे काम केले तसे फळ प्राप्त झाले. आम्हालाकडे दोष ठेवणे ठीक नाही''[७४] यावरून अहिल्याबाईंनी तुकोजीना पत्र पाठविले की, 'या युद्धात तुम्ही मर्दमकीचे काही काम केले नाही आपल्या वडिलांनी आपल्या तलवारीने जे नाव शौर्यात आणि बहादुरीत कमावले ते तुम्ही गमाविले. दैवयोगाने घायाळ होऊन रणांगणातून तोंड फिरवले असते तर काही हरकत नव्हती.'[७५] यावर यानंतर अहिल्याबाईंनी तुकोजीला शिंदे

बरोबरचे संबंध सलोख्याचे ठेवावेत अशा प्रकारचा सल्ला दिला. अहिल्याबाई तुकोजीना सांगतात की पाटीलबाबा बरोबर जाऊन सफाईचे बोलणे करावे व पेशव्याकडून मध्यस्थि करण्यापेक्षा शिंदे-होळकरांचा पहिल्यापासून भाऊपणा आहे. आपले त्याचे एकचित असावे. एकमेकांसह समोरासमोर बोलून कलह संपवावा यावर तुकोजीनी अहिल्याबाईंना पत्र पाठविले की 'माझे शरीर फार अशक्त झाले. एक वेळ आपले पाय पहावे अशी इच्छा आहे. माझ्या शरीराचा भरवसा नाही. महिन्या दोन महिन्यांचा प्रांत दिसतो. आपल्या पायाच्या दर्शनाची इच्छा आहे पण भेटण्याची परवानगी मिळाली नाही.''[७६]

अहिल्याबाईंचा पूर्ण विश्वास झाला की, मल्हारराव होळकरांच्या निशाणीचा डाव लाखेरीच्या लढाईत गेला. तो सरकार चाकरीने मसलतीने आणावा. लाखेरीच्या युद्धाने होळकरांची गेलेली पत व झालेली नामुष्की नवीन मोहीम स्वीकारून आणि पराक्रम गाजवून धुवून काढावी असा सल्ला अहिल्याबाईंनी तुकोजीला दिला. तुकोजी आणि अहिल्याबाईतील तेढ वाढत गेल्याने तुकोजीनी सरदारकी सोडण्याचीही तयारी दर्शविली. त्यांचे म्हणणे की ''त्या लाखेरीच्या पराभवाचा बदला घेवो की न घेवो, मला काही वेळी घेणे नाही. देवराव व बाईंच्या बोलण्यातील सार की सरकारचे लक्ष सोडून कराल तर कठीण पडेल. बहुत दिवसांची दौलत आहे ते बुडते ते तुमचे नाकर्तेपण बुडत आहे तरी विचार करून दौलतीस अपाय न होय, प्रसंग पाहून वर्तणूक करावी.''[७७] यावर अहिल्याबाई तुकोजीस बोलल्या 'श्रीमंतांची आज्ञा की हुजूर यावे त्यापक्षी चांगले जाते. विलंब करू नये. लौकर सिद्धता करून जावे दिवस शतीवर न टाकावे शिंदे तेथे आहे तो जावून पोचावे म्हणजे पार पडले.'[७८] परंतु तुकोजीची पुण्यास जाण्याची फारशी इच्छा नव्हती ते म्हणत की माझे शरीर आता अशक्त झाले आहे यावर अहिल्याबाई त्यांना नेहमी सल्ला देत की तुम्ही प्रथम धन्याची चाकरी योग्यरित्या पार पाडा. शेवटी पुण्यावरून तुकोजींना बोलावणे आले पण तुकोजीची पुण्याला जाण्याची इच्छा नव्हती. त्यांनी प्रकृती अस्वास्थाचे कारण पुढे केले.

अहिल्याबाई तुकोजीला म्हणाल्या की, 'सरकारची अनुज्ञा करणे योग्य नाही. याचा परिणाम ही चांगला होणार नाही शिवाय महादजी शिंदे ही पुण्यातच असल्यामुळे आपल्या वाटणीबद्दलही सविस्तर बोलू. आपला हिस्सा मिळवून घ्यावा. पुण्यास जाण्याची तुमची मर्जी जा नका जावू पण मी मात्र तुमच्या कर्माची सोबती नाही. आपला पूर्ण विचार करून निर्णय घेणे हे फार योग्य असा सल्ला दिला बाईंनी त्यास निरोपाचे विडे देऊन म्हटले मजजवळ काही गाठोडे ठेवले आहे जे काढून देऊ. तुम्ही देशी जाण्याचे करावे थोडे बहुत खर्चास देऊ. राजश्री काशीराव वस्त्रे देण्याचा बेत पण मल्हारराव बिघडून आहेत तूर्त वस्त्र देणे राहिले.'[७९]

अहिल्याबाईंच्या सांगण्यावरून देवराव हिंगणे सुबेदार तुकोजीला समजविण्यास गेले की असे बसणे योग्य नाही. दौलत बुडाली, लौकिक मिळविला तितका गेला. तुम्ही सरदार असून सरंजामी याचे पदावर आल्यास त्यास सरंजाम तरी राखावा आपणास विलंब असल्यास आम्हाला निरोप द्यावा. सरकार आज्ञेप्रमाणे केले पाहिजे. तुकोजी त्यावेळेस तयार झाले व म्हणाले तुम्ही बोलतात याप्रमाणे करून आम्ही लवकर निघतो तुम्ही जाऊ नये आपण सोबतच मिळून जावो त्यावेळेस अहिल्याबाईंनी भेटीसाठी तुकोजीला बोलावले 'भेट होऊन दोन घटका बोलणे झाले. मुहूर्त पाहून कारभाराची वस्त्रे रा. गणपतराव नारायण व रा. बळाजी लक्ष्मणास देऊन, सर्वसमक्ष सांगितले की, तुम्ही तुकोबास विचारल्याखेरीज कोणताही कारभार न करावा. रापताप्रमाणे करून हातात हाती दिला. पारनेरकर शिवाजी गोपाळ व खंडो महादेव यास सांगितले. तुम्ही आपले दफ्तराचे काम करावे. कारभारात बोलू नये. दिवाणांनी दफ्तरी दाखला सोडून द्यावा. मागील गोष्टीचे वैरभाव स्मरू नये. वहिली गंगा राहिले तीर्थ असे बोलून कचेरी बरखास्त केली.'[८०] तुकोजी पुण्याला जायला निघाले तेव्हा अहिल्याबाईंनी कारभार सुरळीत चालवण्याची व्यवस्था करून दिली.

लवकरच तुकोजी पुण्यात पोहचले. पुण्यात येताच पेशव्यांना भेटून खर्ड्याच्या स्वारीवर रूजू झाले.

वरील विश्लेषनाचा विचार करता लाखेरीवर होळकरांना अपयश आले. ते अपयश पराक्रम करून धुवून काढावे असे अहिल्याबाईंना वाटे व तुकोजीची पेशव्यांची चाकरी करावी शेवटी तुकोजी तयार झाल्यावर अहिल्याबाईंनी मनात कोणताही शेष न धरता त्यांची व्यवस्था लावून दिली व राज्यकारभारविषयक सल्ला दिला.

**तुकोजीची शेवटची कामगिरी खर्ड्याचे युद्ध :**

निजामाकडे मराठ्यांची चौथाईची रक्कम ३ कोटी होती शिवाय ३५ लाख रुपये वार्षिक उत्पन्नाचा प्रदेशही मराठ्यांना देण्याचे निजाम टाळत होता. ही रक्कम मराठ्यांना देण्यापेक्षा सैन्यावर खर्च करून त्यांच्याविरुद्ध युद्ध करण्याचा सल्ला निजामाचा दिवाण मुशरूकमुल्क याने निजामाला दिला. त्याप्रमाणे 'मोठ्या फौजेसह निजाम १७९४ च्या नोव्हेंबरमध्ये हैदराबादवरून निघून बेदरला आला. पेशव्यांना हे कळताच त्यांनी सर्व सरदारासह निजामाला तोंड देण्याचा निश्चिय केला. निजाम मोहरीचा घाट उतरून खर्ड्याच्या किल्ल्यानजीक खैर नदीजवळ मोहरील गापी आला. मसलम लांबणीवर पडू नये म्हणून शिंदे-भोसले निजामास अडविण्यास पुढे गेला. होळकरही पुढे सरसावले'.[११] होळकर शिंदे, भोसले, परशूराम भाऊ पटवर्धन इत्यादींनी निजामाच्या सैन्यावर आक्रमण केले. एकाच दिवसात युद्धाचा निर्णय लागून मराठ्यांचा विजय झाला तर नबाबाला खर्ड्याच्या किल्ल्यात आश्रय घ्यावा लागला. यानंतर पेशवे निजामात तह ठरला. तुकोजीनी खर्ड्याच्या लढाईत मोठी कामगिरी केली. ही कामगिरी त्याच्या जीवनातील शेवटची ठरली. तुकोजींची प्रकृती खालावत जाऊन १५ ऑगस्ट १७९७ रोजी त्यांचा मृत्यू झाला.

अशा प्रकारे तुकोजीराव पराक्रमी होते परंतु दुसऱ्याच्या विचाराने वागणारे होते. त्याचा फायदा नाना फडणविसाने स्वतःच्या स्वार्थासाठी करून घेतला. हे इतिहासकारांचे मत मान्य करावे लागते.

**अहिल्याबाई–तुकोजी मतभेद विकोपाला का गेले नाहीत :**

अहिल्याबाई व तुकोजीत पैशावरून मोठ्या प्रमाणात वाद झाले. मोठ्या प्रमाणात पत्रोपत्री झाली असली तरी संबंध मातोश्रीच्या नात्यानेच वडिलकीचा मान देऊन वागत. पत्रातही उल्लेख मातोश्री असाच आढळतो. होळकरशाहीच्या अनेक उपलब्ध कागदपत्रांवरून असे स्पष्ट होते की पत्रव्यवहाराने गैरसमज वाढत गेले. नाना फडणवीस स्वतः अहिल्याबाईंकडे जाऊन हा वाद मिटवू शकले असते परंतु हा मार्ग त्यांनी कधीच स्वीकारला नाही. तुकोजीला मात्र शक्य तेवढे त्यांनी दक्षिणेच्या मोहिमेत गुंतवून ठेवले. अहिल्याबाई व तुकोजींच्या भांडणात महादजी शिंदे व नाना फडणीस पडल्यामुळे ह्या भांडणाला चौरंगी लढ्याचे स्वरूप प्राप्त झाले. महादजी शिंदे अहिल्याबाईंच्या बाजूने विचार मांडत ते म्हणत की, नारो गणेश कारभारात नसावा. दुसरा दिवाण नेमा. अहिल्याबाईकडे वडिलपण देऊन त्यांच्या आज्ञेत तुकोजी वागतील. अहिल्याबाई सर्व राज्यकारभार व्यवस्थित पार पाडतील. होळकर घराण्यांची हीच रीत आहे परंतु नाना फडणवीसचा विचार वेगळा होता असे संशोधनातून दिसून येते. तुकोजीरावाकडे सर्व राज्यकारभार असावा व अहिल्याबाईंनी फक्त आपल्या पोटापुरते घेऊन शांत बसावे परंतु अहिल्याबाई मुत्सदी होत्या. नानांचा विचार त्यांनी ओळखला होता. तुकोजीला हाताशी धरून होळकरांची संपत्ती हाती घेणे हा नानांचा विचार होता यामुळे अहिल्याबाईंना हा विचार मान्य नव्हता. ह्यामुळे वाद वाढत गेला.

एकंदरीत वरील राजकीय विश्लेषणाचा विचार करता अहिल्याबाईंना बाहेरील राजकारणापेक्षा त्यांच्या गृहकलातच मोठ्या प्रमाणात राजकारण झाल्याचे दिसते.

तुकोजीराव अहिल्याबाईस उघड विरोध करू इच्छित नव्हता. जर तुकोजी आणि नारो गणेश यांनी अहिल्याबाईंची अमर्यादा न करता त्यांच्याशी पूर्ण निष्ठा राखून वर्तन केले असते तर होळकरशाही बरोबर मराठी सत्तेलाच खंबीरता आली असती. पण राज्यहितापेक्षा स्वहिताचा मोह या दोघांना व नाना फडणवीसाना होता. यामुळे अहिल्याबाईंना मानसिक क्लेश सहन करावे लागले. तुकोजीला आपल्या वागणुकीचा पुढे पश्चाताप फार झाला. त्याने नारो गणेशाला शिक्षा केली. नारो गणेशाची संगत सुटताच तुकोजी व अहिल्याबाईंचे संबंध सुधारल्याचे उल्लेख मिळतात. तुकोजी होळकरांचे कर्तृत्व अहिल्याबाईंच्या कर्तृत्वापुढे लपून गेले. तुकोजीही मोठा शूर, सेनानायक होता याचा उल्लेख तत्कालीन कागदपत्रातून मिळतो.

**अहिल्याबाई होळकर यांच्या राजकारभाराची प्रशासकीय व्यवस्था :**

होळकरांच्या राज्याला प्राकृतीक सीमा नव्हती. काही परगणे माळवा, राजपुतांना व नेमाड क्षेत्रात तर उरलेले दक्षिणच्या पठरात होते. एकूण एकशे सव्वीस परगणे असून मल्हाररावाच्या काळात राज्याचे उत्पन्न साडे चौऱ्याहत्तर लक्ष रुपये होते. अहिल्याबाईंच्या काळात शांतता व सुव्यवस्था असल्याने राज्याचे उत्पन्न सव्वा कोटी झाले होते.

१) राज्याच्या उत्तरेस कोटा व उदयपूरची सीमा लागून होती.

२) दक्षिणेस ग्वाल्हेर, धार, बडवानी, निजाम व पेशव्यांचे राज्य होते.

३) पूर्वेस ग्वाल्हेर, देवास, धार व भोपाळ

४) पश्चिमेस बडवानी व डुंगरपूर

५) उत्तर पूर्वीस झालवाडा अशी संस्थान होती.

राज्यकारभाराच्या दृष्टिकोनातून होळकरांच्या सरदारीचे अहिल्याबाईच्या कारकिर्दीत प्रामुख्याने दोन भाग होते. १) खासगी जहागीर, २) जाहगिरी ऊर्फ दौलत

या दोन पद्धतीविषयी आपण पाठमागे सविस्तर उल्लेख केलाच आहे.

**प्रशासकीय व्यवस्था :**

राज्यामध्ये प्रशासकीय व्यवस्था सुरळीत चालावी म्हणून भारताच्या इतिहासात प्राचीन काळापासून प्रशासकीय व्यवस्थेचे वेगवेगळ्या राज्यात तत्कालीन राज्याने आपल्या सोयीनुसार प्रशासकीय व्यवस्था तयार केली होती. मराठा कालखंडात छ. शिवाजी महाराजांची प्रशासकीय व्यवस्था आदर्श प्रशासकीय व्यवस्था होती. अहिल्याबाईंच्या समोर या व्यवस्थेचा आदर्श होता. मल्हारराव होळकरांच्या प्रशासकीय व्यवस्थेत काही सुधारणा अहिल्याबाईंनी केल्या होत्या. त्या खासगी व सरकारी खर्चाचा हिशोब अत्यंत चोख ठेवत असत. मल्हाररावाच्या मृत्यूनंतर काही दिवसच अहिल्याबाईंचा पुत्र मालेराव सुभेदार होता नंतर मात्र तुकोजीराव होळकरांकडे सुबेदारी आली होती. म्हणून पेशव्यांच्या मंजुरीने अहिल्याबाईंनी प्रशासकीय राज्यकारभार करावा आणि तुकोजीने सरदारी घेऊन सैन्यानीशी पेशव्यांची चाकरी करावी अशी अधिकाराची दुहेरी व्यवस्था केली होती. मल्हाररावांच्या काळात मल्हारराव होळकर लढाईवर असले म्हणजे ते तलवार गाजवून सर्व खर्च बाहेर पाडे. आवश्यकता असल्यास सरकारी तिजोरीतून पैसा खर्च करीत असत. परंतु तुकोजीराव होळकर पैशाचा हिशोब व्यवस्थीत ठेवत नसत. त्यांना अहिल्याबाईंना सातत्याने पैसे पाठवावे लागत असत. म्हणून एके ठिकाणी अहिल्याबाई म्हणतात की पैशाच्या हिशोबात एक कवडी माझ्याकडे निघाली तर मी त्यास पाचकवडी देईन अशा प्रकारचा विश्वास अहिल्याबाईंना स्वतःच्या प्रशासकीय व्यवस्थेवर होता. तत्कालीन अहिल्याबाईंच्या कालखंडातील प्रशासकीय व्यवस्था पुढीलप्रमाणे.

'राज्याचा मोठ्या विभागांना सरकार असे म्हणत. प्रत्येक सरकारात १० ते ४० जिल्हे असत त्यास परगणा अथवा महल म्हणत. प्रत्येक परगण्यात ५० ते ३०० पर्यंत खेडी होती. परगण्याचे तालुक्यात विभाजन केलेले असे प्रत्येक तालुका ६ ते ३० खेडी मिळून बनलेला असे.'[८२] होळकर शाहीत दिवाण हा सर्वोच्च अधिकारी होता. त्याची नेमणूक पुणे

दरबाराकडून होई त्याला 'पगारापोटी जहागिरी दिली जात असे त्याशिवाय पालखी, हत्ती, नोकर यांचा खर्चही सरकार तर्फे दिला जात असे, परगण्यातून येणाऱ्या महसूलाचा ठराविक हिस्सा दिवाणाला मिळे. प्रत्येक गावातून हंगामाच्या वेळी २ रुपये मागण्याचा हक्क दिवाणास मिळे'[८३] अहिल्याबाईस दौलतीच्या जहागिरीसाठी गंगाधर चंद्रचूड तर अल्पकाळ नारो गणेश शौचे आणि पराशर पंत हे दिवाण लाभले परंतु या दिवाणांनी होळकरशाहीचे हीत न पाहता केवळ स्वार्थासाठी निरनिराळ्या लोकांना हाताशी धरून अहिल्याबाईस घरी बसविण्याचे प्रयत्न केले.

परगण्याचा मुख्य अधिकाऱ्याला कमाविसदार म्हणत हा सरकारी अधिकारी असे परगण्यातील सर्व जमा खर्चाचे अंदाजपत्रक कमाविसदाराला वर्षाच्या सुरुवातीस फडणविसाकडून दिले जात असे. मंजूर केलेला खर्च वजा जाता बाकी पैसा त्याला सरकारी खजीन्यात भरावा लागे. 'राज्याच्या गरजेच्या वेळी (उदा. युद्धप्रसंगी) त्यावेळी पुढील एक किंवा दोन वर्षांचा महसूल आगावू देण्यासंबंधीची मागणी महेश्वर दरबाराकडून होत असे. वाटाघाटी करण्यासाठी कमाविसदारांना महेश्वरी बोलविले जाई. कमाविसदारांनी आगाऊ दिलेल्या रकमेवर शेकडो १ टक्का दराने व्याज आकारण्यास मान्यता दिली जाई.'[८४] कमाविसदाराला पगारापोटी ३० हजार रुपये व पालखी दिली जात असे. कमाविसदाराने आपल्या प्रजेशी आचरण योग्य ठेवावा याबद्दल अहिल्याबाईकडून वारंवार ताकीद येत असे जर रयतेला खुद्द अहिल्याबाईकडे दाद मागता येत असे. चांदवडच्या कमाविसदाराने एक बोहऱ्यास मार दिला असता अहिल्याबाईंनी कमाविसदारास ताकीद केली. 'तिर्थरूप कैलासवासी सुभेदारांनी कोणकोणत्या प्रकारे आणून रयतेचे संगोपन केले. अतःपर गैरवाजवी उफसर्ग लागू नये रयतेची दिलभरी करून गैर न करीत जाणे'[८५] परगण्यात शांतता प्रस्थापित करण्याची जबाबदारी कमाविसदाराची होती त्याला त्याच्या कामात मंडलोई मदत करीत असे. दूरच्या प्रांतातील कमाविसदारास न्यायदान करावे लागे. परगण्यातील

जमिनीची मोजणी महसूल याबाबत माहिती कानूगो दफ्तर असे आणि दफ्तर मंडलोईकडून असून सांभाळण्याची जबाबदारी मात्र कानूगोची असे त्याची नेमणूक वंशपरंपरेने केली जाई. 'जमीन मोजणाऱ्या अधिकाऱ्यास मिर्धा म्हणत हे पद बहुदा मुसलमानाकडे रहात असे.'[८६] पाटील प्रत्येक गावाचा प्रमुख असून हे पद वंश परंपरेने त्याच्याकडे रहात असे. त्याला १०० ते २०० बिघे जमीन इनाम महसूल मुक्त असे. कर व दंड वसूल करण्याचा याला अधिकार होता. गावातील महसूल विषयक दफ्तर सांभाळण्याचे काम पटवारी करीत असे त्याची नेमणूक सरकारातून केली जाई. चौकीदार, ब्राह्मण, सुतार, न्हावी, धोबी इत्यादी नोकर वर्ग व बलुतेदार यांना जमिनीच्या उत्पन्नातून हिस्सा मिळत असे.

**सरदार आणि जहागिरदार :**

सुभेदार मल्हारराव होळकरांनी दक्षिणेतून माळव्यात आपल्या बरोबर आणलेल्या शूर लोकांना आपल्या संस्थानात जहागिरीचे वतने दिली होती. त्यांच्या पश्चात अहिल्याबाईंनी तिच व्यवस्था सुरू ठेवली आणि जहागिरदारांना पूर्ण पाठिंबा देऊन त्यांना महत्त्व प्राप्त करून दिले होते. जहागिरदारी प्रथा ही अहिल्याबाईच्या राज्यकारभाराचे एक महत्त्व पूर्ण अंग होते. आपापल्या प्रदेशात जहागिरदारांना पूर्ण स्वतंत्र दिलेले होते. या जहागिरदारांना फौज ठेवून प्रसंगी सरकार मदतीस पाठवावे लागे. 'प्रत्येक सरंजामी सरदारांचा गोट असे त्या गोटात सानिद्ध असलेले शास्त्री पंडित, पुराणिक, वैद्य व ज्योतिषी यांचाही योगक्षेम चाले. पागे, पथक, हिशेबी, कारकून यांचाही समावेश त्यात असे, नालबंदी करणारे चांभार, धोबी, तंबू ठोकणारे व शिवणारे या सर्वांचा समावेश व निर्वाह या गोटात होई.'[८७] हे सरंजामदार अहिल्याबाईचा मानमरातब ठेवत त्यांच्या आज्ञेने शिरसावंध मानत प्रसंगी त्यांच्या हातून चुका झाल्या म्हणजे अहिल्याबाई त्याची कान उघडणीही करीत. महत्पुरूच्या एका सरंजामी सरदाराने रयतेपासून अन्यायाने वसूल करत असे त्यावेळेस तेथील तक्रारी अहिल्याबाईकडे आल्या त्यावेळेस त्यास बोलावून दोघांचेही

म्हणणे समोरासमोर ऐकूण घेतले व रयतेस सरदाराकडून न्याय दिला आणि सरदारासही आपल्या चुका दाखविल्या. अशा प्रकारचे अनेक उदाहरणे त्यांच्या कालखंडात घडल्याचे उल्लेख विविध ग्रंथातून मिळतात. रयत व सरदार यांना समोरासमोर आणल्यामुळे सत्य उजेडात आले. त्यामुळे प्रजेला न्याय मिळाला.

तुकोजी होळकरांनी स्वारी खर्चासाठी ऐवजाची आवश्यकता असल्यामुळे आपल्या सरदारांवर पट्टी बसवून ऐवज जमा करावा असे अहिल्याबाईंना कळविले त्यावेळी अहिल्याबाई तुकोजींना म्हणतात. 'सरंजामी सरदारास त्यांचा खर्च आहे त्यांच्या गोटातील हजेरीप्रमाणे त्यास नेमणूक आहे. ते स्वतः जातिनीशी तळावर सेवेत हजर असताना त्यांच्यावर यादी करावी हा न्याय कोणता.'[८८] अशा प्रकारे अहिल्याबाई ज्याप्रमाणे आपल्या प्रजेवर अन्याय होऊ देत नसत. त्याप्रमाणे सरदारांना आपल्या राज्याचे महत्त्वपूर्ण घटक मानत असत. तुकोजीसह वेळोवेळी पत्रे पाठवून आपल्या सरदारांचे मनोगत राखावे आणि त्यांच्या हातून कार्य पार पाडावे अशा सूचना अहिल्याबाई करीत असत. एखाद्या सरदाराची सरदारी कर्जबाजारी झाली तर अहिल्याबाई त्यास योग्य मार्ग काढून देत अशा प्रकारचे आचरण अहिल्याबाईचे आपल्या जहागिरदाराशी नोकरवर्गाशी रहात असे.

**अहिल्याबाई कालीन वित्तव्यवस्था :**

१८ व्या शतकाच्या उत्तरार्धात संपूर्ण देशात अस्थिरतेचे वातावरण होते. अहिल्याबाईंच्या राज्यात मात्र, शांतता, सुव्यवस्था होती. याचे महत्वाचे कारण म्हणजे शेतीतील प्रगती होय. अहिल्याबाईंनी शेतीच्याबाबत मल्हारराव होळकरांच्या काळच्या अनेक कायद्यात सुधारणा केल्या. करपद्धती कमी असल्यामुळे शेतकऱ्यांच्या उत्पन्नानुसार सारा वसूल केला जात असे.

**जमीन महसूल :**

अहिल्याबाईंच्या कारकिर्दीत इंदोर सुभ्याचे उत्पन्नाच्या दृष्टीने पुढील प्रांत होते. स्वदेश, खानदेश, नेमाड मालवा, घडोली, धुंदाड, जातवडा, बुंदेलखंड, नरवर, अंतर्वेद आणि मेवाड. खरीप पिके कापल्यावर महसुलाची निश्चिती केली जात असे 'महसुलाची रक्कम रोख आणि धान्याच्या स्वरूपाने स्वीकारली जात असे मजुरांचा पगार व पुढील वर्षाचे बियाणे यासाठी धान्य काढल्यावर राहिलेल्या धान्यातून निम्मा हिस्सा अथवा २/५ हिस्सा सरकारात कर रूपाने द्यावा लागे यास बटाई महसूल म्हणत.'[८१] अहिल्याबाईंनी आपल्या राज्यात बटाई महसुलाची निश्चिती केली असली तरी वाजवीपेक्षा जास्त महसूल कधीच घेतला नाही. पैशाच्या रूपाने महसूल ठरविताना काळ्या बागायती जमिनीवर प्रत्येक बिघामागे सव्वा रुपया निश्चित केला होता. याच काळात इतर संस्थानात मात्र हा कर बिघ्यामागे चार रुपये होता. कमी कर योजनेमुळे प्रजा व शेतकरी सुखी होते. परिणामी उत्पन्न जास्त निघत होते.

अशा प्रकारे शेतकऱ्यावरती शेतसारा देण्याची प्रथा अनेक शतकापासून सुरू आहे. ज्या संस्थानातील राजे जनतेचे कल्याण पाहणारे होते ते जनतेवर अल्पप्रमाणात शेतसारा लावत परंतु काही संस्थानिक हे शेतकऱ्यांकडून मोठ्या प्रमाणात शेतसारा वसूल करीत व शेतकऱ्यांची पिळवणूक करीत. आजही भारतात शेतकरी स्वतंत्र मिळून ५७ वर्षे झाली तरी कर्जाच्या ओझ्याखाली दबला आहे. शेतकऱ्याला नेहमी नैसर्गिक परिस्थितीशी तोंड द्यावे लागते आहे. शेतकऱ्यांच्या कोणत्याही पिकाला हमी भाव नाही. त्यामुळे व्यापारी मोठ्या प्रमाणात शेतकऱ्याची लूट करीत आहेत. शेतकरी आत्महत्या करीत आहेत. अहिल्याबाईंनी तत्कालीन कालखंडात शेतकऱ्यांच्या हिताचे निर्णय घेतले.

महापूर, टोळधाड, गारांचा वर्षाव, अवर्षण नैसर्गिक प्रकोप आणि फौजेच्या हालचालीमुळे पिकांची झालेली पायमली अशावेळी अहिल्याबाई आपल्या प्रजेस

शेतसाऱ्यात सूट देत असे, महाल मकत्याने देताना कमाविसदाराबरोबर पुढील प्रमाणे करार केला जाई 'लष्कराची पायमल्ली झाल्यास चौकशी करून मजरा दिला जातील आफत फितुरी मुलुख शिरस्ता प्रमाणे दिले जातील.'[१०] इ.स. १७६८ मध्ये पेशव्यांच्या फौजेच्या हालचालीमुळे होळकर राज्यातील गांडापूर परगण्यातील नांदगाव येथील पिकाची नासाडी झाली असता तुकोजी होळकरांनी नुकसानभरपाई बद्दल करात सूट दिली परंतु कमाविसादाराने जेव्हा वसूल जमा केला तेव्हा लोक अहिल्याबाईकडे गेले. तेव्हा कमाविसदारास बोलावून समज देण्यात आली. अहिल्याबाई शेतकऱ्यांच्या हितासाठी नेहमी दक्ष असत. शेतकऱ्यांकडून योग्य वसुलाबाबत तुकोजीला आज्ञा पाठवीत. हंगाम संपल्यावर रयतेकडून वसूल करू नये याबद्दल दक्ष रहात असत. अशी वसुली केली गेली तर शेतकऱ्याजवळ पुढील वर्षाच्या शेती कामासाठी पैसा राहणार नाही परिणामी उत्पन्न बुडेल म्हणून रयतेस राखून राज्याचे कल्याण साधावे अशा सूचना अहिल्याबाई महसूल गोळा करणाऱ्या अधिकाऱ्यांना पाठवित असे. अशा प्रकारचे शेतीविषयक अहिल्याबाईंचे धोरण होते.

**सायर :**

सायर वसूल करण्याचा हक्क सरकारचा होता. जमिनी अथवा गाव इनाम दिली तरी त्या गावातून सायर वसूल करण्याचा सरकारला हक्क होता. परगण्यातील राजस्व विभागातील कर्मचारी 'सायर' वसूल करून राजकोषात जमा करीत. प्रत्येक परगण्यांत सायरच्या स्वतंत्र हिशोब ठेवला जात असे. मौल्यवान वस्तूच्या किंमतीवर, वजनावर सायरचे प्रमाण ठरविले जात असे. धान्य, कापूस इत्यादी पदार्थांच्या आयात-निर्यातीत बैलांचे ओझ्याचे पाठीमागे सायरचे प्रमाण ठरविले जात असे.

'अहिल्याबाईंच्या कारकिर्दीत शांतता असल्याने चितोड, जावड, भिलवारा, संदसोर, रतलाम, खाचरोद, कोटा, जयपुरा, शुजालपूर, उदेपूर, उज्जैन, अहमदाबाद,

बडोदा, भडोच, सुरत, पुणे, जालना, बऱ्हाणपूर, अमरावती, हैद्राबाद इत्यादी शहरांशी व्यापार चालत असे. त्यात प्रामुख्याने कापड, तंबाखू, अफू गुरे इतर किराणा माल व धान्याची निर्यात होत असे तर गुजरात, मुंबई येथून सोने-चांदी, मोती, नारळ, सुपारी, बुंदेल खंडातून हिरे, माणके, निळ इत्यादी पदार्थ आयात होत."[११] अशा प्रकारच्या आयात निर्यातीमुळे अहिल्याबाईंचे कारकिर्दीत सायरचे उत्पन्न मोठे होते. सायर प्रामुख्याने नद्यांवरील घाट, डोगंरातील घाट आणि राज्याची सरहद्द इत्यादी ठिकाणी वसूल केली जात असे. हिंदुस्थानातून पुण्याकडे आणि दक्षिणेतून उत्तरेकडे जाण्याचे इतर मार्ग होते. परंतु अहिल्याबाईंनी प्रवाशांसाठी केलेल्या सुखसोयीमुळे बरीचशी रहदारी होळकर राज्यातून होत असे. जमीनदार आपल्या परगण्यात, पाटील आपल्या गावी येणाऱ्या-जाणाऱ्या मालावर जकात वसूलकरीत. आपल्या गुरावर अथवा मालावर 'सायर' माफ करावी व सुरळीत माल पोहोचवून द्यावा याबद्दल शिंदे, पवार, निजाम, अहिल्याबाईंनी त्यांच्या गुरे व मालावर जकात न घेण्याचे आदेश आपल्या अधिकाऱ्यांना पाठविले होते. सायर वसुलीचा मक्ता दिला जात होता. व्यापारासाठी हुंडीचा वापर केला जाई. हुंडी व्यवहारासाठी सावकार आणि सराफ यांचा एक विशेष वर्ग होता. व्यापारी मालाची ने-आण करण्यासीठी वंजारी नावाची एक विशिष्ट जमात कार्यरत होती. मालाची ने-आण बैलगाडी यांच्या सहाय्याने होत असे. व्यापारी लोकांचे समुह असून त्यांच्या संरक्षणासाठी ही बंदी असे.

**खंडणी :**

युद्धात पराभव झालेल्या राज्याकडून वसूल करून त्यांचे राज्य पुन्हा त्यांच्या ताब्यात दिले जात असे. प्रतिवर्षी त्यांच्याकडून नियोजित केलेली खंडणी वसूलकेली जाई परंतु नैसर्गिक आपत्ती आणि फौजेच्या हालचालीने यांचा विचार करून खंडणीच्या हप्त्यात सूट दिली जाई.

अशारीतीने अहिल्याबाईंच्या राज्यात सर्वांना न्याय दिला जात असे.

**टांकसाळ व नाणी :**

होळकरशाहीत नाणी पाडण्याची सुरुवात सुभेदार मल्हारराव होळकरांनी केली होती. त्यांनी चांदवड येथे टांकसाळ सुरू केली होती. 'अहिल्याबाईंनी इंदोर येथे नाणी पाडण्याचे इ.स. १७६६ मध्ये सुरू केले होते.'[१२] ही टांकसाळ मोहरदास सावकार यास मक्त्याने चालविण्यास दिली होती.टांकसाळ चालवण्याची जबाबदारी जरी एखाद्या व्यक्तीवर सोपविली तरी नाण्याचा दर्जा धातूचा कस यावर सरकारचे नियंत्रण रहात असे. सावकाराकडून सरकारास दर शेकडा १ रुपया मिळत असे. अहिल्याबाईंच्या काळात प्रामुख्याने तांब्याची व चांदीची नाणी पाडली गेली. या नाण्यावर चंद्राचा अथवा सूर्याचा मुखवटा असून गव्हाच्या ओबिचे अथवा अफूच्या झाडाचे चित्र टांकसळीचे नाव, शिवलिंग आणि बेलपत्र अशी चित्रे रहात.

इंदोरप्रमाणे अहिल्याबाईंनी महेश्वर येथेही टांकसाळ सुरू केली होती. एक आणा, दोन आणे, चार आणे, आठ आणे ही नाणी चांदीची असून अर्धाआणा, पावआणा, धेला ही नाणी तांब्याची होती. सोन्याच्या मोहरांचे उल्लेख आढळतात परंतु त्याचा उपयोग नजराणा देण्यासाठी होत असावा. महेश्वराची टांकसाळ इ.स. १८३२ पर्यंत तर इंदूरची टांकसाळ १९०३ पर्यंत चालू होती.

**न्याय व्यवस्था :**

अहिल्याबाईंच्या न्यायीपणाबद्दल सर्वत्र ख्याती आहे. तत्कालीन कालखंडात आजच्या सारखे लेखी कायदे नव्हते. न्यायबुद्धी ही कायद्यांची पुस्तके वाचून उत्पन्न होते असा विचार त्यावेळी नव्हता. सारासार विचारशक्ती व शिक्षण यांच्या संयोगाने मनुष्यात जी धारणाशक्ती उत्पन्न होते तिच्या परिपक्व स्थितीत कायद्यांचा जन्म होतो. अहिल्याबाईंची धारणा शक्ती प्रबळ होती. त्यांना अन्यायाचा तिटकारा होता. त्यांचे कार्य उत्तम न्यायाधिशाप्रमाणे होते. मोगलांच्या काळात राज्यात न्यायालये फार कमी होती.

होळकरांच्या राज्यात नियमबद्ध न्यायालयाची मुहूर्तमेढ अहिल्याबाईच्या काळापासून रोवली गेली. प्रजेला न्याय मिळावा म्हणून त्यांनी राज्यात अनेक ठिकाणी न्यायालये स्थापन करून त्यावर योग्य न्यायमूर्तींच्या नेमणुका केल्या. गावोगावी पंचायती स्थापन करून त्यांना न्यायदानाचे विस्तृत अधिकार बहाल केले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली कडक नियंत्रणाखाली ही न्यायालये व पंचायती न्यायदानाचे काम उत्तम रितीने करीत होती. या न्यायालयात होणाऱ्या प्रत्येक कामकाजाचे वर्णन नियमाने राज्याच्या उच्च अधिकाऱ्याकडे व अहिल्याबाईकडे पोहोचवण्यात येत असे. ज्या लोकांचे या न्यायालयामुळे समाधान होत नसे ते लोक अहिल्याबाईकडे येत. 'न्यायासनावर बसून त्या सर्व प्रकरणे स्वतः ऐकत आणि मग निवाडा देत असत. त्यांनी दिलेल्या न्यायाने वादी-प्रतिवादी दोघांचेही समाधान होत. लोकांचा त्यांच्यावर नितांत विश्वास होता की, त्यांनी दिलेला निर्णय अमान्य करणे म्हणजे पाप आहे, असे लोक मानात असत.'[१३]

प्रत्येक परगण्यात कमविसदारास गावात पाटलास न्यायदान करावे लागे. अहिल्याबाईच्या वेळी 'न्याय देण्याची पंचायत पद्धती होती. त्या लोकांवर अहिल्याबाईंचा चांगला दाब असल्याने न्याय देणारे लोक अहिल्याबाईपर्यंत कागाळी जाऊ नये म्हणून न्यायदानाकडे अधिक लक्ष पुरवित. ज्या मनुष्यास न्याय हवा असेल त्यास निकाल लावून घेण्यासाठी कोणताही खर्च लागत नसे. अहिल्याबाईंच्या वेळी न्यायखाते ही उत्पन्नाची बाब नव्हती.'[१४]

शिंदे आणि होळकर यांच्यात एका जमिनीच्या तुकड्यावरून वाद होता. या वादाचा निर्णय लावण्यात यावा म्हणून शिंदे यांनी पंच म्हणून अहिल्याबाईंची नेमणूक केली. वास्तविक पाहता यावेळी एका पक्षाची फिर्यादी खुद्द अहिल्याबाई होती. परंतु त्यांचा निपक्षपाती स्वभाव व न्यायप्रियता पाहून शिंदे यांनी त्यांची पंच म्हणून नेमणूक केली होती. 'अहिल्याबाईंनी या भूभागाचा निर्णय लावला की हा प्रदेश 'गोचर भूमी' म्हणून सोडून

देण्यात यावा आणि ही व्यवस्था दोन्ही पक्षांनी मान्य केली. ही व्यवस्था मध्यप्रदेश राज्यनिर्मितीपर्यंत चालू होती.''[९५]

शेजारील संस्थानातील लोक आपले खासगी भांडण मिटविण्यासाठी अहिल्याबाईकडे येत होते. याशिवाय पुणे दरबाराकडून जर एखाद्या व्यक्तीवर अन्याय झाला तर ते लोक अहिल्याबाईस शरण येत. नाना फडणविसांनी एका व्यापाऱ्याबद्दल शंका घेतली असता हे व्यापारी महेश्वर येथे आले. त्यावेळी अहिल्याबाईंनी नानास समजाविले की, 'अशा प्रकाराने इतर व्यापारांची पत नाहीशी होऊन तुमच्या व्यापारी मंडळास मोठा धक्का बसेल'[९६] नाना फडणविसास अहिल्याबाईंचे म्हणणे पटले आणि त्यांनी व्यापाऱ्याला न्याय दिला.

अशा प्रकारे अहिल्याबाईंची धारणा शक्ती प्रबळ होती. कोणतेही प्रकरण असले तरी त्या योग्य न्याय देत असत.

**संरक्षण व्यवस्था :**

सुभेदार मल्हारराव होळकरांच्या काळात असलेली सैन्य व्यवस्था अहिल्याबाईंनी काही सुधारणा केल्या व तत्कालीन काही व्यवस्था चालू ठेवल्या. सैन्य भरतीच्या प्रत्येक सैनिकाला एका जबाबदार व्यक्तीचा जामीन द्यावा लागे. सैनिकांचा पगार रोख असून तो त्यांच्या क्षमतेनुसार ठरविला जाई. मोहिमेवर जाण्याअगोदर फौजेच्या तयारीसाठी शिलेदारांना वार्षिक वेतनाचा एक चतुर्थांश किंवा तिनाई रक्कम देण्यात येई. त्याला 'नालबंदी' म्हणत. बाकीची रक्कम लष्करात हजर झाल्यावर देण्यात येत असे त्याला 'राजमुरे' म्हणत. मुख्य सरदारांचा पगार त्यांचा लौकिक व दर्जा लक्षात घेऊन ठरविला जात असे. त्यास ''जात तैनात'' म्हणत. सरदारी खर्चात सैन्याचा पगार पुढील प्रमाणे असे. स्वार दर माणशी दरसाल ४५० रुपये करोल (बंदूकधारी) सैनिकाला दरसाल ३२५ रुपये, भालेकरी यास दरसाल २५० रुपये असा होता. कायमचे सैन्य वेगळे असून मोहिमांच्या वेळी

सैन्य भरती केली. त्यामुळे आपल्या जवळही कवायती फौज असावी असे अहिल्याबाईस वाटत होते. इंग्रजाबद्दल अहिल्याबाईंनी पुढीलप्रमाणे मत व्यक्त केले होते.

'वरकड व्याग्रदिक श्वापदे बळ व युक्ती प्रयुक्तीने मारतील परंतु आस्वलाचे मारणे फार कठीण आहे. सुरत धरून मारले तरच मरेल नाहीतर आस्वलाचे लपेटीत कोणी सापडला तर गुदगुदल्या करूनच आस्वल त्यास मारील तद्वत हे इंग्रजांची लढाई आहे पाहता त्याच मारणे कठीण'[१७] वरील उल्लेखावरून अहिल्याबईंचा इंग्रजाविषयी नेमके काय मत होते हे लक्षात येते. इंग्रजांबाबत पेशव्यांनी कोणती सावधगिरी बाळगावी याविषयीही त्यांनी वेळोवेळी सूचना दिल्याचे उल्लेख ग्रंथातून मिळतात. अहिल्याबाईकडे जुन्या पद्धतीने लढाई केली जात असे परंतु इंग्रजांसारख्या शत्रूंना शह देण्यासाठी कवायती फौज उभारणे त्यांना आवश्यक वाटत होते. पेशव्यांनी व त्यांच्या इतर सरदारांनीही कवायत फौज उभारावी असे त्यांना वाटत होते.

## अहिल्याबाईंनी जे. पी. बॉईड सोबत केलेला करार :

इ.स. १७९२-९३ च्या सुमारास कर्नल जे. पी. बॉईड नामक अमेरिकन अधिकाऱ्यामार्फत पाश्चात्य पद्धतीची पलटन तयार केली. अमेरिकन कर्नल बॉइडला सेवेत घेतले. पाश्चात्य लोक नोकरीत येत असता जहागीर मिळावी., आपल्या देशाच्या विरुद्ध आम्ही लढणार नाही अशा अटी घालत परंतु त्यांनी जे. पी. बॉइड बरोबर केलेल्या करारात राजकीय दूरदृष्टी दिसते. '१) पलटन संघटित करण्यासाठी संस्था व वेतन ठरवून दिले. २) आवश्यक दारूगोळा सरकार आपल्या पैशाने पुरविल. ३) १८११४ रु. ४ आणा यापैकी ११४८९ रुपये पुणे येथे दिले जातील आणि बाकीचे ६६२५ रु. ४ आणे महेश्वर येथे मिळतील. ४) गणवेश व शस्त्रे खराब झाल्यास चौकशी केल्यावरच दिली जातील. ५) कर्नल बॉईडला दोन हजार रुपये पगार राहील. ६) एका पलटण एकाच सरदाराच्या नियंत्रणात राहील दोन सरदार राहणार नाहीत. ७) हरकऱ्यांना महादजी शिंदे देतात तसे वेतन

दिले जाईल. ८) पलटणीने एक महिन्याच्या आत महेश्वरला यावे येथे भरतीची चौकशी होईल. ९) तोफा, बैलगाड्या, दारूगोळा तसेच त्यासाठी लागणारे लोक यांची संख्या वेतन निश्चित केले ते २१०० रुपये होते. १०) भरती केलेल्या लोकांना एक वर्ष नोकरी करावी लागेल. ११) दरमहा शिपायांनी हजेरी होईल. त्यावेळी गैरहजर लोकांचा पगार वेतनातून कापला जाईल. १२) सरकारचा आदेश मानून त्यानुसार कार्य करावे लागेल. १३) पलटणीचे काम पाहण्यास दरबारात अप्पाजी चिमणाजी राहतील. १४) पलटण महेश्वराला आल्यावर करारावर शिक्का मोर्तब केले जाईल. महेश्वर येथे कराराला स्वीकृती देऊन पलटन इंदोर येथे पाठविली. २५ मे १७९३ कर्नल बॉईडने करार मान्य करून एकनिष्ठेने सेवा करण्याचे कबूल केले. त्यानुसार त्याने १७९५ पर्यंत अहिल्याबाई होळकर यांची सैनिकी सेवा केली.'[१८]

अहिल्याबाई होळकरांनी जे. पी. बॉईड बरोबर केलेल्या कराराचे वैशिष्ट्य पाहता अहिल्याबाईच्या व्यक्तिगत ज्या मराठा सरदारांनी कवायती पलटणी निर्माण केल्या होत्या तेव्हा त्यांनी जे करार केले होते त्यानुसार त्या पलटणी ब्रिटिशांबरोबर लढणार नव्हत्या. त्यामुळे राष्ट्रीयत्व राखण्याच्या कामी या पलटणीचा उपयोग होणार नव्हता. परंतु अहिल्याबाईंनी केलेला करार वेगळा होता. या फौजेत केवळ एक अधिकारी परकीय असून बाकी सर्व फौज देशी राहणार होती आणि या अधिकाऱ्यासही अहिल्याबाईंनी जहागिरी न देता त्याला मासिक वेतनावर नोकरीवर ठेवले होते.तसेच दारू गोळा व बंदुका आणि इतर युद्धविषयक साहित्य यासाठी कर्नल बॉईडला महेश्वर दरबारावर अवलंबून राहावे लागणार होते. अहिल्याबाईंनी कर्नल बॉईडवर नियंत्रण ठेवण्यासाठी कारकून ठेवला होता. अहिल्याबाईंनी बॉईडशी केलेल्या या करारात राष्ट्रीय बळ वाढविण्याची भावना दिसून येते.

सैन्याचा बाबतीत अहिल्याबाई पेशव्यांनाही सूचना करीत असे. 'श्रीमंत फौजेची उपेक्षा फार करीतात परंतु गोष्ट कार्याची नाही. फौज चांगली पंचवीस तीस हजार जवळ

असावी. चहूकडून गडबड उडाली आहे. अशा समयी आपण आपले फौजेनिशी बळकट असावे."[९९] ब्रिटिशांचे आक्रमण परतवून लावण्यासाठी पेशव्यांनी काय उपाययोजना कराव्या याबद्दल अहिल्याबाईंनी पेशव्यांच्या वकिलांजवळ सूचना सांगितल्या. त्या पुढीलप्रमाणे 'देशी इंग्रजांनी गडबड बोरघाटाकडे, चांदवड बारीकडे व त्रिंबकाकडे अशी फार जाहली... त्यास या समयांस श्रीमंतांनी शिलेदारांचा व हुजारीतीचा भरणा पुष्कळ करावा आणि इंग्रज जागा, जागा, कोठे फौजे पाठवून ते तेथील तशीच... म्हणजे मागल्याला दहशत पडेल पुढे कोणी येऊ पावणार नाही. नबाब भोसले सारे जमा होऊन इंग्रजांचे परिपत्य करावे."[१००] इंग्रजांच्या विरुद्ध देशी सर्व शक्तींनी एकत्र येऊन इंग्रजांसी मुकाबला करावा व त्यांना हाकलून लावावे, असे अहिल्याबाईंचा विचार होता. महादजी शिंदे यांना ११ जानेवारी १७८१ रोजी पत्र पाठवून अहिल्याबाईंनी आपली योजना कळविली होती आणि एवढेच नव्हेतर स्वतः मोहिमेवर जाण्याची तयारी दर्शविली होती. याशिवाय युरोपात इंग्रज आणि फ्रेंच हे एकमेकांचे शस्त्रू असून त्यांच्याच आपआपसात युद्ध चालू असते. मराठा राज्यावर इंग्रजांचा वाढता दबाव पाहून अहिल्याबाईंनी पुणे दरबारास कळविले की इंगाजांचा शस्त्रू तो आपला मित्र म्हणून इंग्रजांच्या विरुद्ध फ्रेंच सैन्याची मदत घ्यावी. 'सरकारची फौज व आंगरे व फरासीस एकत्र येऊन फरासीसास मुंबईस लावावे आणि फौज व आंगरे यांनी वसईची पुरत पन्हाई करावी."[१०१]

आपण मराठमंडळाचे एक घटक आहेत. ही भावना अहिल्याबाईंची होती. फक्त इंदोर संस्थान सुरक्षित न राहता संपूर्ण मराठा राज्याचे संरक्षण व्हावे ते वाढावे हा विचार अहिल्याबाईंचा येथे दिसून येतो. इंग्रज-मराठ्यांचे पहिले युद्ध १७७५ ते १७८२ या काळात झाले. नाना फडणविसाने महादजी शिंदे व होळकर यांना स्वरसैन्यासी दक्षिणेत ताबडतोब निघून येण्याविषयी पत्रे पाठविली परंतु महादजी शिंदे यांनी उत्तरेकडील संकट निवारण्यासाठी तिकडेच राहण्याचे ठरविले त्यावेळी अहिल्याबाईनी महादजी शिंदेंना कळकळीचा सल्ला

दिला. अहिल्याबाईचे इंग्रजांविषयी विचार व्यक्त करणारे विठ्ठल शामराव यांना लिहिले पत्र (१७८१) ते पुढीलप्रमाणे 'प्रस्तुत इंग्रजांनी वसई घेतली तेथील बंदोबस्त करून इंग्रज घाट चढले म्हणजे देशात उपद्रव करतील पुणे कसे राहील? आपले घर, निजरमान, आपले पुणे... ते कायम तर तुम्ही जे मसलत कराल ते बरी दिसेल तेथेच अस्ताव्यस्त झाले तर शंभर मसलती तुम्ही केल्या त्या कोण करायच्या? तथापि तुमचे जाण्याचे मानस नसले तर आम्हीच येथून जाऊन त्यास मिळतो आम्हास जे होणे ते हो. हा विचार ऐकूण तीस हजार फौजेनिशी महादजी शिंदे व वीस हजार फौजेनिशी तुकोजी होळकर युद्धात सामील झाले. या युद्धात वडगाव येथे इंग्रजांचा पराभव झाला व सालबाईचा तह करून इंग्रजांनी युद्धातून सोडवणूक करून घेतली'.[१०२] या ठिकाणी अहिल्याबाईंना शत्रूचा अंदाज बांधता येत होता. त्यांच्यात दूरदृष्टी असलेल्या नेतृत्वाचे पैलू दिसून येतात. इंग्रजांची कुटिलता, आक्रमकता आणि मराठी राज्य काबीज करण्याचा इंग्रजांचा हेतू त्यांना वेळीच समजला होता.

अहिल्याबाई फक्त राजकर्त्या होते असे नव्हे तर त्यांच्या ठिकाणी धोरणीपणा, व्यवहारचातुर्य हे गुण होते. सुभेदार तुकोजी हा पंधरा हजार फौज बाळगून असला तरी अहिल्याबाईजवळ स्वतःची सेना होती. श्रीमंत फौजेची उपेक्षा करतात ही गोष्ट कार्याची नसे अशी सूचना बाईंनी पुण्यास देऊन ठेवली होती. होळकरांची सेना अहिल्याबाईशी अखेरपर्यंत इमान राखून होती. याचा उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतो. '१७८० ला नारो गणेशाने तुकोजीच्या वतीने सैन्यास फितूर करण्याचा प्रयत्न केला तेव्हा सैनिकांनी उत्तर दिले. ''अन्यांसी व शिद्यांशी एखादे वेळेस श्रीमंताशी आम्ही लढाई केल्यास आम्ही तुमचे चाकर आहो. तुमचे पुढे मरू मात्र अहिल्याबाईशी तुम्ही लढाई करू म्हणाल तर आम्ही तुमचे चाकर नाही.''[१०३] अशा प्रकारे सैन्याचा अहिल्याबाईंच्या वरती विश्वास होता की इतर कोणीही सैनिकाला लालूच देऊन फितूर केले तरी ते अहिल्याबाईंच्या विरोधात लढण्यास तयार होत नव्हते.

## किल्ले व्यवस्था :

संरक्षणाच्या दृष्टिने अहिल्याबाईंनी महेश्वर चांदवड, हिंगलाडगड, सेंधवा, अशिरगड या किल्ल्यांचे बांधकाम केले होते. या किल्ल्यांना भक्कम अशी तटबंदी असून मोठे मोठे बुरूज आहेत. आतील बाजूला सैनिकांच्या व पहारेकऱ्यांच्या खोल्या आहेत. किल्ल्यांना तळघर आहेत. आतील भागात पिण्याच्या पाण्यासाठी मोठमोठ्या विहिरी आहेत. तसेच उंच मनोरे बांधले होते. संरक्षणाच्या दृष्टीने किल्ल्यांची व्यवस्था उत्तम ठेवली होती. ह्या बाबत नाना फडणवीसांचा कारकून लिहितो, "बाईनी महेश्वरचा बंदोबस्त केला, बुरुजावर तोफा चढवून ठेवल्या."[१०४] यावरून अहिल्याबाईनी सरंक्षण व्यवस्था चोख ठेवल्याची कल्पना येते.

## अहिल्याबाई कालीन डाक व्यवस्था :

अहिल्याबाईंचे सामाजिक कार्य संपूर्ण भारतात चालू असे. तुकोजी होळकर दूरच्या मोहिमेवर जात. होळकरांच्या दौलतीचे व खासगी जहागिरीचे अधिकारी निरनिराळ्या प्रांतात कार्यरत रहात त्यांना वेळेवर आपले आदेश पोहोचविणे आपल्या प्रजेची सुख, दुःख कळणे इतर राज्यकर्त्यांशी संपर्क साधने या व इतर अनेक कारणांनी अहिल्याबाईंनी पूर्वीच्या डाक व्यवस्थेत मूलभूत स्वरूपाचे बदल घडवून तिची नव्याने रचना केली होती. पुणे ते महेश्वर ही नित्य स्वरूपाची डाक व्यवस्था असून इतर डाक व्यवस्था नैमितीक स्वरूपाची होती तिला स्थापनेच्या दृष्टीने स्थळाची मर्यादा नव्हती. अहिल्याबाईंना ती आवश्यक वाटे त्यावेळी हरकारा, सवार किंवा कासीद यांना पाठवून आपल्या आज्ञा किंवा पत्रे त्या पाठवित असत तशीच व्यवस्था होळकरांच्या राज्यातील सावकारसुद्धा करीत असत. 'अहिल्याबाईंच्या वेळी या व्यवस्थेला डाक बसविणे असे संबोधले जाई. राज्यांच्या अंतर्गत ठराविक ठिकाणी डाकी चौकी निर्माण केलेली असे. पत्र घेवून जाणाऱ्या कासीदांचे वर्ग किंवा श्रेण्या निर्माण करण्यात आल्या होत्या. हरकारा, राऊत, पियादा, रसानगिदार,

जथेदार, जथेदारांना हेर म्हणून ओळखले जात असे आणि तेच डाक व्यवस्थेचे ठेकदार असून टपाल पोहचविण्याचा मक्ता घेत. कासी सामान्यत: पायी चालत कासीदची दोन व्यक्तीची एक जोडी रहात असे तसेच काही कासीद जोड्या, उंट, घोडे यांचा वापर डाक पोहचविण्यासाठी करीत"[१०५]

पुणे ते महेश्वर आणि महेश्वर ते पुणे या अंतरातील डाक व्यवस्था पुढीलप्रमाणे होती.

४० महेश्वर पासोन थाळनेर पर्यंत कोस

४० थाळनेरहून चांदवड पर्यंत कोस

३० चांदवडहून संगमनेर पर्यंन्त कोस

४२ संगमनेरीहून पुण्यापर्यंत कोस

यासी कासीद जोड्या पाच कोसा कोसांवर जोडी एक प्रमाणे जोड्या ३४ यास, दरमहा रुपये २४० डाक चौकीच्या जोड्या ३० असाव्या. ६० दर ४ रुपये ४८ सरबाईच्या जोड्या ४ असाव्या, ८ दर ६ प्रमाणे २८८"[१०६]

इ.स. १७९२ मध्ये अहिल्याबाईंनी महेश्वर ते पुणे या अंतरासाठी ३४ कासीद जोड्या नियुक्त करून त्यांना २८८ रुपये पगार दिला होता. या स्वारींनी दर महिन्यास येऊन डाक पोहोचती करावी पाच सात दिवसांच्या अंतराने पुण्याची डाक घेऊन यावी आणि या वेळेत जर कमी जास्त दिवस झाले तर किंवा कागदाची गफलत झाल्यास कासीदाला कामावरून कमी करण्यात येत असे.

बऱ्याच वेळा समाचार पत्रे हे विशिष्ट व्यक्तीमार्फत, सांकेतिक भाषेत पाठविली जात असे. काही महत्त्वाची पत्रे यात्रा करणाऱ्या ब्राह्मणाबरोबर पाठविली जात. बल्लाळ पेशवे यांना अहिल्याबाई यांनी वेदमुर्ती खुशालीराम यांच्या बरोबर पत्र पाठविण्याचे उल्लेख मिळतात. अहिल्याबाईंनी निर्माण केलेल्या या योजनेमुळे परराज्यात त्यांनी नियुक्त केलेल्या

वकिलांमार्फत येणारी पत्रे. संपूर्ण भारतात चालू असलेली बांधकामे, अंतर्गत राज्यातील खबरी ताबडतोब मिळून त्यानुसार निर्णय घेता येत असे व आपल्या प्रजेवर आलेले संकट निवारण करता येई. या व्यवस्थेमुळे त्यांचा पुणे दरबाराशी सतत संपर्क राहत असे.

**अहिल्याबाईची प्रशासकीय कार्यक्षमता :**

अहिल्याबाईंची प्रशासन व्यवस्था चोख असे. प्रत्येक आलेल्या दिवशीचा पत्रव्यवहार त्या रात्र रात्र जागून पूर्ण करत याचे उदाहरण पुढीलप्रमाणे आहे. त्यांची दररोजी कचेरी झाल्यावर 'बिछान्यावर एकचित्त बसून कारभारीयांपैकी राजश्री विनायक बाजीराव व बालाजी कृष्णा यास बोलावून त्याचकडून पत्र अक्षरश. श्रावण केली. सरकारचे पत्र एक व नबाबाकडील वकिलाचे पत्राची नक्कल एक होती. मजकूर ध्यानास आणून सरकार आज्ञेप्रमाणे तेच क्षणी सवाप्रहर रात्रपर्यंत बसून जागाजागा धाटनाके येथील कमविसदार यांस पत्रे लिहून रवाना केली व आसपासचे जवळ होते. त्यांस समझ बोलावून ताकीद करून बंदोबस्त करविला. दक्षिण उत्तर महाडाचे घाट व नाळे चोरवाटा व उभय रेवातीर येथील नावघाट पाय उताराचे तर नेमावर पर्यंत यांजकडील जिल्ह्यांतील झाडून बंदोबस्त करविला. राजश्री रघुनाथ पंत यास बरहाणपूर येथे पत्र पाठविली. येथील कमाविसदार यास व जमीनदार भूमिने वगैरे यास ताकीदी सांगून पाठवून नंतर सवाप्रहर रात्रीस निद्रा केली.''[१०७] अशा प्रकारे अहिल्याबाई राज्यव्यवस्थेत प्रत्येक दिवसाचे काम त्याच दिवशी पूर्ण करीत. या ठिकाणी त्यांची प्रशासकीय कार्यक्षमता दिसून येते. जनतेविषयी असणारी तळमळ दिसून येते.

**अहिल्याबाई होळकरांच्या काळातील सेवक :**

कोणत्याही राज्य व्यवस्थेमध्ये धोरणात्मक निर्णय घेणारे नेतृत्व व त्या नेतृत्वाने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करणारी प्रशासकीय नोकर वर्ग हा कार्यक्षम व विश्वासू असावा लागतो तर खऱ्या अर्थाचे त्या योजनांची अंमलबजावणी होऊन राज्य व्यवस्थीत

रीत्या चालते. भारतासारख्या देशामध्ये प्रशासन व्यवस्थेमध्ये मोठ्या प्रमाणात भ्रष्ट प्रशासन व्यवस्था निर्माण झाल्यामुळे प्रशासनात धोरणाची अंमलबजावणी योग्य रितीने होत नाही, असे दिसून येते.

अहिल्याबाई होळकरांच्या कालखंडातही काही प्रशासकीय नोकर विश्वासू तर काही अविश्वासू होते. त्यामध्ये गंगाधर चंद्रचूड, नारो गणेश यासारखे दिवाण अविश्वासू निघाले. ते अहिल्याबाईंच्या विरोधात कटकारस्थान करत असत. पेशवे, तुकोजी व अहिल्याबाई यांच्यामध्ये कलह निर्माण करण्यास कारणीभूत ठरले. याचा उल्लेख अनेक ग्रंथातून मिळतो. ज्या प्रमाणे अहिल्याबाईंच्या प्रशासकीय व्यवस्थेत अविश्वासू सेवक होते. त्याप्रमाणे काही विश्वासू सेवक होते. त्यामुळे अहिल्याबाई राज्याचा कारभार लोककल्याणकारी करू शकल्या. ज्याप्रमाणे शिवाजी महाजारांना स्वराज्य निर्माण करताना तानाजी मालुसरे, शिवा काशीद, बाजीप्रभू देशपांडे यासारखे प्रामाणिक सहकारी लाभले त्यामुळे त्यांना स्वराज्य स्थापन करता आले. त्याप्रमाणे अहिल्याबाईंना काही विश्वासू सेवक लाभले. त्यामध्ये विसाजी शामराज देशपांडे, शिवाजी गोपाळ पागाकामदार, भरमलदादा होळकर, सरदार कालगावडे इत्यादी होत.

यापैकी शरीफभाई पागाकामदार हा अत्यंत विश्वासू सेवक होता. तो अहिल्याबाई व तुकोजीराव यांच्यातील भांडण मिटवत असे. ह्या संबंधात कर्नल ल्युअर्ड यांनी जे टिपण तयार करून ठेवले आहे त्यातील माहिती पुढीलप्रमाणे शरीफभाई यांचा जन्म खानदेशात झाला. मल्हाररावांच्या या माळव्यात प्रवेश झाल्यावर शरीफभाई सरकारी पागेत बारगीर होऊन राहिले. तेव्हापासून १७९३ पर्यंत (मृत्यूपर्यंत) त्यांनी चाकरी केली. 'बारगीरावरून बढती मिळत ते त्या खात्याचा मुख्य झाला. सुभेदार मल्हाररावांच्या सर्व लढ्यात तो हजर असे त्याप्रमाणे तुकोजीरावांच्या लढाईत ही हजर असे. शरीफभाई याची वागण्याची व बोलण्याची हातोटी अद्वितीय होती. सुभेदार तुकोजीराव आणि अहिल्याबाई ह्यांच्यामध्ये

जेव्हा मतभेद होत तेव्हा तोड काढून शेवट गोड करण्याचे श्रेय शरीफभाईसच असे. घरगुती गोष्टीत अहिल्याबाई त्यांचा सल्ला घेत असे''[१०८] अशा प्रकारे विश्वासू सेवकामुळे अहिल्याबाई राज्यकारभार योग्य रीतीने पार पाडू शकल्या. विश्वासू सेवकांप्रमाणेच कोणत्याही नेतृत्वात सेवकांत विश्वासू निर्माण करण्याचे संघटित प्रशासकीय नेतृत्व गुण असावे लागतात ते अहिल्याबाईंच्या अंगी होते, असे वरील विश्लेषणावरून म्हणता येईल.

**अहिल्याबाई कारकिर्दीतील दरबारी वकील :**

अहिल्याबाईचे शेजारील राज्याशी मैत्रीपूर्ण संबंध होते. शेजारीच शत्रू निर्माण झाले तर राज्यात नेहमी अस्थिरता असते. भारताला शेजारी पाकिस्तान, चीनसारखे शेजारी शत्रू निर्माण झाल्यामुळे भारतात नेहमी तणावग्रस्त परिस्थितीत निर्माण होते, म्हणून अहिल्याबाईंनी शेजारील राज्याशी मैत्रीपूर्ण संबंध ठेवले होते. तत्कालीन कालखंडात धार्मिक युद्धे मोठ्या प्रमाणात असत मुस्लिम राजे व हिंदू राजे यांच्यात सातत्याने लढाई होत तरीही निजाम, टिपू यांच्याशी अहिल्याबाईचे राजकीय संबंध मैत्रीपूर्ण होते असे संशोधनातून स्पष्ट होते. त्यांचे वेगवेगळ्या संस्थानात वकील असत ते पुढीलप्रमाणे :

अयोध्या-खंडो जगदेवराव

उदेपूर - भगवंतराव जगताप

कोटा - बापूजी आनंदराव

ग्वाल्हेर - यमाजी मोरेश्वर

जयपूर - मार्तंडराव अप्पाजी

डुंगरपूर - व्यंकाजी शिवाजी

दिल्ली - बहादूर सिंग

देवळे प्रतापगड - विनायक सदाशिव

नागपूर - व्यंकाजी कृष्णराव

पुणे - अप्पाजी जयदेव

लखनौ - जिवाजी गिरमाजी

हैद्राबाद - माधवराव लक्ष्मण"[१०९]

**होळकर दरबारात इतर राज्यातील वकिल :**

पुणे - केसो भिकाजी दातार

शिंदे दरबार - शिवाजी नारायण

मारवड दरबार - जासकर मेहता व दत्ताराम

भरतपूर दरबार - भागवंत गोविंद

जयपूर दरबार - सवाईराव, शिवाजी

उदयपूर दरबार - काशिनाथ पांचोली

सातारा दरबार - रामराव सदाशिव

अशा प्रकारे अहिल्याबाईंचे वकील इतर दरबारात व इतर दरबारातील वकील अहिल्याबाईच्या दरबारात असत.

अहिल्याबाईंच्या महेश्वर येथील दरबारी पेशव्यांकडून नाना फडणविसांनी दोन वकील ठेवले होते. त्यांची नवे विठ्ठल शामराज व केसो भिकाजी अशी आहेत. त्यांनी महेश्वर येथून अहिल्याबाईंच्या दिनचर्येची व राजकारणांची बातमीपत्रे पुण्यास पाठविण्याचा क्रम ठेवीला होता. हे वकील १७७९ पासून १७९४ पर्यंत महेश्वर दरबारी होते. ह्या दोन वकिलांच्या बातमीपत्रामध्ये अहिल्याबाईंची दिनचर्या त्यांचा दरबार, त्यांचे पेशव्यांशी व इतर मराठे सरदारांशी झालेली राजकारण इत्यादी गोष्टी नमूद केल्या आहेत. त्यामुळे तत्कालीन मराठ्यांच्या राजकारणावर उत्तमरितीने प्रकाश टाकला आहे.

अशा प्रकारे अहिल्याबाई होळकर यांच्या राजकीय व प्रशासकीय कार्याचा अभ्यास केलेला असता त्यांच्या या नेतृत्वात अनेक पैलू दिसून येतात. अहिल्याबाईंना इतर शेजारील

संस्थानीकाच्या उपद्रव कमी होता परंतु त्यांच्या गृहकलात मोठ्या प्रमाणात राजकारण झाल्याचे संशोधनातून दिसून येते. मल्हारराव होळखरांच्या मृत्यूनंतर पेशव्यांनी जी दुहेरी राज्यव्यवस्था होळकर राज्यात निर्माण केली. त्यामध्ये मोठ्या प्रमाणात मतभेद झाल्याचे स्पष्ट होते. तुकोजी हा शूर पराक्रमी होता परंतु तो स्वतःच्या बुद्धीचा वापर न करता दुसऱ्याच्या सांगण्यावरून राज्यकारभार करीत. त्याला त्याचे सेवक नारो गणेश व पत्नी रखमाबाई यांची शिकवण असे. तसेच अहिल्याबाई व तुकोजी यांच्या मतभेदात नाना फडणवीस व महादजी शिंदे यांनी मध्यस्थी केल्यामुळे हा वाद वाढत गेला. नाना फडणविसांनी तुकोजीला आपल्या बाजूला घेऊन महादजी व अहिल्याबाईच्या विरोधात उभा केले तर महादजीने अहिल्याबाईला सहमती दर्शविली. शिंदे प्रबळ होऊ नयेत म्हणून नाना फडणवीस नेहमी होळकरांची बाजू घेत यातूनच शिंदे होळकर मतभेद होऊन लाखेरीचे युद्ध घडले व मराठेशाहीच्या पतनाला सुरुवात झाली. एकंदरीत विचार करता अहिल्याबाईंनी या मतभेदात जनतेच्या राज्यकारभारात कोठे कसूर केला नाही. त्या जनतेच्या हितासाठी नेहमी दक्ष राहिल्या. असे या प्रकरणाच्या विश्लेषणावरून दिसून येते. त्यांचे प्रशासकीय नेतृत्वाच्या विविध घटनांवर प्रकाश टाकला असता त्यांची तत्कालीन कालखंडात एक स्त्री असून प्रशासकीय कार्यक्षमता, नियोजन अत्यंत कार्यक्षम असे. त्यांची न्यायबुद्धी व धारणा शक्ती अत्यंत चोख असे त्यांमुळे इतर राज्यातील तंटे त्यांच्याकडे न्यायासाठी येत असे. त्यांनी संरक्षण व्यवस्थाही अत्यंत चोख ठेवली होती. परकीय इंग्रजांचा धोका ओळखून कवायती फौज तयार केली होती व इंग्रजांच्या नीतीविषयी पेशव्यांना वळोवेळी सूचना दिल्या होत्या.

अशा प्रकारे त्यांचे प्रशासकीय व राजकीय नेतृत्व दिसून येते.

**संदर्भ ग्रंथ सूची :**


१) बेहरे ना. के., पहिले बाजीराव पेशवे, १९३०, पृ. ६०.

२) उपरोक्त - पृ. १५९.

३) सरदेसाई गो. स., पेशवे दफ्तरातून निवडलेली कागदपत्रे लेख-१३, खंड ३४, सेंट्रल गव्हनर्मेंट प्रेस, मुंबई, १९३४ पृ. ३४.

४) इंगळे राम, मावळते मल्हारराव. उद्योन्मुख महादजी, विश्वभारती प्रकाशन, नागपूर, १९८५, पृ. ४.

५) सरदेसाई गो. स., पेशवे दफ्तर लेख १४, १९३४, मुंबई, पृ.२४.

६) उपरोक्त - पृ. २६, २७.

७) उपरोक्त - पृ. १६३.

८) सरदेसाई गो. स., पेशवा दफ्तर लेख २२, सेंट्रल गव्हर्नमेंट प्रेस, मुंबई, १९३४, पृ. १६४.

९) सरदेसाई गो. स., नानासाहेब पेशव्यांचे चरित्र प्रकाशन - केशव भिकाजी ढवले, मुंबई, १९४२, पृ.२७.

१०) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, इंदोर, १९३० पृ. १०८.

११) सरदेसाई गो. स., नानासाहेब पेशव्यांचे चरित्र प्रकाशक, केशव भिकाजी ढवले. १९४२ मुंबई, पृ. ३९.

१२) खरे वा. वा., ऐतिहासिक लेख संग्रह भाग -२, नानाभाऊ छापखाना, पृ. ५७.

१३) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने भाग -१ होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, इंदोर, १९४०, पृ. २०५.

१४) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास भाग-२, होळकर गव्हमेंट प्रेस, इंदोर, १९४४, पृ. १६०, १६१.

१५) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने भाग-१, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध लेख १७५, इंदोर, पृ. १०७.

१६) खरे वा. वा., ऐतिहासिक लेख संग्रह भाग- ७ वा, नानाभाऊ छापखाना, पुणे, पृ. २९०.

१७) पुरंदरे कृ. वा., पुरंदरे दफ्तर भाग-३, प्रकाशक - भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९५१, पृ. ३५.

१८) आपटे द. वि., चंद्रचूड दफ्तर १ ली कला प्रकाशक' पोतदार द. वा. मुजूमदार ग.वा. पृ. १०४.

१९) वाड चि. ग. व पारसनीस द. ब., इतिहास संग्रहात प्रसिद्ध झालेली पेशवे दफ्तरातील सनदा पत्रातील माहिती, (शाहू राजे व त्यांचे पुढील कराकीर्द) प्रकाशन तुकाराम जावजी, मुंबई, १९१७, पृ. २०९.

२०) उपरोक्त - पृ. २१०.

२१) टिकेकर, श्री.रा., *अहिल्याबाई होळकर*, भागवत अ. न., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने खंड १ ला, प्रकाशक द.बा. दांडेकर पृ. ४.

२२) शास्त्री अवधूत (संपा.), धर्मभास्कर (अहिल्याबाई होळकर विशेषांक) जून १९७५ मुंबई पृ. १६.

२३) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध प्रथमावृत्त, इंदोर, १९४० पृ. २६३.

२४) ठाकूर वा. वा., लाईफ ॲण्ड लाईफ वर्क्स ऑफ देवी अहिल्याबाई, नयी दुनिया प्रेस इंदोर, १९४०, पृ. ४८.

२५) सरदेसाई गो. स., पेशव्यांच्या रोजनिशीतील उतारे खंड २२, सेंट्रल गव्हन्मेंट प्रेस, मुंबई, १९३०, पृ. २१०.

२६) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास भाग-२, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिध्द, इंदोर, १९४४, पृ. ४.

२७) सरदेसाई गो. स., मराठी रियासत मध्यविभाग भाग-३, प्रकाशक, दामोदर सावळाराम आणि मंडळ, पुणे, १९२१, पृ. ४.

२८) सरदेसाई गो. स., पेशवे दफ्तरातील निवडलेली पत्रापैकी अप्रकाशित, पृ. १८०.

२९) खरे वा. वा.,ऐतिहासिक लेख संग्रह भाग ४, प्रकाशक कुरुंदवाडा नानाभाऊ छापखाना, पृ. १८७.

३०) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास भाग-१, होळकर गव्हर्नमेंट प्रेस इंदोर, १९४४, पृ. ३००.

३१) इंगळे राम, अहिल्याबाई होळकर, विश्वभारती प्रकाशन, नागपूर १९९४, पृ. ११.

३२) उपरोक्त - पृ. ११.

३३) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास खंड-१, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध १९४० इंदोर, पृ. १६९, १७०.

३४) इंगळे राम, अहिल्याबाई होळकर, विश्वभारती प्रकाशन, नागपूर, १९९४, पृ.१२.

३५) उपरोक्त - पृ. १२.

३६) केळकर म. न., होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, प्र. आ. पुणे १९५४ पृ. १८८.

३७) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास खंड-१, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध १९४०, इंदोर पृ. १७३.

३८) उपरोक्त - पृ. १७३.

३९) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग-२, निर्णय सागर छापखाना, मुंबई १९११, पृ. १७५.

४०) सरदेसाई गो. स., मराठी रियासत उत्तर विभाग खंड-२, प्रकाशन - दामोदर सावळा राम आणि मंडळ, मुंबई, १९२१, पृ. ६.

४१) गोखले वा. दा., अहिल्याबाई होळकर, ठोकळ प्रकाशन, पुणे द्वितीय आवृत्ती, १९६२, पृ. २३, २४.

४२) उपरोक्त - पृ. २४.

४३) उपरोक्त - पृ. २५, २६.

४४) जहागिरदार विजया, कर्मयोगिनी, चेतश्री प्रकाशन, धुळे, पृ. १५.

४५) खरे वा. वा., नाना फडणीसाचे चरित्र प्रकाशक यशवंत वासुदेव शास्त्री, तिसरी आवृत्ती १९२७, पृ. १४०.

४६) इंगळे राम, मावळते मल्हारराव उद्योन्मुख महादजी विश्वभारती प्रकाशन, नागपूर, १९८५, पृ. ५३.

४७) सरदेसाई गो. स., मराठी रियासत उत्तर विभाग भाग - २, प्रकाशक - दामोदर सावळाराम आणि मंडळी, १९२१. पृ. ११.

४८) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने भाग - २, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, इंदोर, पृ. ३९.

४९) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने भाग-२, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध पृ. ४०.

५०) उपरोक्त - पृ. ४०.

५१) उपरोक्त - पृ. ४१.

५२) केळकर य. न., होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, प्रथमा आवृत्ती, पुणे, १९५४, पृ. १०.

५३) उपरोक्त - पृ. १०.

५४) भागवत अ. ना., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने भाग-२, होळकर सरकार पुस्तकमाला, १९२४, इंदोर, पृ. ३६.

५५) पारसनीस द. ब., महेश्वर, दरबारची बातमीपत्रे भाग-१, निर्णय सागर छापखाना, मुंबई, १९१०, पृ. ६२.

५६) उपरोक्त - पृ. १५२.

५७) सरदेसाई गो. स., गर्गे, स.मा. (संपा.) मराठी रियासत खंड-७, पॉप्युलर प्रकाशन, १९९१, मुंबई, पृ. २०.

५८) उपरोक्त - पृ. २१.

५९) उपरोक्त - पृ. २१.

६०) उपरोक्त - पृ. २२.

६१) उपरोक्त - पृ. २२.

६२) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग -२, निर्णय सागर छापखाना, मुंबई, १९११, पृ. ८०.

६३) उपरोक्त - पृ. ८.

६४) उपरोत - पृ. ८५, ८६.

६५) उपरोक्त - पृ. ९८, १०२.

६६) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग-२, निर्णय सागर छापखाना, मुंबई, १९११, पृ. १८७.

६७) इंगळे राम, मावळते मल्हारराव, उद्योन्मुख महादजी विश्वभारती प्रकाशन, नागपूर १९८६, प्रथम आवृत्ती पृ. ६९.

६८) उपरोक्त - पृ. ७५, ७६.

६९) उपरोक्त - पृ. ७८.

७०) सरदेसाई गो. स., गर्गे, स.मा. (संपा.)मराठी रियासत खंड - ७ पॉप्युलर प्रकाशन, १९९१, मुंबई, पृ. ३७८.

७१) सरदेसाई गो. स., गर्गे, स.मा. (संपा.) मराठी रियासत खंड-७, पॉप्युलर प्रकाशन, १९९१, मुंबई, पृ. ३७९, ३८०.

७२) उपरोक्त - पृ. ७८, ७९.

७३) उपरोक्त - पृ. ७९.

७४) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग-२, मुंबई, १९११, पृ. २०७, २१२.

७५) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास भाग-२, होळकर गर्व्हमेंट प्रेस, इंदोर, पृ. १५.

७६) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग-२, मुंबई, १९११, पृ. २०९.

७७) उपरोक्त - पृ. २१६.

७८) उपरोक्त - पृ. २२१.

७९) उपरोक्त - पृ.२२३, २२४.

८०) उपरोक्त - पृ. २४६.

८१) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास भाग-१, पृ. ३५७.

८२) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक - अहिल्यादेवी प्रगती मंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ६५.

८३) उपरोक्त - पृ. ६५.

८४) उपरोक्त - पृ. ६६.

८५) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहासाची साधने, खंड १ ला व भाग २ रा, १९४६, पृ. २०१.

८६) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, जळगाव २०००. पृ. ६७.

८७) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास खंड १ ला, भाग २ रा, १९४५ इंदोर पृ. १७८.

८८) उपरोक्त - पृ. १७८.

८९) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, जळगाव २००० पृ. ६९.

९०) ठाकूर वा.वा., होळकरशाहीचा इतिहास खंड १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, १९४५, इंदोर पृ. १७६.

९१) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ७१.

९२) भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे ऐतिहासिक संकीर्ण निबंध खंड ३ रा. पृ. ६७.

९३) शर्मा हिरालाल, अहिल्याबाई, प्रकाशन - नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया, मुंबई १९६७, पृ. ८०.

९४) पुरुषोत्तम दास, देवी श्री अहिल्याबाई, प्रकाशन- एम. ए. मोरमकर, १९२३, पृ. १७५, १७६.

९५) पाल पुष्पा, भारतीय महान नारी अहिल्याबाई होळकर निर्देशक व प्रकाशक विभाग - सूचना और प्रसारण मंत्रालय भारत सरकार, नई दिल्ली, १९९२, पृ. १८.

९६) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ७३.

९७) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग १ ला लेख ५, प्रकाशक - तुकाराम जावजी, निर्णय सागर छापखाना, मुंबई येथे प्रसिद्ध १९११, पृ. १९.

९८) शर्मा हिरालाल, रामसेवक गर्ग (संपा) - अहिल्या स्मारिका, प्रकाशक - खासगीदेवी अहिल्यादेवी होळकर चॅरिटीज ट्रस्ट माणिकबाग, इंदोर, १९७३,७४ पृ. ३८, ३९.

९९) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग १ ला अ. नं. ५, तुकाराम जावजी, निर्णय सागर छापखाना, मुंबई, १९११, पृ. २१.

१००) उपरोक्त - पृ. २१.

१०१) उपरोक्त - पृ. ६७.

१०२) रामदास रवीन्द, *महान मुत्सद्दी व पुण्यशील अहिल्याबाई,* शास्त्री अवधूत (संपा), धर्मभास्कर (अहिल्यादेवी होळकर विशेषांक) जून १९७५, पृ. ११६.

१०३) लोही म. ना., देवी अहिल्यादेवी होळकर वास्तव दर्शन, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर जून २००१, पृ. ४८.

१०४) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग-१, प्रकाशक तुकाराम जावजी, निर्णय सागर छापखाना १९११ मुंबई, पृ. ७७, ७८.

१०५) गर्ग रामसेवक, *अहिल्याबाई होळकर कालीन मालवा की डाक-व्यवस्था के कुछ पहेलू,* शर्मा हिरालाल (संपा.), अहिल्या स्मारिका १९७३-७४, पृ. ३२.

१०६) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग २ री, इंदोर, १९४५ पृ. ३९४, ३९५.

१०७) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध. होळकर गव्हर्न्मेंट प्रेस, इंदोर १९४४, पृ. १८९.

१०८) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास, खंड १९४४ इंदोर पृ. २२९, २३०.

१०९) टिकेकर, श्री.रा., *अहिल्याबाई होळकर,* शास्त्री अवधूत (संपा), धर्मभास्कर (अहिल्यादेवी होळकर विशेषांक) मुंबई, १९७५, पृ. १७.

# प्रकरण तिसरे

# अहिल्याबाई होळकर यांचे सामाजिक कार्य

**प्रास्ताविक :**

राजकारण आणि समाज यातील संबंध अतिशय घनिष्ठ आहे कारण मनुष्य हा समाजशील प्राणी आहे. राजकारण हे समाजाच्या जीवनाचे एक अंग आहे. समाजामध्ये अनेक प्रकारांच्या लोकांचा समावेश होतो. समाजाशिवाय राजकारणाचा जन्म होऊ शकत नाही आणि समाजाच्या अभ्यासाशिवाय राजाकरणाचा अभ्यास करणे योग्य ठरत नाही. उदा. भातीय राजकारणाचा अभ्यास करताना आपणास भारतातील लोकांच्या सामाजिक जीवनाचा अभ्यास करणे क्रमप्राप्त ठरते. ह्या संबंधी ''फ्रँक्लीन एच गीडींग्ज असे म्हणतो की ज्याला समाजाचे नियम माहित नाही त्याला राज्यशास्त्र आणि त्याचे सिध्दांत अमलात आणण्याची कला ह्याची माहिती शिकविणे म्हणजे गुरुत्वाकर्षणाचे नियम माहित नसणाऱ्या व्यक्तिला खगोलशास्त्र शिकविणे होय की ज्या अभ्यासाचा त्याला काहीच फायदा आणि ज्ञान प्राप्त करता येणे शक्य नाही''[१]

राजकारण हे राजकीय आणि सामाजिक परिस्थिती आणि त्यांचा प्रभाव ह्यांचेशी संबंधित अशी कला आहे. समाजाचे ज्ञान नसलेल्या व्यक्तीला राजकारणाचे शिक्षण देणे त्याला राजकीय विचार समजावून सांगणे, त्याचे मतपरिवर्तन करणे. त्याचेवर प्रभाव पाडणे, राजकारणाशी संबंधित कृती करणे निरर्थक आहे. राजकारण समाजाला प्रभावित करतो म्हणून ''सारटोरी आपल्या 'From the sociology of politics to political sociology' ह्या ग्रंथात म्हणतो की राजनितिकरणामुळे समाजाचे स्वरुप अधिकाधिक राजकीय झाले आहे, त्यामुळे समाज आणि राजकारण, राजनीति ह्यांचे स्वतंत्रपणे अध्ययन करणे कठीण

आहे. त्या दोघांचे एकत्रित अध्ययन करणे ह्याचाच राजनीतिक समाजशास्त्रात अभ्यास होतो''.[२]

डाउझे याने राजकीय समाजशास्त्राचे क्षेत्र काही गोष्टी पुरतेच मर्यादित ठेवण्यास विरोध दर्शविला आहे. ''राजकीय समाजशास्त्र म्हणजे समाजशास्त्राच्या चौकटीत केलेला राजकीय वर्तणुकीचा अभ्यास होय'' अशी व्याख्या केली आहे. राजकीय समाजशास्त्रज्ञांनी अधिक व्यापक अर्थाने व वस्तुनिष्ठ भूमिकेतून राजकारणाचा अर्थ लावण्यास सुरुवात केली. मॅक्स वेबर याने या संदर्भात महत्वाचे विवेचन केले त्याचे मते ''राज्याकडे असणाऱ्या वैशिष्ट्यपूर्ण अधिकारास म्हणजे शारीरीक बळाचा वापर करण्याच्या किंवा सक्ती करण्याच्या अधिकारास महत्वपूर्ण मानले''.

लिपसेटच्या मते ''राज्यशास्त्राचा आरंभ राज्याने होतो आणि ते समाजाला कसे प्रभावित करते याचा अभ्यास होतो तर राजकीय समाजशास्त्राचा आरंभ समाजाने होतो व त्याचा राज्यावर कसा प्रभाव होतो ते अभ्यासले जाते'' या सर्व विचारवंताचा विचारावरुन असे लक्षात येते की राजकारण व समाजकारण परस्पराशी संबंधीत आहे.

प्राचीन काळामध्ये राजाने काय करावे ह्या संबंधीची काही मार्गदर्शक तत्वे, सूचना आणि नैतिक आदर्श इत्यादीचा उल्लेख महाभारतात आढळतो. महाभारतातील शांतीपर्व आणि अनुशासन पर्वात प्रजेच्या कल्याणासाठी राजाने कोणते कार्य करावे ह्यांचा उल्लेख केला आहे. ह्याचा अर्थ हा की राजाने आपल्या संपत्तीचा उपयोग दुर्बलांसाठी करावा आणि दुर्बल सुध्दा बलवान होतील हेच उद्दिष्ट राजाने साध्य करावे. कैटिल्यानेही आपल्या अर्थशास्त्र ग्रंथात ''प्रजेच्या सुखात आणि हितामध्ये राजाचे सुख आणि हित सामावले असते विद्याविभूषित राजाला स्वकर्तव्याची जाणीव होते आणि तोच प्रजेच्या हितासाठी झटतो.''[३] ह्यावरून कल्याणकारी राज्याची कल्पना महाभारत आणि कौटिल्याचे अर्थशास्त्र ह्यामध्ये होती असे म्हणता येते. मनुष्याचे जीवन सुखी करण्यासाठीच राज्याची निर्मिती

झाली असे राज्याचे कल्याणकारी स्वरुप ॲरिस्टॉटलने स्पष्ट केले. इंग्लंडची राणी एलिझाबेथ पहिले हिने पुअर ॲक्ट पास केला त्या कायद्याने निर्धन व्यक्तीना काम मिळवून दिले व अपंगाना विशेष सवलती दिल्या तसेच गरीबांचे हितसंवर्धन करण्यासाठी अधिकारी नेमले ही सर्व कार्ये कल्याणकारी स्वरुपाची होती.

कल्याणकारी राज्याच्या निर्मितीकरिता सामाजिक, आर्थिक व धार्मिक व राजकीय क्षेत्रातील असमानता दूर करणे आवश्यक असल्यामुळेच भारत सरकारने त्याकरिता महत्वपूर्ण कायदे केले आहेत. अशाच प्रकारे अहिल्याबाई होळकरांनी तत्कालीन कालखंडात त्यांच्या हाती असलेल्या राजकीय सत्तेचा उपयोग कल्याणकारी राज्य निर्माण करण्यासाठी केला आहे त्यामुळे सामाजिक कार्य या प्रकरणात राजकीय विश्लेषण पध्दतीने त्याचा अभ्यास केला आहे.

सतराव्या शतकातील समाज हा जाती आणि पोट जाती ह्यांनी विभागलेला होता. या काळात जाती व्यवस्था कडक होती आणि त्यामुळे विषमताही मोठ्या प्रमाणात होती. अशा विषम समाजात राहूनच शिवाजी महाराजांनी राष्ट्रनिर्मितीचे कार्य केले. शिवाजीने या भेदींची आणि विषमतेची पर्वा न करता त्या सर्वांना स्वराज्यनिर्मितीकरिता एकत्रीत आणण्यात यश मिळविले. जीवनाच्या सर्वच क्षेत्रात सर्वसाधारण माणसांवर इतके अन्याय होत होते की त्या सर्वांनी आपसातील मतभेद मिटवून एकत्रित येणे आवश्यक होते. शिवाजी महाराजांनी काळाची गरज ओळखून त्या सर्वांना उत्कृष्ट नेतृत्व दिले. शिवाजी महाराजांना ही थोरवी लक्षात घेत असताना त्यांना सामाजिक मर्यादामध्ये काम करावे लागले. त्या मर्यादाही आपण लक्षात घेतल्या पाहिजेत म्हणूनच शिवाजी महाराजांनी तळागाळातील विविध जाती-धर्माचे मावळे आपल्या भोवती एकत्रीत करुन त्यांच्या मदतीने राष्ट्रउभारणीचे कार्य हाती घेतले.

सामाजिक विषमतेचे निर्मूलन व्हावे आणि सामाजिक समता निर्माण व्हावी असे निकराचे प्रयत्न या काळातील थोर संतांनी केले. सतराव्या शतकातील सामाजिक परिस्थितीचा आढावा घेत असताना संतांनी केलेल्या सामाजिक कार्याची अभूतपूर्व दखल घेतली पाहिजे. या संतांनी आपली शिकवण देताना भक्ती मार्गाचा पुरस्कार केला आणि साध्या लोकभाषेतून आपल्या तत्वज्ञानाचा प्रसार केला. सामाजात समता निर्माण केली. शिवाजी महाराजांनी जे नवीन राष्ट्र घडविले त्याकरता संतानाही मोठी अनुकूल मानसिक परिस्थिती समाजात निर्माण केली असे दिसते.

**पेशवेकालीन सामाजिक जीवन :**

अठराव्या शतकात पेशव्याच्या काळातील सामाजिक जीवनाचा विचार करताना मुसलमान राज्यकर्त्यांशी सतत संघर्ष करूनच मराठ्यांना आपले जीवन टिकवून ठेवावे लागले होते. हे लक्षात घेतले पाहिजे. किंबहुना शिवाजी महाराजांच्या काळापासून आपण आपले स्वत्व, अभिमान आणि स्वधर्म कसा टिकवावा याचाच सतत मराठ्यांसमोर विचार होता आणि मुसलमानांनी ह्या जीवनावरच आघात चालविल्याने मराठ्यांसमोर मोठी गंभीर परिस्थिती निर्माण झालेली होती. शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना केली व मुसलमान राज्यकर्त्यांनी ह्या हिंदू जीवनावर सतत आघात केले व त्याचा मराठ्यांनी सतत प्रतिकार केला. साहजिकच मराठा साम्राज्याला राज्यकर्त्यांची जी सामाजिक चौकट निर्माण झालेली होती. पेशव्यांच्या कालखंडात ही सामाजिक चौकट वर्णव्यवस्थेवर आधारीत होती.

पेशवेकालीन सामाजिक जीवनाचा आढावा घेताना वर विशद केलेले मुद्दे विशेषत्वाने लक्षात घेतले पाहिजे. अहिल्याबाईंच्या सामाजिक कार्याचा शोध घेताना तत्कालीन सामाजिक व्यवस्था चालीरिती, जातीव्यवस्था, वतने, धर्मांतर, संस्कार, मुहूर्त,

व्रत वैकल्ये, सण-उत्सव आदींचा विचार केला असता तत्कालीन सामाजिक व्यवस्था अत्यंत विषम होती असे संशोधनातून दिसते.

## जातीव्यवस्था :

पेशवे हे स्वत:च ब्राह्मण असल्यामुळे ब्राह्मण जातीचा समाजात वरचष्मा असणे साहजिकच होते. ब्राह्मणांनी आपली पारंपरिक कर्तव्ये सोडून इतर क्षेत्रात शिरकाव केल्याने सामाजिक नेतृत्व ब्राह्मणाकडे आलेले होते. आपल्या हातातील सत्ता दुसऱ्या वर्गाकडे जाऊ नये अशी वरिष्ठ वर्गाची इच्छा असल्यामुळे पेशवेकालीन वतनदारांमध्ये वेळोवेळी संघर्ष निर्माण झाले. पेशव्यांच्या काळात ब्राह्मण विरुद्ध अब्राम्हण असाच संघर्ष निर्माण झाला असे नसून खुद्द ब्राह्मणांमध्ये सुद्धा संघर्ष झाले. त्या संघर्षामध्ये चितपावन ब्राह्मण विरुद्ध इतर ब्राह्मण पोटजात असे संघर्ष झाले. जाती जातीमध्ये संघर्ष निर्माण झाल्यास त्या समस्या सोडवण्यासाठी एक संस्था निर्माण झाली तिला गोतसभा असे म्हणत गोतसभेमध्ये उपजातीमधील प्रमुख व्यक्तींचा समावेश असे. या व्यक्ती वयोवृद्ध व अनुभवी असत. पेशवेकाळातील दुसरी महत्वाची सामाजिक संस्था म्हणजे वतनसंस्था गावाचा कारभार चालविण्याकरिता पाटील, कुलकर्णी हे वतनदार समजले जात ह्यांना मदतीसाठी अठरा बलुतेदार ह्यांच्या मदतीने गावगाडा चालविण्यात येई. अशा प्रकारे तत्कालीन व्यवस्था होती.

## तत्कालीन सामाजिक चालीरिती :

हिंदू समाजात पूर्वपार चालत आलेल्या अनेक प्रथा, चालीरिती पेशवाईत चालू होत्या. त्याच्यामध्ये वर्ण व्यवस्थेमुळे वाढ झाल्याचे दिसून येते. बारसे, जावळ, व्रतबंध, बालविवाह इत्यादी चालीरिती मोठ्या प्रमाणात चालत. विवाहास मुलगी आठ वर्षाची आणि मुलाचे वय १४ वर्ष योग्य समजण्यात येई. सतीची दृष्टरूढ अस्तित्वात होती. साधारण १० व्या शतकानंतर सतीची प्रथा रूढ झाली असे समजण्यात येते. जी स्त्री

आपल्या मृत पतीबरोबर सहगमन करते ती आपल्या कुळाचा उद्धार करते अशा कल्पना त्या काळी रूढ होत्या. सती जाण्याची प्रथा सर्व जातीत होती. थोरल्या माधवरावाची पत्नी रमाबाई सती गेल्याचे उदाहरण पेशवाईत प्रसिद्ध आहे. खुद्द अहिल्याबाई होळकरांना सती जाण्याची इच्छा होती परंतु मल्हारराव होळकरांनी अहिल्याबाईंना त्यापासून परावृत्त केले ब्रिटीशांच्या काळात ही प्रथा कायद्याने नष्ट करण्यात आली.

**समाजातील अंधश्रद्धा :**

पेशवेकालीन समाजात देवधर्मावर मोठ्या प्रमाणात विश्वास होता. स्वजाती, स्वधर्म, स्वराज्य ह्या संबंधी समाजाला अतीव अभिमान होता त्यातून काही अंधश्रद्धा निर्माण झाल्या. शकून, ग्रहशांती, भूतबाधेच्या कथा, मुहूर्त, व्रतवैकल्य आणि होमहवन, दक्षिणेची प्रथा, सण, गुलामगिरी पोशाख दागदागिने इत्यादी अंधश्रद्धेमध्ये समाजव्यवस्था अडकली होती. स्त्रीयांविषयी मोठ्या प्रमाणात अस्पृश्यता होती.

**पेशवेकालीन स्त्री जीवन :**

कुटुंबसंस्थेचा प्रमुख आधार म्हणजे स्त्री होय. तत्कालीन कालखंडात स्त्रियांकडे पाहण्याचा कुटुंबाचा किंवा समाजाचा दृष्टीकोन फारसा चांगला होता असे म्हणता येणार नाही पुरुषांना समाजात जे स्थान होते ते स्त्रीयांना कधीच प्राप्त झाल्याचे दिसत नाही. भारतीय संस्कृती पुरूषप्रधान असल्यामुळे स्त्रियांना सामाजिक स्वतंत्र नव्हते. मध्ययुगीन कालखंडात परधर्मीय आक्रमणाचे भय वाढल्याने होते ते स्वातंत्र्यही स्त्रियांना संरक्षणाच्या नावाखाली गमवावे लागले. आठ-नऊ वर्षाची वधू उपवर झाल्याची चिंता समाजातील सर्वच घटकांना लागत असल्याने व लग्नानंतरचे जीवन अत्यंत दु:खी व कष्टमय असल्याने तिला सामाजिक स्वतंत्राची जाणीव नव्हती.

समाजाने आणि शास्त्राने तिच्या पुढे पारलौकिक कल्याणाच्या अफाट कल्पना ठेवल्याने व सासर-माहेरचा कुलोद्धार आपले हाती एकवटलेला आहे. या भ्रामक

जबाबदारीने ती इतकी भारावून गेली होती की कोणत्याही दारूण परिस्थितीस सामोरे जाण्याची तिची मानसिक व शारिरीक तयारी अतिशय भक्कम झालेली होती, म्हणून 'बापू गोखल्याची दहा-बारा वर्षाची चिमुरडी सून जिचे बालपण अद्याप संपले नाही व पती म्हणजे काय. कुलोद्वार म्हणजे काय याची जिला जाणीव नाही ती हसतमुखाने सती जाते.'[४] ही घटनाच स्त्री जीवनावर व्यापक प्रकाश टाकणारी आहे. स्त्रीची शिक्षणापासून फारकत झाली होती. स्त्रियांनी शिकू नये अशीच लोक समजूत होती. राजघराण्यातील स्त्रियांना अक्षरओळख असल्याचे दिसते. पेशवे, शिंदे, होळकर, पटवर्धन, दाभाडे, गायकवाड यांच्या घराण्यातील स्त्रियांना परंपरागत पद्धतीचे शिक्षण मिळाले होते.

एकत्र कुटुंब पद्धतीमध्ये स्त्रीचे स्थान गौण होते. सासू, सासरे, दीर, जावा व घरातील इतर आप्तजन यांची मनोभावे सेवा करणे हे तिचे आद्य कर्तव्य होते. दिवसभराचे कष्ट उपसंपल्यानंतर तिला उरला-सुरला घास मिळत असे तसेच बहुपत्नीत्वाची व विषम विवाहाची चाल रूढ असल्याने कित्येक स्त्रियांना उपेक्षित जीवन जगावे लागत होते. बालविवाह, वैधव्य, केशवपन, सती, बहुपत्नीत्व, विषम विवाह, पडदा पद्धत, हुंडापद्धती, असूर विवाह, राक्षस विवाह, नीतिबाह्य लग्ने अशा अनेक जटील प्रथा अस्तित्वात होत्या.

वरीलप्रमाणे आठराव्या शतकातील सामाजिक परिस्थितीचा आढावा घेतला असता समाजात स्त्रिला अत्यंत गौण स्थान होते परंतु अहिल्याबाई होळकरांनी त्यातील काही प्रथा मोडीत काढून कल्याणकारी सामाजिक कार्य केले याचा शोध या प्रकरणात घ्यावयाचा आहे. आपण जे काही करू त्याचा जाब आपणास ईश्वरास द्यावा लागेल असे मानणारी प्रजेच्या सुख-समृद्धीसाठी झटणारी व प्रजेस पुत्रवत मानणारी प्रजावत्सल राज्यकर्ती होती. आपल्या राज्यात हुंडाबंदी, स्त्रीला मुलगा दत्तक घेण्याचा अधिकार यासारखे कायदे केले. तसेच स्वत:च्या मुलीला लग्नात कन्यादान करून व सती न जाता तत्कालीन समाजापुढे आदर्श निर्माण केला. आपल्या राज्यसीमेच्या बाहेर भारतातील सर्व तीर्थक्षेत्री व राज्यात

मंदिरे, घाट धर्मशाळा अन्नछत्रे, विहीरी, रस्ते, तलाव, पशुपक्षांसाठी चारा पाण्याची व्यवस्था इत्यादी कार्ये केली यातून त्यांचे नेतृत्व तयार झाले.

### अहिल्याबाई होळकर यांनी बांधलेले घाट :

आजच्या कालखंडातही नदीला धार्मिक, सामाजिक, शेतीच्या अशा विविध दृष्टीने महत्त्वाचे स्थान आहे. नदीत स्नान केल्याने पापशालन होते अशी हिंदू धर्मीयांची परंपरागत समजूत आहे. म्हणून हिंदू धर्मात नदीला पवित्र स्थान आहे. भारतासारख्या देशात कुंभमेळा, शाहीस्नान होते. तीर्थक्षेत्री यात्रेकरू स्नान करूनच देवाच्या दर्शनाला जातात. तत्कालीन कालखंडात तीर्थयात्रेसाठी जाण्याचा प्रघात मोठ्या प्रमाणावर होता. त्यामुळे तीर्थक्षेत्री अनेक समस्या, यात्रेकरूंच्या अडचणी असे तत्कालीन कालखंडात शासनव्यवस्था नसल्यामुळे असे कार्य संस्थानिक राजे, सरदार इत्यादी लोक करत असत. अहिल्याबाई होळकरांनी यात्रेकरूंची व तेथील नगरवासीयांची सोय व्हावी म्हणून देशभरात अनेक ठिकाणी घाट बांधले, धर्मशाळा बांधल्या, रस्ते-पूल तयार केले. अन्नछत्र सुरू केले. यामुळे कारागिरांनाही रोजगार उपलब्ध झाला व भारतीय शिल्प कालेलाही उत्तेजन मिळाले असे संशोधनातून स्पष्ट होते.

### अहिल्याबाईनी महाराष्ट्रात बांधलेले घाट :

### १) पैठण येथील नागघाट :

महाराष्ट्रात औरंगाबाद हे इतिहास प्रसिद्ध शहर म्हणून ओळखले जाते. औरंगाबाद शहरापासून ४५ कि. मी. अंतरावर पैठण आहे. पैठणच्या इतिहासात सातवाहनांच्या कारकिर्दीला महत्त्वाचे स्थान आहे. याबरोबरच पैठणला धार्मिक महत्त्व देखील आहे. महाराष्ट्राच्या अनेक धार्मिक तीर्थक्षेत्रात पैठणचा नाम्मोल्लेख केला जातो. संतकालंखडात जो समाज अज्ञान अंधश्रद्धेत पिचत पडलेला होता त्या समाजाला ज्यांनी मार्गदर्शन व दिशा दिली ते प्रमुख संत एकनाथ, शिवदीन नाथ, अमृतरायही हे सर्व पैठणचे आहेत.

पैठणच्या परिसराला समृद्ध करणारी नदी म्हणजे गोदावरी, गोदावरीने पैठण शहराला पूर्ण वेढा दिला आहे. वेला आणि गंगा या उपनद्या पैठणच्या उत्तरेस गंगुलवाडी जवळ गोदावरीस मिळतात तेथे नाथसागर मोठे धरण आहे. हिंदू परंपरेप्रमाणे तीर्थांचे दोन प्रकार आढळतात. 'एक जलतीर्थ व दुसरे स्थळतीर्थ होय. जलतीर्थामध्ये स्नान केल्यास आपण पापमुक्त होतो अशा प्रकारची समाजधारणा होती आणि स्थलतीर्थाच्या दर्शनाने पुण्य लाभते तथापि स्थल तिर्थापेक्षा जलतिर्थाचा महिमा अगाध होता म्हणून प्रतिष्ठानसारख्या पुरातन क्षेत्री अशा प्रकारची अनेक तीर्थ निर्माण करण्यात आली'[५] तिर्थक्षेत्री दानप्रित्यर्थ घाट बांधून देण्याची प्रथा होती. हे घाट तिर्थाला लागूनच बांधलेले आढळतात. कालांतराने तिर्थाबरोबरच घाटालाही महत्त्व प्राप्त झाले. काही घाटावर धर्मसभा भरविण्याची प्रथा होती.

'नागघाट हा पैठण येथील सर्वात प्राचीन घाट होय. येथील परंपरेनुसार हा घाट सातवाहन काळापासून अस्तित्वात होता याची नागडोह म्हणून महानुभवाच्या साहित्यात नोंद आहे. येथेच ज्ञानेश्वरांनी रेड्यामुखी वेद वदविण्याचा चमत्कार केला. घाटावर शिव व विष्णुची अनेक मंदिर आहेत, अहिल्याबाई होळकर यांनी या घाटाची पुनर्रचना केली.'[६] 'अहिल्याबाईनी या घाटाची पुनर्रचना केली तसेच इ. स. १७५६ मध्ये याचा काही भाग रघुनाथ या मराठी सरदाराने बांधला असे सांगणारा एक शिलालेख या घाटाच्या एका भिंतीवर आहे. या परिसरात अन्य शिलालेख आहेत तथापि ते न ओळखता येण्याइतके अस्पष्ट झाले आहेत.'[७] ऐतिहासिक अशा या पैठण नगरीत अहिल्याबाईंनी यात्रेकरूंच्या स्नानासाठी व स्नानानंतर देवदर्शन घेता यावे या उद्देशाने हा दगडी नागघाट बांधला याच घाटावर ज्ञानेश्वरांनी रेड्यामुखी वेद वदविला. या प्रसंगाची आठवण म्हणून रेड्याची एक दगडी प्रतिमा बसविण्यात आली आहे. या समोरच गणपती मंदिर व पुढे महादेव मंदिर आहे.

प्रतीवर्षी नागपंचमीस नागघाटावर यात्रा भरते. आज मात्र या घाटाची दुर्दशा झाली आहे. अनेक ठिकाणी नाग घाट ढासळला आहे.

## २) नाशिक येथील घाट :

नाशिक या शहराची संस्कृती फारच प्राचीन आहे. महाराष्ट्रात मराठी सत्ता स्थापन झाल्यावर. मुसलमानांनी जी पवित्र क्षेत्रे धुळीस मिळविली. या कामी पेशव्यांच्या पदरी असलेले नामवंत सरदार, व्यापारी आणि मोठमोठ्या धनवंत लोकांनी नाशिक हे शहर मोठ्या वैभवाच्या शिखरावर नेऊन ठेवले. 'या तीर्थक्षेत्री अहिल्याबाईनी आपल्या कारकिर्दीत घाट व मंदीरे व धर्मशाळा बांधल्या'[८] येथील घाटाच्या समोरच अहिल्याबाई होळकरांनी बांधलेले अहिल्याराम मंदीर व धर्मशाळा आहे. घाटाच्या वर काशी विश्वेश्वराचे मंदिर आहे. घाटाची स्थिती चांगली आहे परंतु हा घाट केव्हा बांधला याला किती खर्च लागला याचा उल्लेख सापडत नाही.

## ३) चौंडी येथील घाट :

चौंडी हे अहिल्याबाई होळकरांचे जन्मस्थान महाराष्ट्रातील नगर जिल्ह्यातील जामखेड तालुक्यापासून २० कि.मी. सीना नदीच्या काठी वसले आहे तेथे अहिल्याबाईंनी देवालयाची व घाटाची निर्मिती केली आहे. 'चौंडी अहिल्याबाईनी जन्मगावी अहिल्येश्वर मंदिर व घाट बांधले'[९] चौंडी येथील घाट गावाच्या शेजारी वाहत असलेल्या सीना नदीवर बांधला. नदीवर आंघोळ करून जवळच अहिल्याश्वराच्या मंदिराचे दर्शन घेता येते. या घाटाची स्थिती आजही चांगली आहे. या घाटाचा फायदा गावातील व परिसरातील लोकांना होत आहे. असे ते प्रत्यक्षात पहिल्यावर आढळून येते.

## ४) पुणतांबे येथील अहिल्याघाट :

अहमदनगर जिल्ह्यातील कोपरगाव तालुक्यातील पुणतांबे एक लहानसे गाव आहे. कोपरगाव शहरापासून २० कि. मी. अंतरावर गोदावरी या नदीच्या काठी हे गाव आहे.

येथील एक सरदार अहिल्याबाईच्या पदरी होते. पुणतांबे हे पुण्यक्षेत्र आहे तेथे अहिल्याबाईनी गोदावरी नदीकाठी बांधून दिला 'पुणतांब्याच्या गोदावरीला बांधलेला हा घाट म्हणजे प्रयाग, मंडलेश्वर येथील घाटाप्रमाणेच उल्लेखनीय घाट म्हणावा लागेल. या घाटाचे बांधकाम लोकमाता अहिल्यादेवी यांनी करवून घेतले"[१०] प्रस्तुत घाट गोदावरी नदीच्या विस्तीर्ण किनाऱ्यावर गावाची वस्ती असलेल्या बाजूने बांधलेला आहे. गोदावरी नदी गावाच्या पश्चिमेला असून उत्तरेकडे वाहत या घाटाला सुंदर अशा २६ पायऱ्या आहेत. एका घाटाला दोन्ही बाजुंनी गोल बुरूज बांधले आहेत. एका बुरूजाच्या वरच्या भागाला पुरातन महादेव मंदीर आहे. या महादेव मंदिराचे दर्शन घेण्यासाठी अहिल्याबाईंनी बुरजालगतच सुंदर काळ्या पाषाणाच्या पायऱ्या बांधुन दिल्या आहेत. पुणतांब्याचा हा घाट अद्यापही अहिल्या घाट म्हणून प्रसिद्ध आहे.

### ५) पंढरपूर येथील घाट :

देशातील अनेक लोकांचे श्रद्धास्थान असलेले पंढरपूर हे एक तीर्थक्षेत्र आहे. सोलापूर जिल्ह्यातील पंढरपूर हे तालुक्याचे गाव पंढरपूरचे अत्यंत प्राचीन काळापासून उल्लेख सापडतात. पंढरपूरावर अनेक वेळा आक्रमणे झाली. विठोबाची मूर्ती सुरक्षित रहावी म्हणून विजयनगरच्या कृष्णदेवरायाने ही मूर्ती विजयनगरला नेली नंतर संत एकनाथाचे पणजोबा संत भागुदास यांनी ती मूर्ती खूप प्रयत्नांनी पंढरपूरला आणली तेव्हापासून ती मूर्ती पंढरपूरात आहे. असा उल्लेख वेगवेगळ्या पुस्तकात आहे. पेशव्यांच्या कारकिर्दीत पंढरपूरला फारच महत्त्व प्राप्त झाले. थोरला माधवराव पेशव्यांनी स्वत:ला राहण्यासाठी खास वाडा बांधला होता. त्यानंतर अनेक सरदारांनी पंढरपुरला आपले वाडे बांधले त्यात होळकर व शिंदेही होते. अहिल्याबाई होळकर ह्या पंढरपूरचे महत्त्व ओळखून होत्या. त्यांनी विठ्ठलाला किंमती दागिने दिल्याचे उल्लेख मिळतात. शिवाय पंढरपूरला महाद्वाराजवळ स्वत:चा वाडा व श्रीराम मंदिर व एक घाट बांधला. चंद्रभागा ही पंढरपूरा शेजारून वाहणारी

नदी गंगेप्रमाणेच पवित्र समजली जाते. येणारा प्रत्येक वारकरी आधी चंद्रभागेत स्नान करतो व नंतर विठ्ठलाचे दर्शन घेतो. या चंद्रभागेच्या काठावर यात्रेकरूंच्या सोयीसाठी अहिल्याबाई होळकरांनी घाट बांधला. 'अहिल्याबाई होळकरांनी पंढरपूरला घाट बांधलेले श्रीराम मंदिर आहे'[११] अहिल्याबाई बांधलेला घाट आजही चांगल्या स्थितीत आहे. त्याचा यात्रेकरूंना उपयोग होत आहे.

**महेश्वर (मध्यप्रदेश) येथील घाट :**

मध्यप्रदेशातील इंदोर शहरापासून ८० कि. मी. अंतरावर नर्मदा नदीच्या काठावर हे शहर वसलेले आहे. महेश्वर हे तालुक्याचे गाव असले तरी आज पर्यटन स्थळ म्हणून प्रसिद्धीस पावले आहे. महेश्वर हे अहिल्याबाई होळकरांच्या राजधानीचे गाव तेथे त्यांनी किल्ला व वाडा बांधला आहे. नर्मदा नदीच्या काठावर हा किल्ला व वाडा आहे. लोकांना नदीतील पाण्याचा उपयोग व्हावा व नदीवरून ये-जा व्हावी, दळणवळणाची सोय व्हावी म्हणून नदीवर अनेक घाट बांधले आहेत हे घाट अप्रतिम आहेत. भारतात असे घाट फक्त महेश्वर व काशी याठिकाणी पहायला मिळतात.

महेश्वर ही १७६७ नंतर अहिल्याबाईंनी राजधानीचे ठिकाण तयार केले. 'महेश्वर मोंगलांच्या अंमलात किल्ला मातीचाच होता. इ. स. १७३३ मध्ये होळकरांच्या अंमलात दुरूस्तीचे काम सुरू झाले. अहिल्याबाई होळकर यांची स्वारी इंदोरहून महेश्वर १७६७ इ. भाद्रपदमासी येऊन राहिली'[१२] प्रथम सरकारवाडा बांधून काढला. नर्मदेचा घाट वाड्याखाली बांधला. श्री काशी विश्वेश्वराचे देऊळ मोठे शिखरावर बांधून स्थान केली. तदनंतर किल्यात श्रीराम मंदिर बांधले. 'किल्ल्याखाली जुनाबाजार होता. तेथे मारू (साळवी कापड विकणारे) लोकांची वस्ती करविली व नव्या पेठा व पुरे वसविली. १) अदितवार पेठ, २) मंगळवार पेठ, ३) फणसेपुरा, ४) मल्हारगंज, ५) गोविंदपुरा, ६) गोविंदपंत गानू

खाजगीवाले त्याप्रमाणे पेठा बसविल्या. बाहेरगावचे व्यापारी, उदमी आणवून वस्ती करविली''[१३]

अशा प्रकारे महेश्वर शहर अहिल्याबाईने वसविले. पेशवाई अखेरचा शाहीर अनंत फंदी हा महेश्वरला जाऊन आला होता. महेश्वरचे वर्णन करणारा एक उत्कृष्ट असा पोवाडा त्याने रचलेला आहे. त्या पोवाड्यात त्याने अहिल्याबाईनी बांधलेल्या घटांचे वर्णन केलेले आहे. ते पुढील प्रमाणे.

'नर्मदा तट निकट घाट।
बहुत अफाट पायऱ्या दाट॥
चिरेबंदी वाट मुक्तीची शिवालये
कैलास साम्यता नाना परीची॥
रचली रामकृष्ण मंदिरे।
बहुत सुंदरे बंधली घरे॥'[१४]

स्वामी पांडे यांनी अहिल्या स्मारीका या ऐतिहासिक मासिकात 'अहिल्याबाई द्वारा निर्मित घाट' या लेखात घाटांचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे. महेश्वर येथील घाटात जी एकता व एकसंघता आहे ती मजबुती आणि स्थापत्य शास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे येथील घाटांची संख्या २८ आहे. घाट हा आकाराने मोठा आहे. त्याची एका बाजुची लांबी १२१ फूट तर रूंदी १५० फूट आहे. पूर्व बाजूला नर्मदेचा वेगवान प्रवाह आहे. त्याला अडविण्याचे काम हा घाट करतो.

महेश्वर येथील घाटासंदर्भात श्री रामसेवक गर्ग यांनी अहिल्या स्मारिका वर्ष १९७९ यात अहिल्या की नगरी महिपती घाट स्थापत्य या संशोधनपूर्व लेखात महेश्वराच्या घाटाच्या संदर्भात पुढीलप्रमाणे माहिती दिली आहे. महेश्वर येथील घाटांची संख्या २८ असून त्यांची नावे पुढीलप्रमाणे -

१) कालेश्वर घाट, २) पेशवा घाट - सर्वात मोठा, ३) प्राचीन घाट मण्डालखोर घाट, ४) बहनाबाई घाट १६ बाय ९७ (सर्व आकडे फुटांची संख्या दर्शवितात), ५) राजराजेश्वर घाट १५१ बाय ७६, ६) काशी विश्वेश्वर १०५ बाय १००, ७) साई बुवा घाट ११५ बाय ४३, ८) अहिल्या घाट १५० बाय २९१, ९) गवाली घाट ४५ बाय ५३, १०) भारमलदादा घाट ४५ बाय १८, ११) भागीरथीबाई माँ साहेबका घाट ६३ बाय २५, १२) गंगादीन जमादार का घाट ७० बाय ९७, १३ सालू माँ साहेबका घाट ७० बाय ७५, १४) नायक घाटक १०१ बाय ९४, १५) लक्ष्मीबाई साहेब घाट १०१ बाय ६२, १६) टीकाराम जमादार घाट ४० बाय ४५, १७ टीकाराम जमादार का दुसरा घाट ६२ बाय ६०, १८) मानगेश्वर महादेव घाट ४० बाय ३४, १९) सरदार फणसे घाट ९६ बाय ४७, २०) मगर घाट ४८ बाय ९४, २१) गंगादोन जमादार का २ रा घाट ७२ बाय ४६, २२ नायक घाट ४१ बाय २१, २३) मुकन्देश्वर घाट ६५ बाय ५०, २४) मल्हारघाट ४० बाय ४८ २५) पंचपेढी घाट ३५ बाय ११ २६) चौखंडी घाट ६५ बाय ४१, २७) सूजमाल घाट ६० बाय ३०, २८) सपन भानू घाट ३२ बाय १८.

हे सर्व घाट नर्मदेच्या किनाऱ्यावर महेश्वरला बांधलेले आहेत. परंतु त्याचा निर्माण काळ मात्र एक नाही. तरीही त्यांच्यात एक सूत्रता दिसून येते. या घाटांच्या पाऱ्यांचे वैशिष्टय म्हणजे त्यांची उंची सर्वत्र सारखी आहे. याशिवाय हे सर्वच घाट सरळ व सपाट आहेत. घाटाचा उपयोग ज्याप्रमाणे जनसामान्यांना होतो तसाच तो नदीपासून किनाऱ्याचे रक्षण करण्याकरितादेखील होतो. त्यामुळे किनाऱ्याची झिज होत नाही. महेश्वराचे घाट हे भारतीय स्थापत्य शास्त्राचे उल्लेखनीय उदाहरण आहे.

**बऱ्हाणपूर येथील तापी नदीवरील घाट :**

मध्यप्रदेशातील बऱ्हाणपूर हे इतिहासातील प्रमुख शहर आहे. मोगलांच्या सर्व लष्करी हालचाली बऱ्हाणपुरहून चालत असत. बऱ्हाणपुरात संपूर्ण तटबंदी असून दरवाजे

आजही सुरक्षित आहे. गावाच्या बाहेरून तापी नदी वाहते. या नदीला अहिल्याबाई होळकरांनी एक दगडी काळ्या चिरबंदी दगडाचा घाट बांधला आहे. याचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे. 'नागझरी व कुण्डघाट बऱ्हाणपुर जरीब ३,८०२७०, गरीब ५४०१४० कुलरकबा २ एकर ८ डिसला पूर्व को खसरा नंबर ३८८३६६ रास्ता व ३४१.१ लक्ष्मण वा टिकमसिंह का खेत, पश्चिम को कुरहानपुर का कोट, उत्तर को कुरहान पुरका कोस्त्र, दक्षिण को तापी नदी किंमत ३५०० के'[१५] तापी नदीवरील हा घाट प्रशस्त असून आज काही पायऱ्या वाळुखाली व पाण्याखाली आहेत. ह्या घाटाचा उपयोग लोकांना पाण्यासाठी स्नानासाठी होतो आहे.

**काशी येथील घाट :**

काशी हे हिंदूधर्माचे एक महत्त्वाचे क्षेत्र मानले जाते. ज्योतिलिंगामधले एक तिर्थस्थान. काशीचे दुसरे नाव वाराणशी आहे. अशा या हिंदूच्या पवित्र तीर्थक्षेत्री अहिल्याबाई होळकरांनी मनकर्णीका व इतर घाटांची निर्मिती केली. काशीचे घाट स्थापत्य शास्त्राचा उत्कृष्ट नमुना आहे. या घाटासंबंधी होळकरशाहीच्या इतिहासाची साधने यात खालीलप्रमाणे उल्लेख सापडतात. 'मनकर्णिकेच्या घाटांवर आपल्याकडील चौघडा एक व घड्याळ असल्यास उत्तम होईल. कोंच वगैरे इकडील प्रांत आहेत येथे नेमणूक करून द्यावी म्हणजे चालेल इतर खर्च दौलती संबंधी होतात त्यास हाही खर्च श्रेष्ठ समजून आज्ञा करावी'[१६] त्याप्रमाणे अहिल्याबाई होळकरांनी मनकर्णिका घाट बांधण्यासाठी २५ हजारांच्या हुंड्या घेऊन पाठविल्या असा उल्लेख मिळतो तो पुढीलप्रमाणे 'मनकर्णिकेचा घाट नूतन बाईंनी कारकून व पंचवीस हजारांच्या हुंड्या देऊन श्रीस पाठविला व दशाश्वमेघीचा घाट व गयेस विष्णुपदाचे देवालय सिद्ध झाले.'[१७]

वरील उल्लेखावरून स्पष्ट होते की मनकर्णिका व दशानवमेघ घाट अहिल्याबाई होळकरांनी बांधला. काशीला जाणाऱ्या यात्रेकरूंची सोय व्हावी यासाठी तेथे

अहिल्याबाईनी एक वाडा, काशी विश्वेश्वराचे मंदीर, २ विहिरी, ९ मंदीरे बांधली. मणिकर्णिका घाटाचे निर्माण कार्य १७९१ ला पूर्ण झाले.

### अयोध्या येथील शरयु घाट :

अहिल्याबाई होळकरांनी तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी यात्रेकरुंची सोय व्हावी यासाठी घाट, धर्मशाळा, मंदिरे बांधली. अयोध्या अतिप्राचीन काळापासून हिंदूचे पवित्र क्षेत्र मानले जाते. अयोध्या शहरात शरयु नदी आहे. या शरयु नदीवर अहिल्याबाईनी घाट बांधला 'शरयु घाट लांबी हात २४ रुंदी १३४ अंदाजे किंमत १०००० श्री कै. अहिल्या मासाहेब यांचे कारकीर्दीत बांधले. वीट चुन्यावर फरशीबंद आहे.'[१८] अशा प्रकारची नोंद मिळते.

### मथुरा येथील घाट :

श्री क्षेत्र मथुरा हिंदू धर्मीयांच्या ४ धर्मातील एक पवित्र धार्मिक ठिकाण आहे. याठिकाणी अहिल्याबाई होळकरांनी तेथे काही मंदिरे व घाट बांधले याचा उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतो. 'श्री मथुरा वृदांवन संयुक्त प्रति १ श्री चैन बिहारी मंदिर व धर्मशाळा उचीहरण घाट कालीदेह घाट'[१९]

### हरिद्वार येथील घाटाचा जीर्णोद्धार :

श्री क्षेत्र हरिद्वार हे सप्तपुरीतील एक धार्मिक क्षेत्र. या क्षेत्री अहिल्याबाईंनी कुशावर्त या घाटाचा जिर्णोद्धार केला. 'श्री क्षेत्र हरिद्वार संयुक्त प्रति यात्रेकरूसाठी धर्मशाळा दोन, सरकारी हवेली, कुशवर्त घाटाचा जीर्णोद्धार केला'[२०]

### प्रयाग येथील घाट :

हिंदू धर्मीयात काशी इतकेच महत्त्व प्रयाग या तीर्थ क्षेत्राला आहे. येथे अहिल्याबाई होळकरांनी फाल्गुन घाट बांधला. 'श्री क्षेत्र प्रयागला संयुक्त प्रांत पक्का सरकारी वाडा (त्यात श्री अहिल्याबाईंची मूर्ती आहे.) फाल्गुन घाट, धर्मशाळा बगीचा व श्री विष्णुमंदिर'[२१]

संपूर्ण भारतातील तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी यात्रेकरूंची सोय व्हावी म्हणून अहिल्याबाईंनी अनेक घाट बांधले असे संशोधनातून दिसून येते. काही ठिकाणी घाटांची बांधलेल्या नोंदी आढळतात. परंतु बरीचशी ठिकाणे अशी आहेत की त्या ठिकाणी अहिल्याबाईंनी लोकांच्या उपयोगासाठी नदीवर घाट बांधले मात्र याची नोंद सापडत नाही. संशोधनाच्या दृष्टीने महाराष्ट्रातील व मध्यप्रदेशातील अनेक घाट पाहिले त्यांची सर्वांची स्थिती अद्यापही चांगली आहे. फक्त पंढरपूरचा व पैठणच्या घाटाची पडझड झालेली आहे. बरेच घाट स्थापत्यशास्त्र सौंदर्याच्या दृष्टीतून अतिशय रम्य व प्रेक्षणीय आहेत. अहिल्याबाईंनी २०० वर्षापूर्वी बांधलेले घाट आजही सुस्थितीत आहेत. त्यामुळे त्याचे बांधकाम करणारे कारागिर यांची कसब याठिकाणी लक्षात घेण्यासारखी आहे.

तत्कालीन कालखंडात पाऊसाचे प्रमाण मोठ्या प्रमाणात होते. नदीला पूर आल्यानंतर लोकांची मोठ्या प्रमाणात गैरसोय होते त्यामुळे लोकांनी पुराच्या वेळेस सोय व्हावी. घाटामुळे काही गावांचे संरक्षण होते. तत्कालीन कालखंडात शासकीय नळयोजना नव्हत्या, वीज नव्हती त्यामुळे लोकांना नदी व विहिरीवरून पाणी आणावे लागे. त्यासाठी नदीवर घाट असणे महत्त्वाचे होते व पक्या बांधीव विहरी असणे गरजेचे मानले जात अशा प्रकारचे विविध दृष्टीकोन समोर ठेऊन अहिल्याबाई होळकरांनी घाट बांधले असे संशोधनातून दिसून येते.

### श्री कुरूक्षेत्र व श्री नेमीपारण्य येथील घाट :

कुरूक्षेत्राला ऐतिहासिक व धार्मिक महत्त्व आहे. अहिल्यादेवीने तेथे एक घाट बांधला. 'श्री कुरूक्षेत्र दिल्ली नजीक समता कुंडावर घाट व लक्ष्मी कुंडावर घाट श्री नैमीसारण्य, चक्रतीर्थ कुंड, धर्मशाळा गोघाट'[२२]

**गयातीर्थ येथील मदावर घाट :**

गया येथे देखील अहिल्याबाई होळकरांनी एक सुंदर घाट बांधला याचा उल्लेख खालील प्रमाणे मिळतो. 'यह मी काले पत्थरसे बना विशाल और मनोरम घाट विष्णुपद मंदिर के सन्मीकट फलु फल्गु के पश्चिम तीर पर अवस्थित है। इसके निर्माण कार्य मे पाँच हजार रुपये खर्च किये गये थे'[२३]

**मंडलेश्वर येथील घाट :**

मध्य प्रदेशातील महेश्वर येथून जवळच मंडलेश्वर नावाचे गाव आहे. येथे अहिल्याबाईंनी एक सुंदर घाट नर्मदा नदीला बांधला. 'शिवमंदीर और घाट बनवाया'[२४]

अशा प्रकारे अहिल्याबाईंनी आपले राज्य सोडून संपूर्ण भारतभर लोककल्याणासाठी घाट बांधले ते आजही सुस्थितीत आहेत. काही ठिकाणी बांधलेल्या घाटांच्या नोंदी कागदोपत्री सापडत नाहीत असे संशोधनातून दिसून येते.

**अहिल्याबाई होळकर यांनी बांधलेल्या विहिरी :**

भारतात आर्यांनी बहुधा नदीच्या काठी पाण्यासाठी आपली वस्ती स्थाने निवडली. कालांतराने वस्ती जशी वाढत गेली तसा पाण्याचा प्रश्न उपस्थित होऊ लागला. यातूनच विहिरीची कल्पना उदयास आली असावी कारण प्राचीन काळापासून विहिरींचे उल्लेख सापडतात. प्राचीन काळापासून पाणी पुरवठा करण्याचे एक महत्त्वाचे साधन म्हणून विहिरीकडे पाहिले जाते. सिंधु संस्कृतीमध्ये सुद्धा विहरीचे उल्लेख आढळतात.

पूर्वीच्या काळी सहकारी पाणीपुरवठा योजना, वीज इत्यादी आधुनिक तंत्राचा अभाव असल्यामुळे संभाव्य दुष्काळाला तोंड देणे. लांबच्या प्रवाशाची पाण्याची सोय करणे इ. कारणासाठी प्राचीन काळापासून राज्यकर्ते लोक कर्तव्य बुद्धीने तलाव व विहिरी बांधीत असत. लढाईवर दौड करणाऱ्या लोकांसाठी तसेच तीर्थयात्रेला जाणाऱ्या लोकांसाठी रस्त्यात पाण्याची सोय व्हावी. तेथील लोकवस्तीची पाण्याची सोय व्हावी यासाठी विहिरी

खोदल्या होत्या. असे संशोधनातून दिसून येते. राजा अशोक, शेरशहासूर, पेशवे, अहिल्याबाई इत्यादीने अशा लोकपयोगी विहिरी बांधल्या आहेत.

अशा प्रकारे संपूर्ण भारतात अहिल्याबाई होळकरांनी अनेक ठिकाणी विहिरी बांधलेल्या आहेत. त्यातील काहीचे उल्लेख सापडतात परंतु प्रत्यक्षात अनेक ठिकाणी अहिल्याबाईंनी विहिरी बांधलेल्या आढळून येतात त्यांना लोक अहिल्याबाई काळातील विहिरी म्हणून उल्लेख करतात.

## १) चांदवड येथे बांधलेल्या विहिरी :

नाशिक पासून जवळच चांदवड हे गाव आहे. चांदवड हे होळकरांच्या स्वदेश विभागाचे प्रमुख केंद्र होते. मल्हारराव होळकरांनी चांदवड हे गाव बादशहाकडून मागून घेतले. १७५३ पासून चांदवड हे मल्हाररावांच्या अधिपत्याखाली होते. मल्हाररावानंतर अहिल्याबाई राज्यकारभार पाहू लागल्या त्यांनी महेश्वराला आपल्या राजधानीचे स्वरूप दिले होते. चांदवडला होळकरांचे दोन वाडे आहेत. एक जुनावाडा तर एक नवावाडा नव्या वाड्याला रंग महाल असे संबोधण्यात येते. आजही रंगमहालची सुस्थितीत आहे. अहिल्याबाई होळकरांनी या सुंदर वास्तुबरोबर अनेक देवालये, विहिरींची निर्मिती केली. अहिल्याबाई होळकरांनी भारतात अनेक विहिरी निर्माण केल्या परंतु या सर्व विहरीत चांदवडची विहिर सर्वच दृष्टीने प्रेक्षणीय आहे. ती रंगमहालाच्या बाजूस बांधलेली आहे.

रंगमहाल हे चांदवड शहरातील खास वैशिष्ट्ये आहे. मुख्य इमारतीच्या पश्चिमेस ऐतिहासिक विहीर आहे. कित्येक दुष्काळात याच विहिरीतून चांदवड तालुक्यातील अनेक गावांना पाणी पुरविले गेले. रंगमहालातील विहीर आजही चांगल्या स्थितीत आहे. आजपर्यंत एकदाही या विहिरीचे पाणी आटले नाही. आजही विहिरीवर १० हॉर्स पॉवरची मोठी इलेक्ट्रीक मोटार पाणी पुरवण्यासाठी बसवलेली आहे. या विहिरीतून चांदवड शहराला पाण्याचा पुरवठा केला जातो. या विहिरीचे संपूर्ण बांधकाम काळ्या घडीव दगडांनी केलेले

आहे. विहरीला गोल आकाराच्या दोन कमानी आहेत. विहिरीचे बरेच काम विटा व चुन्याचे आहेत.

## २) चांदवड येथील विहिर क्र. २ :

चांदवड गावाच्या बाहेर रेणुका देवीचे मंदिर, मुंबई मार्गावर आहे. रेणुका देवीला गावातून जो रस्ता जातो त्या रस्त्यावर थोड्याच अंतरावर एक विहिर लागते. ही विहिर अहिल्याबाई होळकरांनी बांधली आहे. या विहिरीवर एक शिलालेख कोरलेला आहे. मात्र त्यावरील अक्षरे न समजण्याइतकी गुळगुळीत झालेली आहेत. या विहीरी संदर्भात अहिल्याबाई होळकर ट्रस्टचे मॅनेंजर यांनी माहिती दिली. रेणुका देवीला जाणाऱ्या भाविकांसाठी पिण्याच्या पाण्याची सोय व्हावी या दृष्टीकोनातून या विहिरींची निर्मिती अहिल्याबाईनी केली असावी असे दिसून येते. आजही या विहिरीला पाणी आहे.

## ३) चांदवड येथील विहिर क्र. ३ :

चांदवड गावात ही विहीर नरोटी बारव म्हणून प्रसिद्ध आहे. ही विहीर अहिल्याबाई होळकरांनी बांधलेली आहे. 'पक्की विहीर सदरहू व जुनी बांधलेली असून गंत्री बागेत आहे सर्वे ५६'[२५] नरोटी बारव आजही चांगल्या स्थितीत आहे. या विहिरीला आजही भरपूर पाणी आहे. गावातील लोक आजही या विहिरीचे पाणी वापरतात ही बारव काळ्या धडी दगडाची बांधलेली आहे. आतमध्ये एक कुंड असून त्यात पाणी आहे.

## ४) चांदवड येथील विहिर क्र. ४ :

चांदवड या गावात ही विहीर विठोबा बारव म्हणून ओळखली जाते. पूर्वी बारव म्हणत असत 'पक्की विहीर स. न. ६ सदरहू विहिर पक्की असून त्रिबकराव गणेश चांदवडकर याच कडेस 'गढी बाग' म्हणाने महशूर आहे'[२६] विहिरीचे बांधकाम विटाचे व चुन्यात केले आहे. पूर्वी या विहिरीचे पाणी वापरात असत परंतु शासनातर्फे पाणी पुरवठा झाल्यापासून या विहिरीचे पाणी वापरणे बंद झाले असून ही विहिर आजही चांगल्या

स्थितीत आहे. चांदवड या गावात याशिवाय अनेक विहिरी अहिल्याबाईनी बांधलेल्या आहेत याशिवाय चांदवडच्या परिसरातील रस्त्यावर अहिल्याबाईंनी जवळपास एक किलोमीटरच्या अंतरावर एकेक विहिर बांधलेली आढळून येते. परंतु या विहिरीचा कागदोपत्री कोठेही उल्लेख आढळून येत नाही.

**अहिल्यापूर ता. शिरपूर जि. धुळे येथे बांधलेली विहिर :**

अहिल्यापूर हे गाव पूर्वी खान्देशातील थाळनेर परगण्यात येत होते. थाळनेर परगणा हा मल्हारराव होळकरांपासून होळकरांच्या अधिपत्याखाली होता याच परगण्यात अहिल्यापूर हे गाव आहे. अहिल्याबाई होळकरांनी एक मोठी पायविहिर बांधलेली आहे. ही विहिर आजही चांगल्या स्थितीत आहे. अहिल्यापूर हे गाव शिरपूर तालुक्यातील एक छोटेसे खेडे आहे. अहिल्याबाई होळकर यांनी येथे बांधलेल्या पुरातन आणि भव्य अशा विहिरीसाठी ते प्रसिद्ध आहे. ‘बांधकाम करणाऱ्यांची प्रतिष्ठा आणि प्रतिमा विहिरीला मिळालेली आहे. खेड्यातील लोकांना पिण्याचे पाणी मिळण्याचे ते एकमेव साधन आहे. या विहिरीच्या शेजारी कुंड आहे. त्यात मशिनच्या सहाय्याने पाणी भरले जाते. या विहिरीत जीवंत झरे आहेत. त्यामुळे विहिरीत विपुल पाणी असते. अहिल्यापूर परिसरात महादेवाची पींड असल्याने महादेवाचे मंदिर आहे. या मंदीरात अहिल्याबाईची मूर्ती आहे. तीने अनेक मंदिरे महाराष्ट्रात बांधलेली आहेत व ती शिवभक्त म्हणून प्रसिद्ध आहे. अहिल्याबाईनीच हे मंदीर बांधले असावे.’[२७]

अशा प्रकारे अहिल्यापूर येथे विहिरीचा उल्लेख मिळतो.

**सकरगाव ता. निफाड जि. नाशिक येथील विहिर :**

निफाड या तालुक्याच्या पासून १५ कि. मी. अंतरावर सकरगाव आज या गावाला व भागाला ऊस, कांदे, द्राक्षे यामुळे महत्त्व प्राप्त झाले आहे. हे गाव पूर्वी खानदेशपरगण्यात येत होते. या गावाला अहिल्याबाई होळकरांनी एक मोठी पाय विहिर बांधली आहे. आजही

ती अहिल्याबाईची बारव या नावाने प्रसिद्ध आहे. 'सकरगाव ता. निफाड एक विहीर'[२८] सकरगावची ही विहीर आजही चांगल्या स्थितीत आहे. पूर्वी या गावाची एकमेव विहिर पाणीपुरवठ्याचे साधन होते. विहिरीचे बांधकाम दगडांनी व चुन्यात केले आहे.

**वाफगाव येथे बांधलेली विहिर :**

वाफगाव हे पुण्यापासून २० कि. मी. अंतरावर आहे. वाफगांव हे होळकरांचे मुळचे राहण्याचे गाव येथे होळ सरकारचा एक वाडा आहे. या आपल्या मूळ वंशजाच्या गावी अहिल्याबाई होळकरांनी एक पाय विहीर बांधलेली आहे. वाफगाव येथील विष्णु मंदीराच्या मागे एक विहीर बांधली आहे. '३० वाफगाव पुणे जिल्हा विहीर पक्की सरकारी वाडा'[२९]

**तुळजापुर येथे बांधलेली विहीर :**

तुळजापूरची देवी अनादिकाळापासून क्षत्रिय राजांची उपास्य देवता असून ती भवानी, अंबा, जगदंबा इ. नावांनी ओळखली जाते. ही मूर्ती १६०० वर्षापूर्वीची आहे असे इतिहासकारांचे म्हणणे आहे. छत्रपती शिवाजी महाराजांवर या देवीची कृपा होती. देवीने शिवाजी महाराजांना तलवार दिली होती असे म्हटले जाते. तुळजापूरची भवानी ही साऱ्या महाराष्ट्राचे कुलदैवत मानले जाते. त्यामुळे तुळजापूरचे धार्मिक महत्त्व महाराष्ट्रात आजही मानले जाते. अशा या पवित्र तीर्थक्षेत्री अहिल्याबाई होळकरांनी यात्रेकरूंच्या सोयीसाठी एक विहिर बांधली आहे. ही विहिर तुळजाभवानी देवीच्या समोरून जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर बांधली आहे. विहीर संपूर्ण काळ्या रेखीव दगडांची बांधली आहे. विहिरीत उतरण्यासाठी पंचावन्न पायऱ्या आहेत. दहाव्या पायरी वरच्या दोन्ही बाजूस शिलालेख आहेत यापैकी उजव्या बाजूकडील शिलालेख याप्रमाणे -

'श्र - देविपदि तोरणार्थ मतुलं विश्यात किर्तिक्षिते:।
मल्हारतिवधुवरच कर्तुमधुना रेवाजटे संस्थिता ॥
खंडेराय वधुरचकार जगम: झेमाय वापी परी

सारामान मरेंद्र वद्यसलले नाग्ना अल्हिल्यासती ॥

शके सत्राशे साठ नृपशलिवाहन शके ॥'[३०]

विहिरीवरील शिलालेख संस्कृत मध्ये आहे त्याचा मराठी अनुवाद पुढीलप्रमाणे -

पृथ्वीवर किर्तीने प्रसिद्ध असलेल्या मल्हाररावाची सून व खंडेरायाची पत्नी नर्मदा किनारी राहणाऱ्या अहिल्यादेवी नाव असलेल्या श्री देवीच्या चरणाजवळ जगाच्या कल्याणासाठी पवित्र पाणी असलेली ही विहिर शालीवाहन शके १७६० मध्ये बांधून दिली. त्याचा उपयोग तेथील यात्रेकरुंना आजही होत आहे.

**भिमाशंकर येथील विहिर :**

भिमाशंकर हे १२ ज्योतिर्लिंगातील हे क्षेत्र आहे. पुण्यापासून ७५ मैलावर आहे. हे थंड हवेचे ठिकाण आहे. येथील भीमाशंकराचे मंदीर हेमाडपंती दगडी बांधणीचे असून त्यावर दशावताराच्या मूर्ती कोरलेल्या आहेत. अहिल्याबाईनी जनतेच्या कल्याणासाठी अनेक कल्याणकारी कामे केली आहेत. भीमाशंकर येथेही यात्रेकरूंची पाण्याची सोय व्हावी यासाठी विहिर बांधली आहे. 'ती भीमाशंकर येथे धर्मशाळा इमारत बावडी वगैरे आहे.'[३१]

**जेजूरी येथील विहिर :**

पुणे जिल्ह्यात जेजुरी हे खंडोबाचे देवस्थान संपूर्ण महाराष्ट्रात प्रसिद्ध देवस्थान आहे. जेजुरीचा मल्हारी मार्तंड हे होळकरांचे कुलदैवत. मल्हारराव होळकरांनी मल्हारी मार्तंडांचा कील्हा बांधला. अहिल्याबाई होळकरांनी येथे सरकारी वाडा, श्री गौतमेश्वर मंदिर, मल्हार तलाव व विठ्ठल रखुमाईचे मंदिर बांधले. याशिवाय एक विहिर बांधली. 'श्री क्षेत्र जेजुरी पुणे जिल्हा श्री मल्हारे गौतमेश्वर, तालिमखाना, सरकारी वाडा या श्री दत्त पादुत आहेत व कुवा आहे'[३२]

**उज्जैन येथील विहिर :**

उज्जैन हे प्राचीन काळापासून एक धार्मिक तीर्थक्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. उज्जैन येथे बारा ज्योतिर्लिंगापैकी एक ज्योतिर्लिंग महाकालेश्वर या नावाने ओळखले जाते तेथील यात्रेकरूंची सोय व्हावी यासाठी अहिल्याबाई होळकरांनी चिंतामणी गणेशाचे मंदिर, जनार्दन मंदिर व घाटाची उभारणी केली. या चिंतामणी गणेशाच्या दर्शनासाठी येणाऱ्या भाविकांची सोय व्हावी या दृष्टीने अहिल्याबाईंनी विहिर बांधली आहे. 'उज्जैन अंगणात ७ श्री चिंतामण गणपती ३ जमीनबाधे, २ धर्मशाळा, ३ बावडी अंदाजे किंमत ५००० श्री कै. अहिल्या मा. साहेब यांनी बांधले' [३३]

अशाप्रकारे कागदोपत्री जरी विहिरीचे उल्लेख फारसे सापडत नसले तरी संपूर्ण भारतात अहिल्याबाई होळकरांनी अनेक प्रांतात ठिकठिकाणी विहीरी बांधून दिल्या आहेत असे संशोधनातून दिसून येते.

**अहिल्याबाई होळकरांनी बांधलेले तलाव :**

भारतात प्राचीन काळापासून अनेक राजा, महाराजांनी, सरदार, धनाड्य लोकांनी दानधर्मातून धार्मिक कार्यासाठी, पिण्याच्या पाण्यासाठी, शेतीसाठी तलाव बांधले आहेत. पूर्वीच्या काळी पावसाचे प्रमाण मोठ्या प्रमाणात असल्यामुळे तलावाचे महत्त्व जाणवत नव्हते. आजच्या कालखंडात दुष्काळ भागासाठी तलाव वरदान ठरले आहेत. जमिनीच्या नैसर्गिक भागाचा उपयोग करून तलाव बांधले आहेत. विशेषत: जमिनीच्या खोलगट भागाचा उपयोग करून तलाव बांधतात. तत्कालीन कालखंडात जे तलाव निर्माण केले त्यांचे बांधकाम वास्तूशास्त्राच्या दृष्टीकोनातून आकर्षक व मजबुत आढळून येते. तलाव हे आकारमानाने सामान्यत: सरोवरापेक्षा लहानमोठे असतात. तलावाला ताल असेही म्हणतात.

काही ठिकाणी नद्यांप्रमाणे तलावानाही धार्मिक महत्त्व प्राप्त झालेले आहे. बहुसंख्य देवालयासमोर तलाव बांधलेले आढळून येतात. जिथे नदी नाही अशा गावाच्या ठिकाणी, अथवा तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी येणाऱ्या यात्रेकरूंची सोय व्हावी तेथे तलाव बांधत, अहिल्याबाई होळकरांनी अनेक ठिकाणी तलाव बांधले ते पुढीलप्रमाणे.

## १) अहिल्याबाई होळकरांनी जेजुरी येथे बांधलेला मल्हार तलाव :

जेजुरी हे महाराष्ट्रातील एक प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. जेजुरी येथील कऱ्हे पठार व गडकोट अशा दोन ठिकाणी खंडोबाची मंदिरे आहेत. खंडोबा हे होळकरांचे कुलदैवत असल्यामुळे होळकर वंशातील प्रत्येक वंशजांनी येथे भेटी दिल्या आहेत. तेथे अनेक लोककल्याणकारी व धार्मिक कार्य केली आहेत त्याचे उल्लेख सापडतात. खंडोबाच्या मंदिरात एका खांबावर शिलालेख आहे तो असा 'तुकोजी मल्हारजी होळकराने दिंडोरी येथील शामजी नारायण राजापुरकर यांच्याकरवी श. १६९२ विकृती श्रावण शु. सोमवार या दिवसापासून किल्ला व तळे यांचे काम चालू केले असे दिसते. गाभाऱ्यातील मेघडवरील चांदीचे कवच आहे त्यावरील लेखावरून (ते श. १६९७ श्रावण शुद्ध ७८ इ. १७७५ ऑगस्ट ३ यावेळी रखमाजी जाचक याने करून दिल्याचे समजते.'[३४]

अहिल्याबाई होळकरांनी जी काही लोकोपयोगी कामे केली त्याप्रमाणे येथेही त्यांनी जेजुरी गावापासून जवळच मोठा एक तलाव ज्याला मल्हार तलाव म्हणून संबोधले जाते त्याची निर्मिती केली पत्रांक ३७ इ. स. १७९३ 'राजश्री सिदो बापुजी निस्बत कारखाना जाहला. त्याची उत्तरे येणेप्रमाणे. डोंगराचे पाणी तळ्यात येते. त्याजला कोरडी पाळ बांधण्यास अशा जाहली त्याप्रमाणे बांधली असता पाणलोटाचे भराने वाहन गेली. संगीन बांधाले खेरीज टिकणार नाही म्हणोन लिहले त्यास संगीन कामाचे प्रयोजन नाही पाळ रुंद चांगली आठ-दहा धरून मात्र चुन्याचे दगड जमवून बसविणे म्हणजे ते वाहून जाणार नाही आणि गाळही होऊ पाहणार नाही. इकडे जाबेस वगैरे ज्याप्रमाणेच तळ्याची कामे केली

आहेत. एकूण चार कलमे मनन करून लिहल्याप्रमाणे वर्तणूक करा सर्वदा पत्र पाठवून करावन्यासंबंधी सविस्तर लेखन करीत जाणे आणि जे २७ रविलाखर'[३५] 'तलाव मल्हार टयांक जायदादीचे क्षेत्रफळ ५१ गुंठे ५१ गुंठे ५ अंदाजे किंमत ८००००० जागेचे वर्णन दगडी बांधलेला आहे'[३६]

प्रस्तुत तलाव हा मल्हार तलाव म्हणून प्रसिद्ध आहे. तो गौतमेश्वराच्या मंदिराच्या बाजूला आहे. बाजूलाच अहिल्याबाई होळकर ट्रस्टची बागाईत शेती आहे. ती पाळ २० फुट रुंदीची भक्कम आहे. तलाव चारही बाजूला बंदीस्त आहे. तलावात उतरण्यासाठी ५ ठिकाणी पायऱ्यांची योजना केलेली आहे. पूर्वीच्या कालखंडातील मोटांची जागा व पाणी ज्यात पडायचे त्याला यायने असे म्हणतात. ही जागा चांगल्या स्थितीत आहे. तलावाच्या एका बाजूला खंदक दिसतो याला नळ जोडलेला होता यातून पाणी गावातील होळकर विहिरीत सोडले होते व तेथून ते इतरत्र पुरवले जायचे. तळ्यात आजही चांगले पाणी आहे आतामात्र त्याचवर इलेक्ट्रीक मोटारी बसवून पाणी योजना केलेली आहे.

एकंदरीत संशोधनातून विचार करता अहिल्याबाई होळकर यांनी त्यांच्या राज्यातील जनतेच्या मूलभूत कामांना प्राधान्य दिलेले दिसते. तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी पाणी हा महत्त्वाचा प्रश्न असतो तो त्यांनी सोडवला. त्यांनी बांधलेले सर्वच तलाव, कुंड, विहिरी आजही सुस्थितीत आहेत. कोणतेही काम करताना त्या स्वत: अभ्यास करत व तेथील प्रतिनिधींना सूचना करत असे काही ठिकाणी उल्लेख मिळतात. कोणतेही काम भक्कम व जनतेच्या कल्याणासाठी असावे असा दृष्टिकोन होता यातूनच त्यांची प्रशासनातील कार्यक्षमता व चौफेर नेतृत्वाचा दृष्टीकोन दिसून येतो. कोणतेही कार्य करण्यासाठी त्या कामाच्या संदर्भात अनेक तज्ञ त्यांच्या दरबारी असत त्यांच्याकडून ते काम करून घेतले जात असत हे त्यांच्या कार्याच्या अभ्यास अंती शोध घेतला असता दिसून येते कोणत्याही कामात भ्रष्टाचार झाल्याचा उल्लेख मिळत नाही यावरून तत्कालीन नोकरवर्गाची विश्वासार्थ दिसून येते.

जेजुरीचा तलाव हा स्थापत्य शास्त्राच्या दृष्टीने एक अजोड नमुना आहे. आजही तो सुस्थितीत आहे.

## २) त्र्यंबकेश्वर येथील मोती तलाव :

त्र्यंबकेश्वर हे एक पवित्र तीर्थक्षेत्र नाशिक पासून २० मैलावर आहे. १२ ज्योतिर्लिंगापैकी एक पवित्र शिवस्थान म्हणून हे तीर्थक्षेत्र प्रसिद्ध आहे. हे शिवालय नानासाहेब पेशव्यांनी बांधले. भव्य देवालय व विस्तीर्ण आवार असलेले आजही सुस्थित तटबंदी असलेले हे देवालय आहे. अहिल्याबाई होळकर यांनी यात्रेकरूंच्या सोयीसाठी एक तलाव बांधला जो मोती तलाव म्हणून ओळखला जातो. 'श्री त्र्यंबकेश्वर मोती तलाव चिरेबंद पक्का बांधलेला आहे'[३७] मोती तलाव आजही चांगल्या स्थितीत आहे. या तलावात भरपूर पाणी आहे. पाण्याच्यावर चार दगडी पायऱ्या आहेत संपूर्ण तलावाला चारही बाजूंनी दगडी बांधकाम केले आहे. त्र्यंबकेश्वरच्या यात्रेवेळेस याचा उपयोग होत आहे.

## ३) ओंकारेश्वर येथील तलाव :

मध्यप्रदेशात नर्मदा नदीच्या काठावर तिच्या पात्रातील विशाल बेटावर नेमाड जिल्ह्यात भगवान शंकराच्या बारा ज्योतिर्लिंगापैकी प्रख्यात ज्योतिर्लिंग 'ओंकार ममलेश्वर' हे पवित्र क्षेत्र आहे. येथील बेटाला नर्मदा-कावेरी यांच्या प्रवाहाला ओम असा आकार निसर्गतःच प्राप्त झालेला आहे. 'या मंदिराचा जिर्णोद्धार अहिल्याबाई होळकरांनी केला. ममलेश्वर महादेव मंदिर ५०००० रुपये पक्के शिखरबंद बांधले त्याचप्रमाणे जायदादीचे नावे तलाव अंदाजे किंमत १०००'[३८] हा तलाव ओंकारेश्वर मंदिरापासून अर्धे मैलावर आहे.

ओंकारेश्वर येथे अहिल्याबाई होळकरांनी बांधलेला तलाव आज देखील चांगल्या स्थितीत आहे. तलाव चारही बाजूंनी काळ्या घडीव दगडांचा बांधलेला असून तलावात उतरण्यासाठी चारही बाजूंनी पायऱ्या आहेत. तलावाची लांबी रूंदी पुढीलप्रमाणे '१०

तलाव ओंकारेश्वर से. पश्चिम तरफ एक मील लांबी ४७०० रुंदी २८६ चार तरफ कारतकारी भूमी किंमत १००००'[३९] हा तलाव आजही सुरक्षित आहे याचा उपयोग परिसरातील लोकांना होत आहे.

### ४) चांदवड येथील तलाव :

चांदवड हे अहिल्याबाई होळकरांच्या जहागीरीचे ठिकाण, चांदवड हे गाव नाशिक विदर्भाच्या रस्त्यावर आहे. १७३३ पासून चांदवडचा किल्ला मल्हाररावाच्या ताब्यात आला. अहिल्याबाई होळकरांनी चांदवडला अनेक मंदिरे बांधली ज्यामध्ये रेणुका देवीचे मंदिर प्रमुख आहे. या रेणुका देवीच्या मंदिरा शेजारीच अहिल्याबाई होळकरांनी एक तलाव बांधला आहे. या तलावाचा कागदोपत्री उल्लेख सापडत नाही परंतु होळकर ट्रस्टचे मॅनेजर एम. के. पवार ह्यांनी चांदवडची माहिती देताना सांगितले की हा तलाव अहिल्याबाई होळकरांनी रेणुका देवीच्या दर्शनार्थ येणाऱ्या भाविकांच्या स्नानासाठी व इतरत्र पाण्याचा वापर करण्यासाठी बांधून दिलेला आहे. हा तलाव काळ्या घडीव दगडांनी बांधला आहे. तलावातील पाणी घेण्यासाठी दोन बाजूंनी उतरण्यासाठी पायऱ्यांची योजना केलेली आहे. तलावाला मुळातच जीवंत पाणी आहे. या तलावातून रेणुका देवीच्या मंदिरासाठी यातून पाणी योजना केलेली आहे.

### ५) अहिल्याबाईनी बांधलेला जाम दरवाजा व तलाव :

इंदोर व महेश्वर यांच्या दरम्यान विद्यांचल पर्वताच्या व सातपुडा पर्वताच्या काही रांगा आहेत यात एक जामघाट नावाचे प्रसिद्ध असे ठिकाण आहे. या ठिकाणी अहिल्याबाई होळकरांनी एक दरवाजा व तलाव बांधला आहे. 'इंदोर व महेश्वर यांच्या दरम्यान जामघाट लागतो. या घाटात एक दरवाजा आहे हा दरवाजा २५ यार्ड लांब २२ यार्ड रुंद व ५० फूट उंच आहे. या दरवाज्याच्या दोहोबाजूस भव्य खांब आहेत. दुसऱ्या मजल्यावर सज्जे आहेत'[४०] या दरवाज्यावर पुढीलप्रमाणे शिलालेख आहे. 'श्री गणेशाय नम: स्वस्ती श्री

विक्रम सवंत १८४७ सप्तृब्धि नागभूराळे १७७२ कुसप्ते कमिते दुभति वत्सरे, माघे, शुक्लमयो दरयां पुष्पपके बुधवासरे, स्नुष मळ हरिरावास्य, खंडेरावस्य वल्मा शिव पूजापूरा नित्यं ब्राह्मण धर्मतप्तपरा अहल्याख्या वबधेंद मार्गद्धार सुशोमनम्"[४१]

या संस्कृत शिलालेखाचा मराठीत अर्थ श्री गणेशाय नम: । स्वस्ति श्री विक्रमार्थ सवंत १८४७ शके १७१२ सुभति नाम संवत्सरे माघ शुक्ल मायोदशी पुष्प बुधवार या दिवशी मल्हाररावाची स्नुषा व खंडेररावाची धर्मपत्नी जी नेहमी शिवपुजा पारायणासाठी व ब्राह्मणांना धर्म करण्यात तत्पर आहे त्या अहिल्याने सुंदर मार्गाध्दार बांधले. या दरवाज्या जवळ एक तलाव असून तो अहिल्याबाईच्या नावानेच प्रसिद्ध आहे त्याचे कागदोपत्री उल्लेख पुढीलप्रमाणे सापडतो.

'श्रीमंत राजश्री पंतप्रधान रावसाहेब सेवेशी, विनंती सेवक केसो भिकाजी दातार चरणावरी मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे.... गंगाजल निर्मल अहिल्याबाई होळकर ह्या जमावसुद्धा जांबसे तलावाचे उद्यापना करिता आली आहेत. येथुन महेश्वर जाण्याचे आठ-दहा रोज लागतील आम्ही समागमे आहे."[४२] 'सेवेसी केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना नागाईत ..... जांभाचे घाटावर तळे मोठे बांधले आहे. तेथे बाई अद्यापन करावयास वैशाख शु ॥ शनिवारी जाणार, गेली तर बरोबर जाईन चार दिवस लागतील"[४३]

अशा प्रकारे अहिल्याबाईनी जाम घाटावर मोठा तलाव बांधला. या तलावात आजही पाणी आहे याचा उपयोग तेथील लोकांना होत आहे. या तलावाच्या उद्यापनासाठी त्या स्वत: हजर होत्या असे वरील उल्लेखावरून आढळते. अशा प्रकारे कोणतेही काम करताना काही कामे त्या स्वत: पाहत तेथील नोकरदारांना सूचना करत यावरून प्रत्येक कार्यातील त्यांच्या नेतृत्वाची तत्परता दिसून येते.

## अहिल्याबाई होळकरांनी बांधलेले कुंड :

विहिरीचा उपयोग पाणी पिण्यासाठी व रोजच्या वापरासाठी पाणी मिळविणे हा होता. परंतु त्याशिवाय तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी देवाच्या दर्शनाला जायचे असेल तर स्नान करून जायचे ही कल्पना सर्वसामान्य होती. जी मंदिरे नदीच्या काठी आहेत तेथे नदीवर घाट बांधले जायचे. जिथे नदी नसेल तिथे कुंड बांधलेले आहेत. मोठ्या आकाराच्या चौकोणी भागामध्ये चारी बाजूंनी पायऱ्या बांधून आत उतरण्याची सोय केलेली असते. प्राचीन कुंड सिंधू संस्कृतीच्या अवशेषात आहे. महाराष्ट्रात अनेक ठिकाणी अशी कुंडे आहेत अशा प्रकारचे भारतात प्राचीन काळापासून कुंड बाधण्याचे उल्लेख सापडतात. कुंड बहुधा तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी प्रामुख्याने बांधलेले आढळून येतात त्यांचा उद्देश यात्रेकरूंनी त्यात स्नान करून देवाचे दर्शन घ्यावे. लोकांना ते पाणी वापरता यावे हा उद्देश होता. अशा प्रकारे तत्कालीन कालखंडातील राजे, संस्थानिक, धनीक, दानशूर व्यक्ती समाजउपयोगी धार्मिक कार्य करीत असत.

अहिल्याबाई होळकरांनी खालील क्षेत्री व गांवी कुंड बांधण्याचे उल्लेख सापडतात ते पुढीलप्रमाणे -

### १) त्र्यंबकेश्वर येथील कुशावर्त कुंड :

त्र्यंबकेश्वर हे भारतातील बारा जोतिर्लिंगापैकी एक आहे. येथील ब्रह्मगिरीच्या डोंगरावरून गोदावरी नदी उगम पावते येथील त्र्यंबकेश्वर मंदिर भव्य असून त्याच्याभोवती चिरेबंदी तट आहे. 'नाशिकच्या पश्चिमेला १८ मैलावर त्र्यंबकेश्वर हे क्षेत्र आहे. त्र्यंबकेश्वराची पिंड तीन उंचवट्याची आहे. ब्रह्मा, विष्णु, महेश याची प्रतिके आहेत. त्र्यंबकेश्वराला असलेल्या पिंडाभोवती गोदावरीचे पाणी सतत वाहत असते. त्र्यंबकेश्वराचे मुख्य जलतिर्थ कुशावर्त कुंड होय. हे कुंड ८० फूट लांब आणि ७२ फूट रुंद एवढे मोठे आहे. या कुंडास आत उतरण्यास पायऱ्या आहेत. या कुंडाभोवती प्रवाशासाठी ओवऱ्या

बांधलेल्या आहेत.'[४४] 'हे तीर्थ बांधुन काढायचे श्रेय होळकर सरकारचे फडणीस श्री रावजी महादेव पारनेरकर यांनी संपादिले आहे. त्यापूर्वी या तीर्थाची बांधणी हेमाडपंथी होती. बाधणीस आरंभ शके १७६२ मध्ये झाला व परिसमाप्ती शके १७९० मध्ये झाली. बांधणीस खर्च ७ लाख रुपये आला'[४५]

कुशावर्त हे आजही चांगल्या स्थितीत आहे. या कुंडाचे काम मजबूत दगडी बांधणीचे आहे. त्र्यंबकेश्वरला यात्रा भरत असल्यामुळे वर्षातून अनेक वेळा येथे भाविक येतात. त्या दृष्टीने नगरपालिका स्वच्छतेची काळजी घेते. कुशावर्ती कुंडातील पाणी बाहेर फेकण्यासाठी नगरपालिकेने येथे मोठ्या दोन इलेक्ट्रीक मोटारी बसविल्या आहेत त्यायोगे आतील पाणी सतत बाहेर जाते नवीन स्वच्छ पाणी कुंडात येत असते. अशा प्रकारे हे कुंड आहे.

## २) केशव कुंड रावेर :

रावेर हे उत्तर महाराष्ट्रातील तालुक्याचे गाव आहे. इतिहासाच्या दृष्टीकोनातून रावेर हे पूर्वीच्या काळी महत्त्वाचे ठाणे होते. बऱ्हाणपूर हे कित्येक वर्षे अनेकांच्या लष्करी हालचालीचे प्रमुख केंद्र होते. रावेर हे बऱ्हाणपूर महामार्गावर आहे. मोगलांच्या दक्षिणेतील सहा सुभ्यापैकी एक प्रमुख सुभा म्हणून बऱ्हाणपुर मानले जात असे. रावेरला गावाच्या मध्यभागी एक महादेवाचे पुरातन देवालय आहे. त्या मंदिरात केशव स्वामी म्हणून राहत होते. 'अहिल्याबाई या केशव स्वामींच्या विनंतीवरून अहिल्याबाई होळकरांनी रावेरला कुंड बांधुन दिले पुढे त्याला सर्वत्र केशव कुंड म्हणून संबोधण्यात येऊ लागले.'[४६]

आज केशवकुंड पडक्या व जिर्णावस्थेत आहे. अनेक वर्ष रावेर गावाला पाण्याचा पुरवठा या कुंडातून झाला. चारही बाजुनी आत उतरण्यासाठी पायऱ्या आहेत. काळ्या दगडात हे कुंड बांधलेले आहे.

### ३) हरिहर कुंड परळी वैजनाथ :

परळी वैजनाथ हे १२ ज्योतिर्लिंगा पैकी एक आहे हे ठिकाण बीड जिल्ह्यात आहे. परळी येथील वैधनाथाचे मंदिर प्राचीन आहे. अहिल्याबाईनी त्याचा जिर्णोद्धार केला असे तेथील शिलालेखावरून कळते 'श्री वैजनाथ देवालयाच्या दक्षिणेस प्रस्तुतचे हरिहारनामक तीर्थ आहे. देवळाच्या दक्षिणेकडील घाट या तीर्थक्षेत्रास जातो. संपूर्ण तीर्थ चिरेबंद आणि प्रशस्त असे आहे. दक्षिणोत्तर लांबी आणि सर्व पश्चिम उंची अदमासे अनुक्रमे २०० बाय १०० हात पूर्व पश्चिम आणि उत्तर या तीन दिशांनी आत उतरण्यास प्रशस्त पायऱ्या आहेत. भाविक याच तिर्थाचे नित्य आणि पर्वकाळ प्रसंगी स्थान करीन असतात.'[४७]

हरिहर कुंड संपूर्ण काळ्या चिरेबंदी घडीव दगडात बांधलेले असून आजही चांगल्या स्थितीत आहे. अशा प्रकारे यांत्रेकरूंच्या सोयीसाठी अहिल्याबाईनी परळी वैजनाथ येथे कुंड बांधले.

### ४) म्हसवे ता पारोळ येथील कुंड :

जळगाव जिल्ह्यातील पारोळ तालुक्यातील म्हसवे या गावी अहिल्याबाई होळकरांनी एक कुंड बांधले आहे. म्हसवे हे गाव आज नागपूर-मुंबई महामार्गावर आहे. त्या गावातील जाणकार व वृद्ध माणसे प्रस्तुत कुंड अहिल्या होळकरांनी म्हसवे गावातील लोकांच्या विनंतीवरून बांधून दिला असल्याचे सांगतात याचे होळकर दफ्तरात उल्लेख सापडत नाहीत मात्र प्रसाद या मासिकात उल्लेख सापडतात. 'खानदेशातील पारोळे हे गाव तालुक्याचे व झाशीच्या राणीचे माहेर म्हणून प्रसिद्ध आहे. जुनाभुईकोट किल्ला त्याची साझ देतो. या किल्ल्याच्या दिल्ली दरवाजातून बाहेर पडले की, एका उंच टेकड्यावर धुळे-जळगाव हा महामार्ग लागतो. हा महामार्ग ओलांडला की एक तलाव आहे. हा तलाव अहिल्याबाईने बांधला आहे.'[४८]

लेखकाने दगडी तलाव असे वर्णन जरी केले असले तरी प्रत्यक्ष तो तलाव नाही तर ते एकदगडी कुंड आहे. या कुंडात उतरण्यासाठी एका बाजुने ११ पायऱ्या असून हे कुंड काळ्या घडीव दगडांनी बांधले आहे. कुंडाच्या काठावर म्हसवे गावाची ग्रामदेवता मंदिर आहे. या कुंडाचा उपयोग गावकऱ्यासाठी व मंदिरात येणाऱ्या भक्तासाठी होत आहे.

**५) सप्तशृंग गडावरील शिवायल कुंड (नाशिक) :**

नाशिक जिल्ह्यातील वणी या गावी एका पर्वतावर अदिशक्ती, सप्तशृंगी देवीचे स्थान आहे. देवीच्या मंदिराशेजारी शिवालय कुंड आहे. या कुंडाशेजारी अहिल्याबाई होळकरांनी दगडी धर्मशाळा बांधली. शिवालय कुंड अहिल्याबाई होळकरांनी बांधले असे सप्तशृंग देवीच्या ट्रस्टचे मॅनेजर सांगतात. होळकर दफ्तरात याचे उल्लेख सापडत नाहीत. परंतु इतर ग्रंथात उल्लेख सापडतात ते पुढीलप्रमाणे 'शिवालय तीर्थ, सप्तशृंग गडावर शिवालय नावाचे एक पुण्यकारक पवित्र तिर्थस्थान आहे त्याची लांबी-रुंदी ४० मीटर आहे. या तीर्थाचे बांधकाम अहिल्याबाई होळकरांनी केले आहे. शिवालय तीर्थ भागीरथी गोदावरी, नर्मदा, तीर्थसमान असल्याने ते अत्यंत पवित्र आहे.'[४९] 'शिवालय हे सर्वात मोठे कुंड आहे. या तीर्थाचा उल्लेख गिरीजातीर्थ असा आहे. याची खोली चार फूट आणि क्षेत्रफळ ३६५ फूट आहे ते दगडाने बांधले असून कुंडात यात्रेकरू स्नान करतात. कुंडात उतरण्यास पायऱ्या आहेत. हे शिवालय तीर्थ देवी अहिल्याबाई होळकरांनी बांधून घेतले'[५०]

सद्य स्थितीत शिवालय कुंड चांगल्या स्थितीत असून त्यात भरपूर पाणी आहे त्यावर ट्रस्टने इलेक्ट्रीक मोटार बसवल्या असून त्याचा उपयोग केला जातो.

**अहिल्याबाई होळकर यांनी बांधलेल्या धर्मशाळा :**

हिंदू धर्मात तत्कालीन कालखंडात तिर्थयात्रा करणे हे जीवनातील एक पुण्यकार्य धार्मिकदृष्ट्या मानले जात असे. तत्कालीन कालखंडात संतानी लोकजागृतीचे व प्रबोधनाचे काम केले त्यामुळे लोकांवरती आध्यात्माचा प्रभाव होता व आजही आहे. लोकांना

प्रबोधनाची साधने म्हणून किर्तक, भजन, पोथी, पुराण, यात्रा, तीर्थक्षेत्री इत्यादी व्यवस्था होती. लोकांना दळणवळण व मनोरंजनाची साधने अत्यंत कमी प्रमाणात होती. त्यामुळे धार्मिकदृष्ट्या अनेक तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी यात्रा भरत. प्रथा परंपरेनुसार अनेक रूढीचा प्रभाव समाजव्यवस्थेवर होता. अहिल्याबाई होळकरही त्याला अपवाद नव्हत्या. धनिक, राजे, संस्थानिक तसेच सामान्य गरीब वर्गदेखील आपआपल्या कुवतीनुसार तीर्थयात्रा करीत असत. ह्या रूढी भारतात आजही कायम आहेत. तीर्थक्षेत्री लोकांची संख्या वाढल्यामुळे त्यांना अनेक अडचणी गैरसोयींना तोंड द्यावे लागत असे. आजच्यासारखे दळणवळण प्रसारमाध्यमे, प्रवास साधने, लॉजींग, बोर्डींग व सरकार मान्य पर्यटन निवास व्यवस्था नव्हती त्यामुळे अनेक राजे महाराज धनिक यात्रेकरूंच्या सोयी-सुविधासाठी धर्मशाळा बांधीत असे.

अहिल्याबाई होळकर यांनीही अनेक तीर्थयात्रा केल्याचे उल्लेख आहेत. पंढरपूर, काशी, ओंकारेश्वर, महाकालेश्वर अशा अनेक ठिकाणच्या तीर्थ यात्रा केल्याचे उल्लेख आहेत. यात्रेकरूंची गैरसोय त्यांनी अनुभवली असावी म्हणूनच त्यांनी अनेक तीर्थक्षेत्री धर्मशाळा बांधल्या असाव्यात असे संशोधनातून दिसून येते.

### अहिल्याबाई होळकरांनी बांधलेल्या धर्मशाळेची वैशिष्ट्ये :

अहिल्याबाई होळकर यांनी बांधलेल्या धर्मशाळेचा शोध घेतला असता त्याची काही वैशिष्ट्ये दिसून येतात ती पुढीलप्रमाणे आहेत.

१) प्रत्येक धर्मशाळेत अन्नछत्र व सदावर्ते चालू केली होती.

२) धर्मशाळेची व्यवस्था पाहण्यासाठी कायमस्वरूपी खर्च लावून दिला होता.

३) धर्मशाळा या नदी अथवा विहिरीच्या जवळ बांधलेल्या होत्या त्यामुळे पाण्याची सोय होत.

४) प्रत्येक धर्मशाळेत मंदिर बांधले होते.

५) सर्वच धर्मशाळा पक्क्या विटात बांधलेल्या आहेत.

६) चारही बाजुनी भिंतीची उंची जास्त ठेवण्यात आलेली होती.

७) धर्मशाळा समोर तुळशी वृंदावन व बाकीचा भाग मोकळा सोडलेला आहे.

८) मुख्य प्रवेशद्वार उंच असून पहाऱ्याची व्यवस्था केलेली आहे.

अहिल्याबाई होळकरांनी ज्या धर्मशाळा बांधल्या त्यामागे त्यांचे दूरदृष्टी नेतृत्व दिसून येते. त्यांनी धर्मशाळेत लोकांना जास्तीत जास्त सुख सुविधा व सुरक्षितता प्राप्त करून दिली. सर्वात महत्त्वाची त्यांची प्रशासकीय दृष्टी येथे दिसून येते कि धर्मशाळासाठी कायमस्वरूपी नोकरवर्ग नेमला कारण यात्रेकरूंच्या अडचणी सोडविण्यासाठी हा नोकरवर्ग मदत करत असे अशा प्रकारे अहिल्याबाईनी बांधलेल्या धर्मशाळा अतिशय महत्त्वाच्या ठरतात. अहिल्याबाई होळकरांनी भारतात खालील ठिकाणी धर्मशाळा बांधल्याचे उल्लेख सापडतात ते देवस्थान क्लासिफिकेशन लिस्टमध्ये होळकर सरकारने १९२३ साली प्रकाशित केली.

### १) केदारेश्वर येथील धर्मशाळा :

माल्कम साहेबांची दी मेमोरियल ऑफ सेंट्रल इंडिया या इंग्रजी पुस्तकात केदारेश्वर येथील धर्मशाळेचा उल्लेख सापडतो तो पुढीलप्रमाणे 'केदारेश्वर धर्मशाळा ४० फूट लांब १५ फूट रुंद'[५१] माल्कम साहेब म्हणतात की ''माझा पोलिटिकल ॲसिस्टंट कॅप्टन टी. डी. स्टुअर्ट हा इ. स. १८१८ साली केदारनाथाला गेला होता. अहिल्याबाईच्या नावाबद्दल त्या टोकास असलेल्या प्रांतातही किती विलझण आदर आहे हे तो मला वारंवार सांगे, तिथे अजुनही चांगल्या स्थितीत दगडी धर्मशाळा व एक पाण्याचे कुंड आहे. तीन हजार फुट उंच असलेल्या ठिकाणी जेथे मनुष्य वस्तीचे किंचीतही चिन्ह दिसत नाही. तिथे यात्रेकरूंसाठी ही कामे त्या राणीने आपल्या खर्चांनी केली आहेत.''[५२]

## २) उत्तर काशी येथील धर्मशाळा :

काशी हे हिंदूचे पवित्र तीर्थक्षेत्र येथे इतर कामाबरोबर अहिल्याबाई होळकरांनी यात्रेकरूंसाठी धर्मशाळा बांधली त्याचे उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतो. 'धर्मशाळा ३२ तास लांब १३ हात रूंद धर्मशाळा आहे.'[५३]

## ३) हरिद्वार येथील धर्मशाळा :

या ठिकाणी खालीलप्रमाणे धर्मशाळेचा उल्लेख मिळतो. 'हवेली धर्मशाळा १०२ फुट लांब ७८ फूट रुंद, किंमत २५०००० श्री कै. अहिल्याबाई सो. महाराजांनी सन १७५८ इ. स. बांधली सदरची हवेली फरशी व पक्की बांधलेली असोन खोल्या भाड्याने दिल्या आहेत.'[५४]

## ४) श्री क्षेत्र अयोध्या येथील धर्मशाळा :

अयोध्या हे प्राचीन कालखंडापासून हिंदूंचे पवित्र तीर्थक्षेत्र आहे. यात्रेकरू तेथे मोठ्या संख्येने जात असतात. त्यांची निवासाची सोय व्हावी यासाठी अहिल्याबाई होळकरांनी तिथे धर्मशाळा बांधली 'धर्मशाळा नं. ५ किंमत १५०० श्री के. अहिल्याबाई मा साहेब यांचे कारकिर्दीत एक मजली बांधलेली आहे.'[५५]

## ५) उज्जैन अंगपात येथील धर्मशाळा :

मध्यप्रदेशातील उज्जैन हे १२ ज्योतिर्लिंगातील एक प्रसिद्ध ज्योतिर्लिंग आहे. अहिल्याबाईनी येथे चिंतामणी गणेशाचे मंदिर, घाट, जनार्दन मंदिर या बरोबरच २ धर्मशाळा बांधल्या. 'अन्नछत्र व धर्मशाळा २६ फूट लांब २० फूट रुंद अंदाजे किंमत २००० रुपये'[५६] या धर्मशाळे समोर ओवऱ्या आहेत. इथे यात्रेकरू, संन्याशी, भिक्षुक राहतात. दुसरी धर्मशाळा चिंतामणी गणेशाच्या मंदिरा शेजारी आहे.

## ६) ओंकारेश्वर येथील धर्मशाळा :

हे ठिकाण मध्यप्रदेशात आहे. ओंकारेश्वर येथे अहिल्याबाई होळकरांनी धर्मशाळा बांधल्याचे उल्लेख कागदोपत्री पुढीलप्रमाणे सापडतात 'धर्मशाळा श्री लक्ष्मीनारायण मंदिर आकार १५० फूट लांब व ५० फूट रुंद अंदाजे किंमत २०,००० रुपये श्री कै. अहिल्या मासाहेब यांनी बांधली. सदरहू धर्मशाळा पक्की बांधलेली असून यात एक लक्ष्मी नारायण मंदीर आहे.'[५७]

## ७) श्री क्षेत्र नाशिक येथील धर्मशाळा :

महाराष्ट्रातील नाशिक हे एक प्रमुख तीर्थक्षेत्र आहे. तेथे गोदावरी नदीच्या काठावर रामकुंड आहे. अहिल्याबाई होळकरांनी तेथे एक घाट बांधला. या घाटासमोर अहिल्याराम मंदिर बांधले व त्याला लागून पक्की विटाची व चुन्याची धर्मशाळा बांधली. आजही ही धर्मशाळा चांगल्या अवस्थेत आहे. याचा उपयोग यात्रेला येणाऱ्या भक्तांसाठी होत आहे. कागदोपत्री या धर्मशाळेचे उल्लेख पुढीलप्रमाणे सापडतात. 'नाशिक, मुंबई इलाखा श्रीराम मंदिर यात अहिल्या मातेची मूर्ती आहे गोरा महादेव मंदिरासमोर धर्मशाळा'[५८] अशा रितीने येथील धर्मशाळेची माहिती मिळते.

## ८) चौंडी येथील धर्मशाळा :

चौंडी हे गाव अहमदनगर जिल्ह्यात जामखेड तालुक्यात आहे. तेथे अहिल्याबाई होळकरांचा जन्म झाला. आजही तेथे अहिल्याबाई होळकरांचे वंशज आहेत. १९९५ साली महाराष्ट्र शासनाने येथील परिसराचा जीर्णोद्धार केला आहे. त्यामुळे अहिल्याबाई होळकरांचे जन्मस्थळ पर्यटन स्थळ झाले आहे. अहिल्याबाई होळकरांनी तेथे अहिलेश्वर मंदिर बांधले. तेथील धर्मशाळेच्या जागेसाठीचे उल्लेख कागदोपत्री पुढीलप्रमाणे सापडतात. 'मंदिराशेजारी साधारण ५० फूट लांब व ५० फूट रुंद अशी रिकामी पडीत जागा आहे. चौंडी

आहिलेश्वर धर्मशाळा जमीन खुली'[५९] अशा प्रकारे चौंडीच्या धर्मशाळेविषयी माहिती मिळते.

## ९) चांदवड येथील धर्मशाळा :

चांदवड हे गाव नाशिक जिल्ह्यात मुंबई महामार्गावर आहे. होळकरांचे हे उपराजधानीचे गाव मल्हारराव होळकरांनी येथे चांदीच्या नाण्याची टाकसाळ काढली होती. त्याचे अवशेष आजही तेथे दिसतात. अहिल्याबाई येथे रंगमहाल व एक जुना राजवाडा बांधलेला आहे. रंगमहालात अहिल्याबाई होळकरांचे चित्र आहे. अहिल्याबाई होळकरांनी येथे अनेक मंदिरे पाच विहिरी बांधल्या त्याचबरोबर तेथे धर्मशाळाही बांधली त्याचे कागदोपत्री उल्लेख पुढीलप्रमाणे आहेत. 'चांदवड धर्मशाळा सदरहू धर्मशाळा कर्णिकेश्वर महादेव मंदिराच्या दरम्यान आहे.'[६०] चांदवड हे होळकरांचे उपराजधानीचे ठिकाण होते.

## १०) वणी सप्तशृंग गडावरील धर्मशाळा :

नाशिक पासून ८० किलोमीटर अंतरावर सप्तशृंगी गड आहे. गडावरील देवीला वणीची देवी म्हणतात. येथे शिवालय कुंड अहिल्याबाईने बांधले. त्याचबरोबर येणाऱ्या यात्रेकरूंची सोय व्हावी यासाठी एक धर्मशाळा बांधली ही धर्मशाळा दगडात बांधली होती परंतु आज मात्र ती पडक्या अवस्थेत आहे या धर्मशाळेचा उल्लेख पुढीलप्रमाणे 'श्री सप्तशृंग गड, धर्मशाळा आहे'[६१]

## ११) भीमाशंकर येथील धर्मशाळा :

भारतातील १२ ज्योतिर्लिंगातील भीमाशंकर हे एक ज्योतिर्लिंग आहे. अहिल्याबाई होळकरांनी सामाजिक भावनेतून सर्वच ज्योतिर्लिंगाच्या ठिकाणी सामाजिक कार्य केल्याचे उल्लेख मिळतात. 'भीमाशंकर येथे अहिल्याबाई होळकरांनी एक पायविहिर एकधर्मशाळा बांधली असून धर्मशाळा चांगल्या अवस्थेत आहे. पायविहीर पडीक अवस्थेत आहे.'[६२] अशा प्रकारे तत्कालीन कालखंडात व आजही अनेक निराधार लोकांना मोठ्या प्रमाणात

निवाऱ्याची सोय करुन देतात. तत्कालीन कालखंडात सामाजिक कार्यक्रमासाठी याचा उपयोग होत होता.

अहिल्याबाई होळकरांनी भारतातील अतिशय दुर्गम क्षेत्री यात्रेकरूंच्या सोयीसाठी धर्मशाळा बांधल्या परंतु त्याचे कागदोपत्री उल्लेख सापडत नाहीत असे संशोधनातून दिसून येते.

**अहिल्याबाई होळकरांनी धार्मिक ठिकाणी बांधलेले वाडे :**

**१) पंढरपूर येथील वाडा :**

भारतातील महत्त्वाच्या तीर्थक्षेत्रापैकी पंढरपूर एक आहे. भारतातून येथे वर्षातून ज्या दोन मोठ्या आषाढी व कार्तिकी या यात्रा भरतात त्यासाठी यात्रेकरू येतात. पंढरपूरमध्ये अनेक संस्थानिक, सरदार, राज्यांनी वेगवेळ्या भागातून आलेल्या यात्रेकरूंची राहण्याची सोय व्हावी म्हणून येथे धर्मशाळा, वाडे, मठ बांधले आहेत. अहिल्याबाईनेही पंढरपूरचे महत्त्व ओळखून येथे एक भव्य व प्रशस्त वाडा बांधला या वाड्याचा पाया काळ्या दगडांचा असून भिंतीचे काम चुना आणि विटा यांच्यात बांधले आहे. वाड्याच्या मध्यभागी मोठा चौक आहे. यात्रेकरूंना राहण्यासाठी येथे खोल्या बांधल्या आहेत. पहिल्या माळ्यावर १३ खोल्या आहेत व वरच्या माळ्यावर ११ खोल्या आहेत. वाड्याच्या दर्शनी भागात ६ खोल्या आहेत. वाड्याच्या मागील बाजूने दुसरेद्वार असून येथून चंद्रभागा नदीवर जाता येते. या वाड्यात दोन भुयारी मार्ग असून एक मार्ग विठ्ठल मंदिरात तर दुसरा मार्ग नदीवर जातो. आजही हा वाडा सुस्थितीत आहे त्यामुळे यात्रेकरूंना निवासासाठी राहता येते.

**२) चांदवड येथील वाडा :**

चांदवड हे नाशिक जिल्ह्यात आहे. चांदवड हे होळकरांचे उपराजधानीचे ठिकाण होते. त्यामुळे यात्रेसाठी व मजल-दरमजल करीत मोहिमेवर जाते वेळेस ह्या वाड्याचा उपयोग होत असे. चांदवड येथील वाड्याला रंगमहाल असे म्हणतात. प्रवेशद्वार उंच आहे.

प्रवेशद्वाराला लागूनच वाड्यास भव्य तटबंदी आहे. तंटबंदीस बुरूज आहेत. या तटबंदीत प्रवेशद्वाराच्या दोन्ही अंगास खोल्या आहेत. वाड्याच्या मध्यभागी प्रशस्त चौक आहे. या वाड्यात खाजगी ट्रस्ट चांदवडचे ऑफीस आहे. वाड्याचा उपयोग चांदवड येथील प्रसिद्ध रेणुका देवीच्या यात्रेला येणाऱ्या लोकांसाठी होत आहे. होळकर ट्रस्ट तर्फे या वाड्यात अहिल्याबाईचा पुतळा चौकात बसविण्यात आला आहे.

### ३) अहिल्याबाई होळकरांचा जेजुरी येथील वाडा :

जेजुरी हे पुणे जिल्ह्यातील प्रसिद्ध खंडोबा देवस्थान आहे. खंडोबा हे होळकरांचे कुलदैवत आहे. 'मल्हारराव होळकरांनी खंडोबाचा मल्हार तलाव व वाडा बांधला आज तो होळकर वाडा म्हणून प्रसिद्ध आहे'[६३] अहिल्याबाई होळकरांनी या वाड्याची डागडुजी केल्याचा उल्लेख आहेत. होळकर वाडा विटा व चुन्यात बांधलेला आहे. होळकर ट्रस्टतर्फे वाड्यात आतमध्ये अहिल्याबाई होळकरांचा संगमरवरी पुतळा बसविलेला आहे. वाड्यात होळकर खाजगी ट्रस्टचे कार्यालय असून तेथे मॅनेजर नेमले आहेत. वाडा आजही चांगल्या स्थितीत आहे. वाड्यात दत्ताचे मंदिर आहे व चारही बाजूनी यात्रेकरूंसाठी खोल्या बांधल्या आहेत. अशा प्रकारे जेजुरी येत्रील वाड्याची रचना केली आहे.

### ४) महेश्वर येथील वाडा :

महेश्वर हे अहिल्याबाईच्या राज्यकारभाराचे राजधानीचे ठिकाण होते. इ. स. १७६७ मध्ये अहिल्याबाईनी इंदोरहून राजधानीचे ठिकाण महेश्वर केले. त्यावेळी अहिल्याबाईनी महेश्वर वाड्याचा जीर्णोद्धार केला. हा वाडा महेश्वर येथील किल्ल्यात आहे. किल्यास १०० ते १२५ फूट उंचीचे प्रवेशद्वार असून संपूर्ण किल्ल्यास तटबंदी आहे. हा वाडा अत्यंत साध्या पद्धतीचा असून कौलारू आहे. वाड्याचे प्रवेशद्वार लाकडाचे असून पूर्वाभिमुख आहे. या वाड्यात अहिल्याबाईचा दरबार म्हणजे गादी साध्या सोप्यावर आहे. बाजुच्या सोप्यावर अहिल्याबाईंची पालखी शस्त्रास्त्रे ठेवण्यात आली आहेत.

हा वाडा दोन मजली असून चुना विटा आणि लाकूड यांच्यात बांधलेला आहे. या वाड्यातून नर्मदा नदीचे दर्शन घडते. महेश्वर येथून काशी यात्रेला जाणारे अनेक यात्रेकरू मुक्कामाला येत. या वाड्यात अहिल्याबाईंनी अन्नछत्र सदावर्ते सुरू केले होते. याच वाड्यात खाजगी ट्रस्टचे ऑफीस असून येथील सर्व देवस्थानांची व इतर व्यवस्था हे ऑफीस पहाते.

अशाप्रकारे हा वाडा यात्रेकरूंचे आश्रयस्थान अहिल्याबाईचे राजधानीचे ठिकाण होता.

**अहिल्याबाई होळकरांनी बांधलेला रस्ता :**

तत्कालीन कालखंडात दळणवळणाची व प्रवासाची साधने अत्यंत मर्यादित होते. बरेचसे लोक घोड्यावरून दौड करत असत. रस्ता अत्यंत खडतर असे काही राजे, संस्थानिक आपल्या संस्थानात रस्ते तयार करीत असत परंतु ते काम फार खर्चिक असल्यामुळे त्यावर मर्यादा पडत असत. अहिल्याबाई या अत्यंत दानशूर होत्या. हे संशोधनातून दिसून येते. तत्कालीन कालखंडात काशी यात्रा करण्यासाठी फारच कष्ट पडत असत म्हणून प्रवासाच्या सोयीसाठी अहिल्याबाई होळकरांनी कलकत्ता ते काशी हा रस्ता बांधून काढला. 'कलकत्ताहून काशीपर्यंत पक्की सडक तिनेच बांधून काढली. स्वतःची वाटचाल काटेरी असली तरी इतरांसाठी पायघड्या पसरल्यासारखे रस्ते तिने बनवून घेतले.'[६४] अशा प्रकारे अहिल्याबाई रस्ता तयार केला. अहिल्याबाई होळकरांनी अनेक ठिकाणी रस्ते तयार केले परंतु त्याची नोंद सापडत नाही असे शोधअंती दिसून येते.

**अहिल्याबाई होळकरांनी बांधलेले पुल :**

**१) त्र्यंबकेश्वर कुशावर्तावरील पूल दुरुस्त करविला :**

तत्कालीन कालखंडात शासन व्यवस्था नसल्यामुळे आपआपल्या राज्यातील संस्थानिक जनतेकडून जो सारा, चौथाई मिळत त्यातून अनेक लोककल्याणकारी कामे

करीत असत. लोकांना दळणवळण करणाऱ्यास नदीवरील तसेच घाटातील पूल बांधले जायचे. त्याचप्रमाणे अहिल्याबाई होळकरांनी पूल दुरुस्त केल्याचा उल्लेख मिळतो.

नाशिक जिल्ह्यातील त्र्यंबकेश्वर प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. अहिल्याबाईनी त्र्यंबकेश्वर येथील कुशावर्त घाटावर म्हणजे मंदिराकडून कुशावर्ताकडे जाणाऱ्या पुलाचा जीर्णोद्धार केला. 'श्री त्रिंबकेश्वर नाशिक जिल्हा कुशावर्त, घाटाजवळील पूल दुरुस्त करविला.'[६५] आज या पुलावर नगरपालिकेने फरशी बसविली आहे. आज हा पूल वापरत नाहीत.

## २) मालेगाव येथील मोसम पूल :

मालेगाव हे नाशिक जिल्ह्यात आहे ते मुंबई महामार्गावर आहे. मालेगाव येथील नदीवर अहिल्याबाई होळकरांनी लोकांच्या जाण्यायेण्याची, दळणवळणाची सोय व्हावी यासाठी हा पूल बांधला. आजही हा पूल सुस्थितीत आहे. नगरपालिकेने या पुलाशेजारी काही वर्षांपूर्वी पूल बनवून घेतला आहे. मालेगाव येथील मोसम पुलाबाबत होळकर दफ्तरात कुठेच नोंद साडपत नाही. मालेगाव गावातील वयोवृद्ध नागरिक हा पूल अहिल्याबाईंनी बांधला असे सांगतात. हे ऋण लक्षात घेऊनच मालेगाव नगरपालिकेने ह्या पुलाजवळ एक पाण्याची मोठी वॉटर टँक व उद्यान उभारले आहे. त्याला अहिल्याबाई होळकरांचे नाव दिले आहे.

## अहिल्याबाई होळकरांनी हुंडा बंदीसाठी राज्यात केलेला कायदा :

अहिल्याबाईंनी हुंडाबंदी अडीचशे वर्षांपूर्वी बंद करण्याचा प्रयत्न केला याचे उल्लेख मिळतात. एकदा अहिल्याबाई दरबारात होत्या. चार ब्राह्मण येऊन बसले. अहिल्याबाईंना एकजण म्हणाला, ''मातोश्री आम्हा गरीब ब्राह्मण जवळ पैसा नाही मुलीचे लग्न जमणे कठीण झाले आहे. द्रव्याखेरीज हुंडा घेतल्याखेरीज कोणी लग्नास तयार होत नाही. जिथे जावे तिथे हेच निराश होऊन परत येतो. पदरी तीन मुली, वये वाढू लागली पण लग्ने जमत नाहीत. यावर अहिल्याबाई म्हणाल्या, ''अहो वधूला देवी म्हणावे, लक्ष्मी म्हणावे आणि

तिच्या प्रवेशाचे आदिमायेच्या स्वागताचे पैसे घ्यावे हे कसे? स्त्रीच्या कौतुकाची नुसती सोंगे नुसता देखावा खोटा ! मातोश्री म्हणूनच आम्ही आलो आहोत यातून काही मार्ग काढावा ही विनंती यावरून त्यांनी कारभारी मुकुंद हरीस दऊतलेखणी घेऊन बोलावले सांगू लागल्या श्री शंकर आज्ञेवरून हे जाहीर करण्यात येत आहे की, यापुढे कुठल्याही जाती जमातीत विवाहाच्या समयी कन्येच्या पालनकर्त्यांकडून पैसे घेतल्यास तो गुन्हा समजण्यात येईल. द्रव्य घेईल त्याच्याकडून दामदुप्पट. जो देईल त्याच्याकडून जितके दिले तितके आणि मध्यस्थाकडून त्यास मिळाले असतील तितके सरकारात भरणा करावे लागतील अधिक रकमेचा दंड करण्याचा अधिकार सरकारला राहील याच्या नकला करून अहिल्यादेवीने प्रांतोप्रांती पाठविल्या.'[६६] आजही हुंड्यांच्या प्रकरणाहून अनेक वाद निर्माण होऊन स्त्रियांचा छळ केला जातो. अहिल्याबाईंनी आपल्या राज्यात दोनशे वर्षांपूर्वी हुंडाबंदी करून एक आदर्श घालून दिला. शासन व्यवस्थेपुढे आदर्श ठेवला.

### ग्रहण कालात केलेला दानधर्म :

प्राचीन काळाप्रमाणेच मराठा कालखंडातही ग्रहणाच्या दिवशी पेशवे आणि त्यांचे सरदार मोठे दान देत. ग्रहण एक मोठे अरिष्ठ मानले जात होते. ग्रहणाच्या वेळी सामान्य लोकही यथाशक्ती प्रमाणे दानधर्म करीत. ग्रहणानंतर अनेक श्रीमंत लोक स्वतःची तुला करून, ग्रहांचा दोष नाहीसा करण्यासाठी तुला केलेले धन, दान करीत. दानधर्म केल्याने चंद्र, सूर्य या देवाचीही ग्रहपिडा नष्ट होते, अशी समजूत होती.

अहिल्याबाईंनीही या काळात दानधर्म केल्याचे उल्लेख सापडतात. 'श्री सूर्यग्रहणास एक लक्ष रुपयांचा संकल्प करून हत्ती दान दिला. ३५ तुला केल्या. एक तुला मुख्य सुवर्ण व रुपये १६ हजार आपण व नातवास घेऊन तुला केली. याप्रमाणे दानधर्म केला.'[६७] अशा प्रकारे १४ जानेवारी १७८४ रोजी सूर्यग्रहणाच्या निमित्ताने अहिल्याबाई होळकरांनी गरीब लोकांना, विद्वानांना दानधर्म केला. यामध्ये एक लक्ष रुपयांचा संकल्प करून हत्तीदान

दिला. स्वतःच्या एकूण ३५ तुला केल्या त्यात मुख्यतुला सुवर्णांची होती. दुसरी तुला १६ हजार रुपयांची. यावेळी अनेक सरंजामदार व मात्रा आलेल्या होत्या त्यांना भोजन दिले.

अशा प्रकारे दानधर्माच्या नावाखाली अहिल्याबाईंच्या राज्यातील कोणी उपाशी राहू नये, याची काळजी घेत. दानधर्माच्या नावाने अनेक गरीब लोकांना मदत करत असत. त्यामुळे असंख्य अनाथ, अपंगांना आश्रय मिळाला होता.

**पशु-पक्षांसाठी केलेले कार्य :**

अहिल्याबाईंनी तत्कालीन कालखंडात फक्त मानवप्राण्यांची सोय केली असे नाही तर पशु पक्षी जनावरे यांचीही काळजी घेतली होती त्याचे उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतात. 'ती दररोज गरीब लोकांस अन्न देई व विशेष सणावाराचे दिवशी अत्यंत कनिष्ठ लोकांसही मेजवानी मिळत असे, उष्ण काळात रस्तोरस्ती वाटसरूंना पिण्यासाठी पाणी देयाकरता अहिल्याबाई नोकर उभे रहात असत. शांतकाळाच्या आरंभी बहुतेक आश्रीतांस व पंगू झालेल्यास वस्त्रे प्रावरणे मिळत रानातील पशु, हवेतील पक्षी, नदीतील मासे हेही तिच्या दयेचा अनुभव पावत. त्याजकरिता खाणे पाठविले जाई. उन्हाळ्यात महेश्वरा जवळचे शेतकरी असे पहात की, जमीन नांगरत असता अहिल्याबाईचे नोकर पाण्यांची भांडी घेऊन येत व ते बैलांना पाणी पाजण्यासाठी नांगर थांबवित.'[६८] अशा प्रकारे महेश्वर येथील गरीब जनतेला अहिल्याबाई यांच्याकडून भोजन दिले जात असे तर विशेष सनावराला मेजवाणी दिली जाई. उन्हाळ्यात रस्तोरस्ती वाटसरूंना पाणी देण्यासाठी पाणपोई सुरू केल्या जात होत्या तर हिवाळ्यात अपंग लोकांना व अश्रीतांना वस्त्रे देण्यात येत. हिवाळ्यात ओंकारेश्वर येथे ध्वजोत्सावाचा कार्यक्रम होई त्यावेळी अहिल्याबाईकडून गोरगरिबांना देण्यासाठी हजारो रुपयांची वस्त्रे पाठविण्यात येत याचे उल्लेख खालीलप्रमाणे 'सदाशिव उपाध्ये यांजबरोबर यांचा हजारांचे कापड, काही सफेद काही धिट व पाच खंबाईत व पंचवीस कद रेशमी.... भटजी ओंकारेश्वरला पाठविला'[६९] अशा प्रकारे प्रत्येक वर्षी

अहिल्याबाई ओंकारेश्वरला जात आणि त्यावेळी आपल्या हाताने दानधर्म करीत गरिबांना अन्नाबरोबर वस्त्रे देत परंतु त्याने जाणे झाले नाही तर आपल्या उपाध्याकडे वस्त्रे पाठवून ते दानधर्माचे आदेश पाठवीत. अहिल्याबाई होळकरांनी केलेल्या कामाचे उल्लेख कागदोपत्री मिळतात. त्याचा उल्लेख केला आहे. जिथे आकडेवारी उपलब्ध झाली आहे तिथे ती दिली आहे. मात्र काही कामाचे फक्त उल्लेख आहेत. इतिहास कालीन असल्यामुळे आकडेवारी उपलब्ध नाही असे संशोधनातून दिसून येते.

अहिल्याबाईंनी गायीसाठी अनेक कुरणे राखून ठेवीत असत. सरकारी खर्चानी गाय-वासरांना चारा-वैरणीचा खर्च भागविला जात. अशा गायी जंगलात चरण्यासाठी जात त्यांच्या पिण्याच्या पाण्याच्या सोयीसाठी जंगलात अनेक ठिकाणी अहिल्याबाईनी कुंडे व तळी बांधली, 'गायी, गुरे, मुक्या प्राण्यांसाठी चारा वैरणीची व्यवस्था केली गायीसाठी जमिनी लावून दिल्या. पंढरपूर नजीक त्या बोहाळी या खेडेगावी या संदर्भात देवस्थानाच्या जमीन आहेत.'[७०] अहिल्याबाईंनी गायी चरण्यासाठी जमिनी लावून दिल्या होत्या त्यातील काही जमिनी पंढरपूर जवळील बोहाळी या खेडे गावी होत्या. गायीसाठी गवत कापणे, यासाठी स्वतंत्र खर्चाची तरतूद होती. जेजूरी येथील वाघ्या, मुरळी यांना कऱ्हे पठारावरील गवत कापण्याचे काम अहिल्याबाई होळकरांनी दिले आणि त्यांना रोजगार उपलब्ध करून दिला होता. '१००० गवत कटाई गाईकडे'[७१] इ.स. १७८० साली गायीसाठी लागणाऱ्या गवत कटाईसाठी १००० रुपये खर्च झाला होता. 'श्री देवपूजेकडील कपिला गाईस दररोज पुळे १५० व वासरे यास दररोज पुळे ७५ ह्या प्रमाणे घालणे.'[७२] महेश्वर येथे अहिल्याबाईची नित्य पूजेची गाय व त्यांचे वासरे होती. त्यांच्यासाठी रोज २७५ पेंढ्या देण्याची आज्ञा अहिल्याबाईची होती. 'केवळ गरीब प्रजाच नव्हे तर पशु, स्थलचर, जलचर प्राणीही तिने लेकरासारखे पोसलेहोते. रोज गोसेवा केल्याखेरीज ती अन्नग्रहण करीत नसे. तिने गायीगुरांसाठी कुरणे राखून दिली. यात नवल नाही पण उभ्या पिकावर येणाऱ्या पाखरांच्या

धाडी हाकण्यासाठी होणारा गोफण गुंड्याचा प्रकार पाहून तिचे हळूवर मनकळवळले तिने सुगीच्या दिवसांत अंतरा अंतराने पिकल्या शेतांचा एक वाटा पांखरासाठी राखून ठेवण्यासाठी नेमणुका दिल्या."[७३]

अहिल्याबाई होळकर धान्याची अनेक कोठारे व उभे पीक असलेली कित्येत शेते विकत घेत आणि पशुपक्षांसाठी ती मोकळी सोडून देत, मुंग्यांसाठी साखर व माशांसाठी कणकेच्या गोळ्या नेहमीच नर्मदेच्या व सिप्रेच्या पाण्यात टाकण्यात येत असत. पशुपक्षांच्या अशा संरक्षणासाठी अहिल्याबाई पुष्कळ खर्च करीत या कामासाठी त्यांनी मोठा स्वतंत्र नोकरवर्ग नेमलेला होता. अहिल्याबाईंची ही कल्पना आजच्या अभयारण्यासारखी होती. सगळ्याच पक्षांची सोय त्या लावू शकत नव्हत्या परंतु जेवढे शक्य होईल तेवढी सोय अहिल्याबाईंनी केली होती.

अशा प्रकारे अहिल्याबाईने राज्यातील जनतेच्या सुख-सुविधाबरोबर पशु पक्षी, प्राणी ह्यांचीही काळजी घेतली असे संशोधनातून दिसून येते. मानवतेच्या खऱ्या धर्माची व सामाजिक विचारांचा वारसा अहिल्याबाईंनी चालवला असे चिकित्सक दृष्टीने विचार केला असता लक्षात येते.

## अहिल्याबाई होळकरांनी विविध विद्वानांना दिलेला राजाश्रय :

तत्कालीन कालखंडात जे विद्वान, शाहीर, पंडित, कवि यांना प्रामुख्याने आजच्या सारखे शासनातर्फे मानधन, पुरस्कार नसत तर ह्या लोकांना राजे, संस्थानिक धनिक यांचा राजाश्रय होता. विद्वान, विचारवंत कवी हे लोकांचे दुःख मांडणारे व देशातील नवनवीन शोध घेणारे आहेत हे अहिल्याबाईंनी जाणले होते. अहिल्याबाई धार्मिक प्रवृत्तीच्या असल्या तरी अज्ञानी नव्हत्या. अनुभवाचे ज्ञान त्यांच्यापाशी भरपूर होते. कीर्तन, प्रवचन, पुराणश्रवणाने त्यांना धार्मिक ज्ञान प्राप्त झाले होते. ब्राह्मण भोजने घालण्याबरोबर विद्‌वान पंडित, कवि यांची कदर करणारी होती.

'रामायण, महाभारत, गीत गोविंद, ज्ञानेश्वरी, स्वयंराख्याने, रस मंजिरी, रघुवंश, विष्णुसहस्रनास, व्यंकटेशस्त्रोम पूजा प्रकार, दान चंद्रिका, मुहूर्तचिंतामणी, निर्णयसिंधु अनुवेदांत इत्यादी अनेक प्रकारची धार्मिक हस्तलिखित होती. १७६८ मध्ये चांदवडाकडून बाईने तेवीस पोथ्या मागवून घेतलेचा एक उल्लेख मिळतो. विद्वान पंडितांची, ज्योतिषाची, वैद्यांची, कीर्तन - प्रवचनकारांची, कलाकारांची बाईकडे नेहमी ये-जा असे. योग्यतेप्रमाणे बाई सर्वांचा पाहुणचार नी आदरसत्कार करी, कित्यंकास इनामे दिली तर कित्येकांस दरबारात आश्रय मिळे. पंडित-कवी मोरोपंत आणि शाहीर अनंतफंदी यांचा बाईने आदरसत्कार केल्याची गोष्ट सर्वश्रृत आहे. बाईच्या कृपा लोबाला पात्र झालेल्या काही विद्वानांची नावे उपलब्ध आहेत ती पुढीलप्रमाणे : १) मल्हारभट, २) ज्ञानोबा पुराणिक, ३) रामचंद्र कानडे, ४) काशीनाथ शास्त्री, ५) दामोदर शास्त्री, ६) निहाल भट, ७) भट्टाशास्त्री ऋग्वेदी, ८) गोटू शास्त्री, ९) मनोहर बर्वे, १०) गणेश भट, ११) त्र्यंबक भट, १२) महंत सुंजगीर गोसावी, १३) त्रिंबक बुवा हरदास, १४) अनंत रामजी, १५) गोविंदराम पांडे, १६) बाळकृष्ण भट जोशी, १७) बाळारामजी, १८) गणेशराम

हे सर्व विद्वान विविध शास्त्रांचे अधिकारी होते. ते सर्व महाराष्ट्र, तेलंगणा, गुजरात, मळवा आदी दूरदूरच्या भागातील होते.'[१७४] अहिल्याबाईंची ज्ञानलालसा आणि औदार्यबुद्धी किती व्यापक होती. गुणीजणांची त्या केवढी कदर करायच्या हे वरील विश्लेषणावरून दिसून येते.

'येथे श्री 'अहिल्याकामधेनू' या ग्रंथाचा उल्लेख केला पाहिजे. राजधर्म आपणास यथायोग्य व यथासंग कळावा या हेतूने अनेक विद्वानांच्या साहाय्याने हा ग्रंथ मातोश्री साहेबांनी तयार करविला. कामधेनीचे अठरा 'वत्स' आहेत. ग्रंथाची रचना अतिचातुर्याची आहे. प्रत्येक विषयावर असलेल्या ग्रंथाचा समावेश करून जरूर तेथे निर्णय दिलेला आहे. यामुळे तत्कालीन प्रसिद्ध व मान्य असलेल्या विद्या, कला आणि त्यांचे प्रणेते यांचा हा कोश

बनला आहे. ज्ञान प्रसाराचे कार्य या ग्रंथाने तर केले परंतु पूर्वापार पद्धती जिवंत ठेवण्यासही हा ग्रंथ उपयोग झाला आसणार"[७५] 'महेश्वर आणि इतर तीर्थक्षेत्रांच्या ठायी, अन्य प्रांतीय शास्त्री, पंडित वैद्य व वैदिक आणवून जी वसाहतीची योजना केली ती पर्यायाने ज्ञानसंरक्षण व ज्ञानसंवर्धन याचीच योजना होय, श्री क्षेत्र काशी येथे त्यांनी 'ब्रह्मपुरी' बसविण्याची ख्याती आहे ती पुरी म्हणजे, साधी राहणी व उच्चविचार सरणी आजन्म विधेस वाहिलेल्या समाज नायकाची वसाहत होय. ते एक प्रकारचे विश्वविद्यालय होय. अशा विश्वविद्यालयातून रामशास्त्री प्रभुण्यासारखी विद्वानरत्ने चमकली."[७६]

वरील उदाहरणावरून ज्या काळात समाज शिक्षणाबाबतीत अंधारात चाचपडत होता त्यात काळात अहिल्याबाईंनी 'अहिल्याकामधेनू' सारखे आणि ब्रह्मपुरीसारखे विश्वविद्यालय, महेश्वर येथे संस्कृत पाठशाळा काढून आपला शिक्षणाबद्दलचा उदात्त दृष्टिकोन स्पष्ट करून दिला. त्याचे अनुकरण अनेक सरदारांनी व जहागिरदाराने केले व आपआपल्या प्रांतात अशा यथाशक्ती विद्यादानास सुरुवात केली.

अशा प्रकारे अहिल्याबाईंनी अनेक ब्राह्मणांना, विद्वानांना, कवी, शाहीर यांना राजाश्रय देऊन त्यांच्याकडून अनेक धार्मिक स्वरापाच्या रचना करून घेतल्या. दुर्मिळ धार्मिक ग्रंथाच्या प्रती, हस्तलिखिते, ब्राह्मणांकडून तयार करवून घेतले आणि आपल्या ग्रंथ संग्रहात भर घातली असे वरील विश्लेषणावरून लक्षात येते.

**भिल्ल, गोंड या भक्षकांना रक्षक बनविले :**

अहिल्याबाईंच्या राज्यातील जनतेला मोठ्या प्रमाणात सुरक्षितता होती यांचे उदाहरण खालील विश्लेषणावरून होते. प्रजेच्या आणि यात्रेकरूंच्या, व्यापाऱ्यांच्या आणि प्रवाशांच्या लूटमारीच्या तक्रारी बाईंच्या काना येऊ लागल्या. 'लुटारू, भिल्ल, गोंड लोकांवर जरब बसवण्यासाठी त्यांनी आपला जावई यशवंतराव फणसे याला सैन्य घेऊन पाठविले. भिल्लांच्या पुढाऱ्यांना पकडून त्याने बाईंपुढे उभे केले. अहिल्याबाईंनी त्यांची

बाजू समजून घेतली. उपजिविकेचे अन्य साधन नसल्याने हे भिल्ल व गोंड त्यांच्या डोंगरी मुलखातून मालाची ने-आण करणाऱ्या व्यापाऱ्यांकडून 'भीलकवडी' या नावाचा कर वसूल करीत. सधन यात्रेकरूंना लूटत. सर्वप्रथम बाईंनी भीलकवडी कराला मान्यता दिली. सरकारने कर वसुलीचा अधिकार दिल्याने ते सरकारचे नोकर बनले. दुसरे उपजिविकेचे साधन म्हणून त्यांच्या वस्तीशेजारच्या सरकारी पडीक जमिनी देऊन त्यांना शेतीच्या व्यवसायास प्रवृत्त केले परंतु या सवलतीच्या मोबदल्यात त्यांच्या डोंगराळ आणि जंगली भागातील रस्त्यांच्या व प्रवाशांच्या संरक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर टाकली.'[७७] यातील महत्त्वाची अट त्यांनी अशी लावून दिली की जेवढ्या प्रदेशांचे रक्षण त्यांना करावयाचे होते त्या प्रदेशाच्या दोन्ही सीमांच्या आत जर कोणाचा माल द्रव्य लुटले तर ते लुटारूकडून परत मिळवून मालकाच्या स्वाधीन करण्याचा भार त्या लोकांवर सोपविला ही व्यवस्था अभूतपूर्व होती. तसेच अहिल्याबाईंनी जागोजागी रक्षक दलाच्या चौक्या बसवल्या. लुटालूट कायमची थांबविली. राज्यातील जनतेला सुरक्षितता प्राप्त करून दिली.

वरील विश्लेषणावरून असे लक्षात येते की, अपराधी गुन्हा का करतात याच्या पाठीमागची कारणे लक्षात घेऊन त्यांचा बंदोबस्त करून त्याला न्याय मिळवून दिला पाहिजे. एखाद्या प्रश्नाच्या मूळाशी जावून तो प्रश्न सोडविला पाहिजे ते अहिल्याबाईंनी केले.

### स्त्रीला दत्तक मुलगा घेण्याची दिलेली परवानगी :

१८ व्या शतकात स्त्री अनेक प्रथा, रूढी, अंधश्रद्धा यात अडकली होती. अहिल्याबाईंनी त्यांच्या राज्यात काही प्रथा मोडीत काढून स्त्रीला न्याय मिळवून दिल्याचे उल्लेख सापडतात. आपल्या प्रजेला अहितकारक ठरलेले पूर्वीचे सर्व कायदे नियम आणि कर त्यांनी रद्द करून टाकले अपत्यहीन विधवांचे धन सरकार जप्त करत. तो नियम रद्द करून त्यांनी अशा विधवां दत्तक पुत्र घेण्याची आणि आपल्या धनाचा उपयोग करून देणारा

नियम केला. या नियमाचे पालन करण्याच्या कामी विधवांना त्या लागेल ती मदतही देत असत. करांची संख्या व प्रमाणही अहिल्याबाईंनी कमी केले. त्यामुळे राज्याचे उत्पादन घटले तरी प्रजेला लाभ झाला. एकदा एका विधवेने अहिल्याबाईच्या दरबारात कैफियत दिली की, माझ्याजवळ पुष्कळ पैसा आहे परंतु मला मूल नाही. माझ्या या पैशाचा उपयोग मला करता यावा आणि माझा वंश मला पुढे चालवता यावा यासाठी कोणाला तरी दत्तक घेण्याची परवानगी द्यावी. ही कैफियत अहिल्याबाईंच्या हाती पडली तेव्हा त्यांचे काही अधिकारीही तेथे बसले होते. त्यांनी सांगितले की, 'या बाईंना दत्तक घेण्याची परवानगी द्यायला काहीच हरकत नाही. ती खूप धनवान आहे परंतु आधी हे ठरवून घेतले पाहिजे की ती यासाठी सरकारला किती नजराणा देण्यास तयार आहे. इतर सर्व अधिकाऱ्यांचेही मत असेच होते. त्यांचे म्हणणे ऐकून घेतल्यावर बाई म्हणाल्या, दत्तकाची परानगी घ्यावी हे तुमचे म्हणणे मला पटते परंतु तिच्याकडून नजराणा घेण्याचा विचार काही मला रूचत नाही. तिच्याकडून नजराणा का व कशासाठी घ्यायचा? कोणता घ्यायचा? तिच्यापाशी असलेला सर्व पैसा तिच्या नवऱ्याने कमविला आहे. मूल न होताच तो मेला. तेव्हा आता आपल्या मर्जीप्रमाणे दत्तक घेण्याचा अधिकार आपल्या धर्मशास्त्रानुसार त्याच्या बायकोला आहे. तिला दत्तक कसा काय घेता येईल, असे आम्ही राज्यकारभार चालविणारी मंडळी म्हणत आहोत पण आमचे हे म्हणणे धर्मशास्त्राच्या अगदी विरुद्ध आहे. आता जर आपण काही पैसा घेऊन तिला दत्तक घेण्याची परानगी दिली तर आपले तसे करणे हे धर्मविरुद्ध आणि घोर अन्यायाचे होईल. जबरदस्तीने आपण तिचा पैसा घेतला तर तो दरोडा ठरेल. हे मुळीच योग्य नाही. म्हणून त्या बाईकडून एकही पैसा घेता कामा नये. आमच्यातर्फे त्या बाईच्या कैफियतीवर लिहा की, तुम्ही दत्तक घेत आहात हे समजून आम्हाला फार संतोष वाटतो.'[७८]

अशा प्रकारे १८ व्या शतकात अहिल्याबाई होळकरांनी अनेक विधवांचे प्रश्न अडीअडचणी ऐकूण त्या सोडविल्या. त्यांना न्याय मिळवून दिला, असे विविध ग्रंथांच्या

अभ्यासावरून दिसून येते. स्त्रिला समाजात बरोबरीचे स्थान प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला म्हणून त्यांच्या या कार्याच्या महतीवरून प्रसिद्ध कवी मोरोपंत म्हणतो

देवि अहिल्याबाई। झालीस जगत्रयात तू धन्या ॥
न - न्याय धर्म निरता अन्या कलिमाजि ऐकली कन्या ॥

**अहिल्याबाईंच्या कालखंडातील शेतकरी आणि करव्यवस्था :**

अहिल्याबाई  राज्यातील शेतकरी सुखी व्हावा यासाठी अहिल्याबाईंनी अनेक कायदे केले होते. राजकारभार त्यांच्या हाती येताच शेती व शेतकरी यांच्या उन्नतीकडे लक्ष पुरविले. शेतीचे महत्त्व त्यांना चांगल्या प्रकारे माहीत होते. एखाद्या वर्षी पाऊस नीट न झाल्यामुळे पीक कमी आले तर शेतकऱ्यांना सारामाफी देण्यात येई व इतरही सोयी, सवलती दिल्या जात. 'लष्करी हालचालीमुळे शेतातील पिकांचे नुकसान झाल्यास ताबडतोब भरपाई करून दिली जात असे."[७९] सरकारी अधिकारी व नोकरवर्ग यांच्या जाचांपासून अहिल्याबाईच्या राज्यातील शेतकरी सर्वस्वी मुक्त होता. जमिनीवरील करही अगदीच माफक असे. शेतकऱ्यावर शेतसाऱ्याखेरीज इतर कोणताही कर नव्हता. शेतसारा व कर वसुली यांच्यासाठी त्यांनी आपल्या राज्याचे उत्तर, मध्य व दक्षिण असे तीन भाग केले होते. उत्तर विभागात इंदोर, मराना व राजपुताना येत असे. मध्य भागात महेश्वर व त्याच्या आसपासचा इलाखा मोडत आणि दक्षिण भागात सातपुड्याच्या दक्षिणेकडील भाग येई.

राज्यात शांतता व सुव्यवस्था असल्यामुळे बाहेरचे व्यापारीही निर्भयपणे राज्यात व्यापार करीत असत. अहिल्याबाईंनी संरक्षण दिलेल्या वस्त्रोद्योग महेश्वरमध्ये वाढत होता. अनेक अन्यायी करांची प्रथा त्यांनी बंद केली होती. अशा प्रकारे अहिल्याबाईंनी आपल्या राज्यात शेतकऱ्याला संरक्षण प्राप्त करून दिले.

वरील विश्लेषणाचा विचार करता अहिल्याबाईंच्या सामाजिक कार्यावर प्रकाश टाकला असता असे दिसून येते की, अहिल्याबाईंनी आपल्या हाती असणाऱ्या सत्तेचा

उपयोग राज्यातील जनतेच्या लोककल्याणकारी कार्यासाठी केला. समाजकल्याण हे साध्य व राजकारण हे साधन या राजकीय तत्वाचा वापर त्यानी केल्याचे संशोधनातून स्पष्ट होते. त्यांच्या सामाजिक नेतृत्वाचे विविध पैलू त्यातून दिसून येतात. संपूर्ण भारतात व त्यांच्या राज्यात तलाव, विहिरी, रस्ते, यांची निर्मिती करुन लोकांच्या गैरसोयी दूर केल्या. शेतकऱ्यांना प्राधान्य देत शेतीचे उत्पन्न वाढावे म्हणून शेतकऱ्याना आर्थिक मदत केली. करवसूली करण्याची मर्यादा ठरवून दिली. त्यामुळे भ्रष्टाचाराला अधिकाऱ्यांना वाव नव्हता. पशुपक्षांना, प्राण्यांना, गाई चारण्यासाठी कुरणे राखून ठेवली. स्त्रीयांना समाजात बरोबरीचे स्थान मिळवून देण्याचा प्रयत्न केला. हुंडा बंदी, विधवा स्त्रीयांना मुलगा दत्तक घेण्याचा अधिकार दिला, भिल्ल दरोडेखोरांना रोजगार मिळवून दिला. विद्वान कवी, पंडिताना राजाश्रय मिळवून दिला. अशा प्रकारची अनेक लोकोपयोगी कार्ये करुन अठराव्या शतकात एका स्त्रीने आदर्श राज्य निर्माण करुन दाखविले.

## संदर्भ ग्रंथ सूची


१) तिजारे, रा.अं. व घांग्रेकर चि.ग., आधुनिक राजकीय विश्लेषण, मंगेश प्रकाशन, नागपूर, १९९४, पृ. १९.

२) उपरोक्त, पृ. १९.

३) उपरोक्त, पृ. ९९-१००.

४) कुलकर्णी अ. रा. आणि खरे ग. ह., मराठ्यांचा इतिहास खंड - दुसरा महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळासाठी कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८५, पृ. ३२१.

५) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक - पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगती मंडळ, जळगाव, प्रथम आवृत्ती डिसेंबर, २०००, पृ. ३०५.

६) मोरवंचीकर रा. श्री., पैठण दर्शन पुरातत्त्व वस्तूसंग्रहालय विभाग, महाराष्ट्र शासन पृ. ४०-४१.

७) मोरवंचीकर रा. श्री., दक्षिण काशी पैठण, रविराज प्रकाशन, पुणे १९८७, पृ. ६९.

८) दिक्षित स.प्रा., *होलकर वंश के कुछ अज्ञात शिलालेख,* गर्ग रामसेवक (संपा.), अहिल्या स्मारिका प्रकाशक खासगी देवी अहिल्यादेवी होळकर चेरिटीज ट्रस्ट, इंदोर १९७०, पृ. ३३.

९) शर्मा हिरालाल, अहिल्यादेवी, नॅशनल बुक ट्रस्ट, मुंबई, १९८९, पृ. १११.

१०) पंजाबी बालकृष्ण, *भारतीय वास्तुकला में अहिल्याबाई का योगदान,* गर्ग रामसेवक व शर्मा हिरालाल (संपा.), अहिल्या स्मारिका, खासगी देवी अहिल्याबाई होळकर चॅरिटिज ट्रस्ट इंदोर, १९७५, पृ. ३५.

११) मिंगारकर कृ. ज्ञा., विठ्ठल महात्म्य, दिलीपराव प्रकाशन, पुणे, १९९१, पृ. २३.

१२) ठाकूर वा.वा., होळकरशाहीचा इतिहास, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, इंदोर, १९४४, पृ. २१०.

१३) उपरोक्त, पृ. २११.

१४) दीक्षित म. श्री., होळकरशाहीचा इतिहास, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध. १९८४, पृ. ७४, ७५.

१५) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी प्रकाशक, अहिल्यादेवी प्रगती मंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ३१२.

१६) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने भाग २ रा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध झाला. इंदोर, १९४५, पृ. २६२.

१७) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग २ रा, तुकाराम जावजी यांनी निर्णयसागर छापखाना, मुंबई येथे प्रसिद्ध, १९११, पृ. ८६.

१८) गावडे रा. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खासगी स्टेट होळकर सरकराच्या आज्ञेने प्रसिद्धी इंदोर, १९२३, पृ. ३०५.

१९) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध १९४५, पृ. २५४.

२०) उपरोक्त, पृ. २५४.

२१) उपरोक्त, पृ. २५६.

२२) उपरोक्त, पृ. २५६.

२३) गर्ग रामसेवक, शर्मा हिरालाल, अहिल्या स्मरणिका १९७८, खासगी होळकर चेरिटीज ट्रस्ट, इंदोर, पृ. ६३.

२४) शर्मा हिरालाल, अहिल्याबाई, प्रकाशन नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया दिल्ली, १९९८, पृ. ११२.

२५) गावडे शं. ब., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खासगी ट्रस्ट इंदौर, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, १९२३, पृ. १२५.

२६) उपरोक्त, पृ. १२४.

२७) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक अहिल्यादेवी प्रगती मंडळ जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ३२५.

२८) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने खंड १ ला, भाग २ रा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, १९४५, पृ. २५८.

२९) उपरोक्त, पृ. १५८.

३०) अग्निहोत्री राजीवलोचन, *होलकर-नरेशों की संस्कृत प्रशस्तियाँ,* गर्ग रामसेवक, शर्मा हिरालाल (संपा.), अहिल्या स्मारिका, प्रकाशक खासगी अहिल्यादेवी होळकर चॅरिटीज ट्रस्ट इंदोर, १९७१, पृ. २६.

३१) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग १ ला होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, इंदोर, पृ. १५८.

३२) उपरोक्त, पृ. २५७.

३३) गावडे शं. ब., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खासगी ट्रस्ट देवी अहिल्याबाई होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध १९२३, पृ. ३१२.

३४) खरे ग. ह., महाराष्ट्राची चार दैवते प्रकाशक, दाते रा. रा. पुणे, वर्ष १९५८,. पृ. ९३.

३५) ठाकूर वा. वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने भाग -१, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध इंदोर, १९४५, पृ. २८६.

३६) गावडे शं. ब., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खासगी ट्रस्ट देवी अहिल्याबाई, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध १९२३, पृ. २८६.

३७) उपरोक्त, पृ. ३१५.

३८) उपरोक्त, पृ. ३१४.

३९) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी प्रकाशन, अहिल्यादेवी प्रगती मंडळ, जळगाव, डिसेंबर, २०००, पृ. ३३५.

४०) उपरोक्त, पृ. ३३६.

४१) उपरोक्त, पृ. ३३७.

४२) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग दुसरा प्रकाशक - तुकाराम जावजी यांनी निर्णयसागर छापखाना, मुंबई येथे प्रसिद्ध केला. वर्ष १९११, पृ. ४६.

४३) उपरोक्त, पृ. ४७.

४४) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, जळगाव २४ डिसेंबर २०००, पृ. ३४१.

४५) उपरोक्त, पृ. ३४१.

४६) उपरोक्त, पृ. ३४५.

४७) उपरोक्त, पृ. ३४६.

४८) उपरोक्त, पृ. ३४७.

४९) उपरोक्त, पृ. ३४८.

५०) कदम सु. शं., 'सजशृंगी गड' प्रकाशन डी. एन. नागर, १९८०, पृ. २३.

५१) गावडे शं. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, होळकर स्टेट, १९२३, पृ.३०४.

५२) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशन अहिल्यादेवी प्रगती मंडळ जळगाव, पृ. ३५५.

५३) गावडे शं. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खासगी ट्रस्ट होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, इंदोर, १९२३, पृ. ३०५.

५४) उपरोक्त, पृ. ३०५.

५५) उपरोक्त, पृ. ३०६.

५६) उपरोक्त, पृ. ३१३.

५७) उपरोक्त, पृ. ३१४.

५८) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ३५७.

५९) उपरोक्त, पृ. ३५७.

६०) उपरोक्त, पृ. ३५८.

६१) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास, होळकर सरकारचा आज्ञेने प्रसिद्ध, इंदोर, १९४५, पृ. ३०.

६२) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ३५८.

६३) उपरोक्त, पृ. ३६१.

६४) जोशी श्री.बा., *अहिल्या धर्मयोगिनी,* शास्त्री अवधूत (संपा.), धर्मभास्कर, देवी अहिल्याबाई होळकर विशेषांक, मुंबई १९७५, पृ. ८४.

६५) उपरोक्त, पृ. ८४.

६६) जहागीरदार विजया, तेजस्विनी अहिल्याबाई होळकर महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, २००३, पृ. ६०.

६७) पारसनीस द. ब., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग २ रा, पृ. ११५.

६८) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, डिसेंबर २००० जळगाव, पृ. १०८.

६९) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग १ ला ल. ८४ इंदोर, मुंबई, १९३०, पृ. १८१.

७०) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. १०९.

७१) ठाकूर वा. वा., होळकरशाहीचा इतिहास, भाग १ ला, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इंदोर, १९४५, पृ. २६९.

७२) ठाकूर वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, खंड १ ला, भाग २ रा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, १९४०, पृ. १६६.

७३) जोशी, श्री.बा., *अहिल्या धर्मयोगिनी,* शास्त्री अवधूत (संपा), धर्मभास्कर (अहिल्याबाई होळकर विशेषांक), १९७५ मुंबई, पृ. ८६.

७४) दिक्षित म. श्री., पुण्यश्लोक अहिल्या प्रकाशक गजानन क्षीरसागर, १९८४, तृतीय आवृत्ती पृ. ५६, ५७.

७५) ठाकूर वा. वा. , होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, १९४०, पृ. २०१.

७६) उपरोक्त, पृ.२०१.

७७) लोही म. ना., देवी अहिल्याबाई होळकर वास्तव दर्शन, ज्ञानेश प्रकाशन, नागपूर, २००१, पृ. ८२.

७८) शर्मा हिरालाल, अहिल्याबाई, नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया, मुंबई जून १९६९, पृ. ६७,६८

७९) उपरोक्त, पृ. ८१.

# प्रकरण चौथे
# अहिल्याबाई होळकर यांचे धार्मिक कार्य

**प्रास्ताविक :**

भारतीय लोकजीवनात धर्म या शब्दास महत्त्वाचे स्थान आहे. हा शब्द भारतीय भाषांत वेगवेगळ्या अर्थांनी वापरला जातो. आज जगातील सर्व मानवी समूहात धर्म दोन प्रकारच्या भूमिका बजावताना दिसत आहे. त्यापैकी त्याची एक भूमिका "माणसांना जगण्याचे प्रयोजन शिकवणारी आहे. जीवनसंघर्षात हतबल झालेल्या दु:ख आणि दारिद्र्याने पिचून गेलेल्या, अविश्रांत श्रमांनी थकलेल्या उदास एकाकी आणि भयग्रस्त बनलेल्या माणसांचे सांत्वन करणे ही धर्माची फार मोठी भूमिका आहे."[१] धर्माची दुसरी भूमिका ही राजकीय तत्त्वप्रणालीची जागा घेण्याची आहे. सोव्हिएत रशियाच्या विघटनानंतर ही भूमिका अधिक वेगवान झालेली आहे.

**राजकीय व्यवहार व धर्म :**

भीष्माने युधिष्ठिरास राजधर्माचे महत्त्व प्रतिपादन केले. त्याचप्रमाणे आपत्तीच्या काळात राजाने आपधर्माचे पालन विज्ञानबलाच्या सहाय्याने कशा प्रकारे करावे याचे विवेचन केले "भीष्माच्या मते राजाने राज्याची वेगवेगळी धोरणे अंमलात आणित असताना धर्माचे पालन केले पाहिजे. शांतिपर्वात उतथ्य व वामदेव या दोन विचारवंतांनी राजाने आपल्या राजकीय कार्यात धर्माचा उपयोग करून कशा प्रकारे लोकांचे कल्याण करावे याचे विवेचन केले आहे"[२] उतथ्याने राजा मांधात्यास राजकीय व्यवहारात धर्माचा वापर कसा करावा याचे विवेचन केले आहे. त्यांच्या मते, प्रजेचे कल्याण करणे हे राजाचे मुख्य उद्दिष्ट आहे. म्हणून राजाने प्रथम आत्मसंयम राखून धर्माच्या आधारे राज्य करावे. प्रजेच्या वर्तनातील दोष दूर करून त्यांना धर्माच्या मार्गावर लावण्याचे काम राज्याने केले पाहिजे.

राजाने राज्यातील कमजोर व गरीब वर्गाचे संरक्षण करावे. आपल्या राज्यातील अधिकाऱ्यांना प्रजेवर अन्याय करू देऊ नये. दोषी माणसास सजा द्यावी. त्यांच्या राज्यात गरीब लोकांची जर हत्या होत असेल तर त्याच्या राज्यातील धर्माचा ऱ्हास होतो. राजाने लोकांना रोजगार दिला पाहिजे, व्यापारास उत्तेजन दिले पाहिजे, आग, साथीचे रोग, महापूर, थंडी, उष्णता यापासून त्याने लोकांचे रक्षण केले पाहिजे. ज्यांच्याजवळ उपजीविकेची साधने नाहीत त्यांना ती पुरविली पाहिजेत. समाजातील दुःखी, निराधार लोकांना आधार दिला पाहिजे. राजाच्या कारभारावरच राज्याचे व प्रजेचे भवितव्य ठरते. म्हणूनच राजा हा कालाचे कारण आहे असे म्हटले जाते. चांगला राजा राज्याची अभिवृद्धी करतो तर वाईट राजा राज्याचा नाश करतो. राजाने समाजातील दुर्बलांचे रक्षण केले पाहिजे. कारण, दुर्बल माणसांसाठीच राज्याची निर्मिती करण्यात आले आहे. त्यामुळे त्यांचे कल्याण करण्याची जबाबदारी राजाची आहे.

राजाने कारभार कसा करावा याचे भीष्माने विस्ताराने विवेचन केले आहे. राजाने आपल्या राज्यातील पौर-जनपदांना संतुष्ठ ठेवावे. कृषी, गोपालन व वाणिज्य यांच्या विकासास मदत करावी. राजाने आपले निर्णय प्रजेस कळवावेत. राजाने सधन वर्गाकडून पैसा गोळा करून सर्व समाजास हितकारक ठरणाऱ्या कामावर तो खर्च करावा. राजाने रस्ते, धर्मशाळा, तळी, विहिरी बांधाव्यात, राज्यातील निराधार, अपंग आणि दीन लोकांना मदत करावी. ''राजाचा उद्देश धर्माचे पालन करून सर्वांचा अभ्युदय घडवून आणणे हा असला तरी राजाला व्यवहारात तसे करणे शक्य होत नाही. राज्यसंस्था नैसर्गिक नसून ती आराजक दूर करण्यासाठी सामाजिक करारांमधून निर्माण झालेली संस्था आहे. 'मत्स्यन्याय' दूर करून समाजात सुव्यवस्था प्रस्थापित करणे हे राजाचे उद्दिष्ट आहे.''[३] राज्यसंस्था आणि धर्म यांच्यातील परस्पर संबंधांचा अभ्यास करीत असताना राज्याचे नियम सर्वसाधारण नीतिनियमापेक्षा वेगळे असतात असा विचार मांडण्यात आला. आपधर्मात स्वसंरक्षणार्थ

अन्यायाने वागणेही क्षम्य आहे. असा विचार मांडण्यात आला. परंतु या मतास सर्वमान्यता नव्हती. अशाप्रकारे वरील मांडणीचा विचार करता धर्म आणि राजकीय संस्था यांचा परस्पर संबंध स्पष्ट होतो. अहिल्याबाई होळकरांनी धर्माचे पालन करत राज्यातील जनतेसाठी अनेक कल्याणकारी कार्य केले. या अर्थाने अहिल्याबाईंच्या धार्मिक कार्याचे चिकित्सक वृत्तीने विश्लेषण या प्रकरणात केले आहे.

१८ व्या शतकातील समाजात धर्म, परंपरा, विविध जाती, उपजाती यांचे अंत:संबंध, वतनसंस्था हे प्रमुख घटक होते. धर्म हा समाजाचा केवळ महत्त्वाचा घटक नसून नियंत्रक होता. १८ व्या शतकात धर्माच्या अनुसंधानाने रुढी, परंपरा, श्रद्धा, आचार, विचार यांचा प्रभाव समाज मनावर होता. धर्म हा तीन पातळ्यावर कार्यान्वित असतो. पहिला म्हणजे तत्त्वज्ञानाच्या पातळीवर दुसरा संस्थात्मक पातळीवर आणि तिसरा म्हणजे प्रत्यक्ष आचरणाच्या पातळीवर . जनसामान्य संस्थात्मक आणि आचरण पातळीअधिक संलग्न असतात. उपासना, मूर्तीपूजा, तीर्थयात्रा या सर्वांना धर्मात महत्त्व आहे. त्यामुळे मंदिरे, तीर्थक्षेत्रे ही सामाजिक जीवनात महत्त्वाची भूमिका बजावतात. मंदिरे ही केवळ देवांचे निवासस्थान नसून समाजातील व्यक्ती घटना ह्या त्याच्याशी निगडीत असतात. मंदिरात होणारे सण, समारंभ, उत्सव यांच्या निमित्ताने यात्रा व जत्रा भरतात. सणाच्या यात्रेच्या, उत्सवाच्या, जत्रेच्या निमित्ताने विविध सामाजिक घटक एकत्र येतात. त्यामुळेच व्यक्तीच्या सामाजिकरणात सण, यात्रा, उत्सव जत्रा यांना महत्वाचे स्थान आहे. यात्रेच्या तसेच जत्रेच्या निमित्ताने जात, पंचायतीच्या सभा भरवल्या जात असत. बाजार भरवला जात असे. अनेकविध व्यापारी बाजारामध्ये येत असत. वस्तूंची उपलब्धता नियमित होत असे त्यामुळे आर्थिक व्यवहार मोठ्या प्रमाणात होत असे.

मंदिर हा इतिहासाचा एक स्त्रोत असतो. अनेक ऐतिहासिक व्यक्ती, घटना त्या वस्तूशी निगडीत असतात. म्हणून मंदिरे ही ऐतिहासिक साधन म्हणून जशी महत्त्वाची

असतात त्याप्रमाणेच समाज जीवनाच्या अभ्यासामधील एक महत्त्वाचा अभ्यास घटक म्हणूनही महत्त्वाची असतात. धर्म आणि राज्य यांचा जवळचा संबंध असतो व तो विविध पातळ्यांवर येतो. राज्य संस्था आपल्या सत्तेला कायदेशीरपणा प्राप्त करण्यासाठी धर्म संस्थांचा वापर करते. धार्मिक संस्थांमार्फत राजकीय सत्तेव्यरिक्त सामाजिक, सांस्कृतिक अधिसत्तेत वाढ करण्यासाठी संस्कृती, धर्म यांचा वापर राज्यसंस्था करीत असते. मंदिर, तीर्थक्षेत्रे ही त्याला अपवाद ठरू नयेत. १८ व्या शतकात पेशव्यांनी अनेक मंदिरे बांधली आणि अनेक मंदिरांचा जीर्णोद्धार केला. शाहू महाराज, बाळाजी विश्वनाथ, पहिले बाजीराव, चिमणाजी अप्पा, नानासाहेब पेशवा यांच्यापासून नाना फडणीस या सर्वांनी महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर अनेक मंदिरे बांधली याला अहिल्याबाई होळकर ही अपवाद नव्हत्या. संपूर्ण भारत हे त्यांच्या धर्मकारणाचे क्षेत्र होते. राज्यकारभार करणे भोग नसून एक योग आहे. साधन आहे हे कारभार व्यवस्थेचे मुळसूत्र आत्मसात करून त्यांनी कृतीत उतरविले. धर्म व राजकारण एकत्र चालवून राजकीय व्यवस्थेला पावित्र्य प्राप्त करून दिले. मल्हारराव होळकरांची सून म्हणून त्यांना मोठेपणा मिळाला परंतु स्वकर्तृत्वावर त्यांनी तो वाढविला. अहिल्याबाईंनी फक्त हिंदूचीच मंदिरे बांधली असे नाही तर मुसलमानांच्या देवस्थानांचीही बांधकामे केली. तत्कालीन अशांततेचे वातावरण असतानाही सांप्रदायिक एकात्मता प्रस्थापित केली म्हणून निजाम, टिपू, मोगल सम्राट त्यांना मानीत. काळाच्या ओघात अनेक सम्राट निर्माण झाले. त्यांनी मोठमोठी साम्राज्ये निर्माण केली आणि ती लयासही गेली. होळकरांचे राज्यही नष्ट झाले. परंतु अहिल्याबाईनी निर्माण केलेले धार्मिक स्वरूपाचे राज्य मात्र त्यांनी निर्माण केलेल्या प्रतिकांच्या रूपाने आजही भारतात अस्तित्वात आहे. त्यांनी सर्व धर्मियांसाठी मंदिरे बांधली, अनेक गरीब, अपंग, आश्रीतांना दानधर्म केला. नुसता धार्मिक विचार न मांडता खरा धर्म कृतीतून समाजापुढे मांडला. हा सर्व खर्च

त्यांनी त्यांच्या खाजगी पैशातून केला. या त्यांच्या धार्मिक कार्यातील विविध पैलूंची ओळख प्रस्तुत प्रकरणात करुन घ्यावयाची आहे.

**धर्माची संकल्पना :**

मानवी मनावर हजारो वर्षापासून धर्माचे स्थान असून धर्माने मानवी मनावर प्राचीन काळापासून अमर्याद स्वामित्व गाजविले आहे. मानवी मन भावनाशील असल्यामुळे सातत्याने चांगले आणि वाईट याबद्दल निर्णय घेताना धर्म काय म्हणेल? याबद्दल मन सतत जागृत असते. प्राचीन संस्कृतीवर धर्माचा प्रभाव अधिक होता आणि आजही प्रगल्भ स्थितीत पोहचलेल्या समाजात व राष्ट्रात धर्मरहित राष्ट्र अथवा समाज आढळून येत नाही. आजही जगातील पातळीवर धर्मयुद्धे चालू आहेत. जगामध्ये इस्लाम, ख्रिश्चन धर्म वाढविण्यासाठी अमेरिकेसारखी व अरब राष्ट्रे प्रयत्न करीत आहेत. यातूनच जागतिक पातळीवर मोठ्या दहशतवादी संघटना निर्माण झालेल्या दिसून येतात. ह्या गोष्टीला भारत ही अपवाद नाही. प्राचीन काळात भारतात आर्यांनी समाजाची स्थिती स्थिर राखण्यासाठी चातुवर्ण संस्था, आश्रम, कर्तव्य, विचार, संस्था, धर्मदाय इत्यादी गोष्ट निर्धारित केल्या. ह्या सर्व गोष्टींना एकत्रितरित्या धर्म, सनातन धर्म अथवा वैदीक धर्म असे म्हणता येईल. या धर्माचा उगम जवळपास १२ हजार वर्षापूर्वीचा आहे. धर्म हा सदृश्य नसून तो प्राचीन परंपरा रूढी यांच्यावर आधारित सांकेतीक स्वरूपाचा आहे.

महोपाध्याय डॉ. काणे यांनी आपल्या धर्मशास्त्राचा इतिहास या ग्रंथात धर्मासंबंधी पुढीलप्रमाणे मत व्यक्त केले आहे. ''धर्मशास्त्रकारांच्या मताप्रमाणे धर्म या शब्दाची व्याप्ती एक उपासनेचा पंथ एवढीच नसून त्या शब्दात प्रत्येक मनुष्याने व्यक्ती या नात्याने व्यक्तीचा विकास करण्याकरिता आणि समाजाचा घटक या नात्याने मानवी समाजाचा विकास करण्याकरिता करावयाच्या कृत्याचा आणि पाळावयाच्या निर्बंधाचा समावेश होतो.''[४] यावरून असे स्पष्ट होते की, धर्माची संकल्पना ही केवळ व्यक्तीत्व विकास आणि

समाजाच्या विकासासाठी उदयाला आली होती. 'हिंदू लोकांच्या धार्मिक कृत्यांचा हेतू, वेद, स्मृती आणि पुराणे ह्यांनी सांगितलेले फळे प्राप्त करून घेणे हा असतो. ही गोष्ट प्रत्येक विधीच्या आरंभी करण्यात येणाऱ्या श्रुती, स्मृती पुराणोक्त, फल, प्रातयर्थ ह्या संकल्पनावरून दिसून येते.'[५]

या सर्व गोष्टींचा आढावा घेता एक गोष्ट लक्षात येते की व्यक्ती व समाजाच्या विकासासाठी धर्म सहाय्यता करणारा एक घटक आहे आणि म्हणून मानवी मनावर आजही त्याचे अनभिषिक्त साम्राज्य आहे.

**धर्माची आधार स्थाने :**

धर्माला प्राचीन काळापासून काही आधार स्थाने आहेत. महोपाध्याय डॉ. काणे यांनी आपल्या धर्मशास्त्राचा इतिहास या ग्रंथात पुढीलप्रमाणे धर्माची आधारस्थाने सांगितली आहेत. 'धर्माचा सर्वश्रेष्ठ आधार संपूर्ण वेद होय, त्याच्या खालोखाल ज्यांना वेदांचे ज्ञान आहे अशा लोकांची परंपरा आणि आचार हे धर्माचे आधार असतात, त्यानंतर सदाचार संपन्न लोकांची रूढी ही धर्माचा आधार असतो, वेद, स्मृती, सदाचार स्वत:ला इष्ट वाटणारे आचरण आणि पूर्ण विचारांनी उत्पन्न होणारी कामना ह्या गोष्टी धर्माचा आधारस्थाने असल्याने परंपरेने मानण्यात येते.'[६] प्राचीन काळी आर्यांची मोठमोठी राज्ये उदयाला आली आणि राज्यविस्तारा बरोबर त्यांची सांपत्तीक स्थिती सुधारल्यामुळे धर्माचे स्वरूप समारंभाचे बनले. परंतु पुराणकाळात आर्यांचे यज्ञ मागे पडून निरनिराळे भक्ती संप्रदाय उदयास आले. असे असले तरी या सांप्रदायात शैव आणि आणि वैष्णव हे संप्रदाय महत्त्वाचे होते. वैदिक पूर्व काळापासून भरभराटीस असलेल्या शैव संप्रदायाला उतरती कळा लागली होती. १२ व्या शतकात सवेश्वराने या संप्रदायाचे पुनरुज्जीवन करून त्याला नवचैतन्य प्राप्त करून दिले होते. या संप्रदायाला वर्णाश्रम परंपरांचा असलेला अडसर बसवेश्वराने दूर करून स्त्रिया व शुद्र या सर्वांना या संप्रदायात प्रवेश मिळवून दिला होता.

मराठा कालखंडातही शैव संप्रदायाचा फार मोठ्या प्रमाणावर विकास झाला होता. अनेक राज्यकर्ते शिवभक्त असून अहिल्याबाई होळकर शैव संप्रदायाच्या होत्या.

## अहिल्याबाई होळकरांवर धार्मिक विचारांचा प्रभाव :

अहिल्याबाई होळकरांवर लहानपणापासूनच धार्मिक संस्काराचा प्रभाव पडला. लहानपणी त्या आईबरोबर पुराण श्रवणास नित्यनेमाने बसत असत. तत्कालीन कालखंडात समाजव्यवस्थेवर धर्माचा मोठा प्रभाव होता. हिंदु-मुस्लिमात होणारी लढाई मुसलमानांनी हिंदूवर केलेले अन्याय, अत्याचार यामुळे हिंदू धर्मीय लोक धार्मिक कृत्याकडे मोठ्या प्रमाणात वळले. तत्कालीन अनेक राज्यांनी मंदीरे, कुंड, अनेक हिंदू पंडितांना दान देणे, धार्मिक तिर्थ यात्रा करणे, यात्रेकरूंना सहकार्य करणे, दान देणे, ब्राह्मण भोजणे इत्यादी धार्मिक कृत्य चालू होती. प्रत्येक गावपातळीवर प्रबोधनाचा व शिक्षणाचा अभाव यामुळे पोथी, पुराण, सप्ताह, भजने इ. अनेक सण, उत्सवातून धार्मिक प्रबोधन होत असे या सर्व व्यवस्थेचा प्रभाव तत्कालीन समाज व्यवस्थेवर पडला. अहिल्याबाई होळकरही त्याला अपवाद नव्हत्या. त्यांच्या लहानपणी गावात पोथी, पुराण, अनेक धार्मिक विधी यांचा प्रभाव त्यांच्यावरती पडला. १८ व्या शतकात पेशव्यांच्या काळात धर्माचे स्तोम मोठ्या प्रमाणात वाढले होते. अनेक धार्मिक कार्याला महत्त्व होते. होळकर, शिंदे, गायकवाड, पवार हे तर पेशव्यांचे सुभेदार होते. त्यामुळे त्या व्यवस्थेचा प्रभाव त्यांच्या सुभेदारावर पडला होता.

अहिल्याबाई लग्न होऊन होळकरांच्या कुटुंबात आल्यावर त्यांचे पती खंडेरावाचा झालेला मृत्यु, स्वतःच्या मुलाचा झालेला मृत्यु, सासरे मल्हारराव व सासू गौतमाबाईचा मृत्यू होळकर कुटुंबातील वीस स्त्रीया सती जाताना त्यांनी पाहिल्या अशी अनेक गृहसंकटे त्यांच्यावर आली त्यामुळे मानसिकदृष्ट्या त्या धार्मिक कार्याकडे वळल्या त्यातून त्यांनी लोकांच्या कल्याणासाठी अनेक धार्मिक कार्य केले असे संशोधनातून दिसून येते. सुभेदार

मल्हारराव होळकरांच्या मृत्युनंतर १६ कोटी रुपये खासगीची शिल्लक पूर्णपणे अहिल्याबाईच्या मालकीची होती. या शिल्लकीवर आणि खासगी जहागिरीच्या उत्पन्नावर 'अहिल्याबाईनी हातात पाणी घेऊन त्यात तुळशीची पाने टाकून व ब्राह्मणांकडून मंत्र म्हणवून हे द्रव्ये दानधर्मासाठी खर्च केले जाईल असा संकल्प सोडून त्या द्रव्यांवर तुळशीपत्रे ठेवले."[७] त्यानुसार अनेक लोकोपयोगी कार्य केले यात प्रामुख्याने मंदिरे बांधणे, तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी लोकांच्या सोयीसाठी अन्नछत्र चालवणे, अनेक धार्मिक विद्वानांना आश्रय देणे, मंदिरांचा जीर्णोद्धार, गरीब जनतेला दान-धर्म करणे इत्यादी धर्माला अनुसरून लोककल्याणकारी कार्य त्यांनी केले. ही कामे अखंडपणे चालू रहावीत म्हणून अहिल्याबाईंनी स्थानिक व्यवस्थापक नेमून त्यांना खर्चाची स्वतंत्र व्यवस्था करून दिली. अशाप्रकारे अहिल्याबाईंवर धार्मिक विचारांचा प्रभाव पडला.

## अहिल्याबाई होळकरांची दिनचर्या :

अहिल्याबाई यांची दिवसाची दिनचर्या ठरलेली असे. त्यात त्या बदल करीत नसत. असे उपलब्ध कागदपत्रावरून आणि ग्रंथातील माहितीवरून दिसून येते. यासंबंधी सर जॉन माल्कम यांनी दि मेमॉयर ऑफ सेंट्रल इंडिया या आपल्या ग्रंथात अहिल्याबाई यांची दिनचर्या दिलेली आहे ती पुढीलप्रमाणे 'अहिल्याबाई दररोज सुर्योदयापूर्वी एक तास उठून स्नानादि पूजा अर्चा करीत असत नंतर ठराविक कालापर्यंत पुराणश्रवण करीत यानंतर दानधर्म करीत व आपल्या समक्ष ब्राह्मणांस भोजन घालीत. हे सर्व झाल्यावर अहिल्याबाई स्वतः भोजन घेत. त्यांच्या भोजनात सर्व पदार्थ शाहाकारी असत. मांस खाणे त्यांच्या जातीत मान्य असले तरी, त्यांनी मांसाहार वर्ज्य केला होता. भोजन आटोपल्यावर पोषाख करून दोन वाजण्याच्या सुमारास अहिल्याबाई दरबारात येत. दरबाराचे कामकाज संध्याकाळच्या सहावाजेपर्यंत चाले. यानंतर दोन-तीन तास पुजा-अर्चा व फराळ करण्यात घालवून सरासरी नऊ वाजण्याच्या सुमारास अहिल्याबाई पुन्हा राज्यकारभार विषयक कामकाज पहात हा क्रम

रात्रीच्या अकरा वाजेपर्यंत चाले. यापुढे त्या विश्रांती घेत. याप्रमाणे भोजन, पूजन, मिताहार व परिश्रम यात जाणाऱ्या आयुष्य कृत्यांत निराहार उपवासाचे दिवस, सणावाराचे दिवस व निकडीच्या सरकारी कामकाजाचे दिवस या खेरीज अंतर होत नसे."[८] अशाप्रकारे अहिल्याबाई होळकर यांची दिनचर्या असे.

**अहिल्याबाई होळकरांच्यावर धार्मिक ग्रंथाचा प्रभाव :**

प्राचीन काळात राजे, संस्थानिक आपल्या संस्थानात एखाद्या कुशल मंत्र्याप्रमाणे पुराणिकांची नेमणूक करीत असत. सम्राट अशोक व हर्षवर्धन या राजांना उपगुप्तादी सारखे उपाध्यय लाभल्यामुळे त्यांना राज्यकारभाराचे उपयुक्त ज्ञान मिळाले. त्याचप्रमाणे राज्यघराण्यातील स्त्रियांना पुराण वाचून दाखविण्यासाठी एका पुराणीकाची नेमणूक केली जात असे. अहिल्याबाई होळकरांच्या पदरी देखील अंबादास पुराणिक नावाचा व्यक्ती होता. तो त्यांना पुराण वाचून दाखवी तसेच धार्मिक बाबतीतील विचार आचार त्यांना सांगे.

तत्कालीन कालखंडात मानवी जीवनांत धर्म व त्यांचे आदेश समजावून घेण्याचे साधन म्हणजे धर्मग्रंथ होत अहिल्याबाई होळकरांनी त्यांच्या जीवनात धर्म व आचाराची सांगड घातली. त्यासाठी त्यांना त्या विचाराची जोड त्यांना धर्मग्रंथातून मिळाली. त्यांच्याकडे मोठ्या प्रमाणात धार्मिक ग्रंथ संग्रह होता. भगवतगीता, रामायण, महाभारत यातून त्यांना धर्माचे ज्ञान मिळाले याचा सविस्तर उल्लेख अहिल्याबाई होळकर यांच्याकडील हस्तलिखित ग्रंथातून त्यांना प्राचीन मंदिराचा जीर्णोद्धार करणे. पवित्र तीर्थक्षेत्री, नवीन देवालय बांधण्याची धार्मिक प्रेरणा मिळाली. त्यावेळेच्या राज्याचे कार्य व आदर्श यातूनच त्यांना लोककल्याणकारी कार्याचा आदर्श मिळाला अशा प्रकारे त्यांना धार्मिक ग्रंथ संपदा त्यांना मार्गदर्शक ठरली असे संशोधनातून स्पष्ट होते.

## अहिल्याबाई होळकरांनी धार्मिक उत्सवाना केलेले सहकार्य :

तत्कालीन कालखंडात मोठ्या प्रमाणात तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी धार्मिक सण, उत्सव साजरे होत. त्यांनी हिंदू व मुस्लिम असा भेदभाव न करता त्यांनी आर्थिक सहकार्य केले. महेश्वर येथे निरनिराळ्या सणांच्या दिवशी पर्वणीच्या वेळी अहिल्याबाई निरनिराळ्या देवतांचे उत्सव साजरे करीत. याचे कारण की त्यातून लोकांचे धार्मिक प्रबोधन होत असे. अनेक जाती धर्माचे लोक एकत्र येत असत. अनेक कलाकारांच्या कला गुणांना या उत्सवातून वाव मिळत. त्यातून राज्यांची आर्थिक देवाण-घेवाण होत असे. अहिल्याबाईनी उत्सवाना दिलेली आर्थिक मदत पुढीलप्रमाणे '५००० गोकुळ अष्टमी व राखी, १५०० गोवर्धन उत्सवाबद्दल दक्षणा, ५०० आषाढ कार्तीकीचे उत्सवाबद्दल, ५००० वसंतपूजा वैशाखी पौर्णिमेस, ३०० रुपये संक्राती ७२०० नित्य सोमवार, ७०० भागवत सप्ताह, ६०० ग्रहणाबाबत दक्षिणा, ३००० नागपंचमीबाबत, ४०० तुळशीविवाह बाबत, १०० श्री शिवरात्री, रामनवमी''[१]

अशाप्रकारे कृष्णजन्माष्टमी अहिल्याबाई व्रत करून त्यांची सांगता करताना हिंदू धर्मपंडितांना दक्षिणा देत गरिबांना दानधर्म करीत. याशिवाय नागपंचमी, वसंतपंचमी, गोकुळ अष्टमी, गोवर्धन उत्सव, आषाढी, कार्तिकी, महाशिवरात्र उत्सव, भागवत सप्ताह, या सर्व उत्सवाची वर्षभराणी दक्षिणा सामान्यत: २५ हजार रुपये वाटली जात असे उल्लेख ग्रंथातून मिळतात. नाशिक जिल्ह्यातील चांदवड हे होळकरांचे जहागिरीचे ठिकाण. या ठिकाणी त्यांचा मोठा वाडा आहे. चांदवड येथे अहिल्याबाईंच्या काळात रेणुका देवीचा नवरात्र उत्सव नऊ दिवस साजरा केला जात होता. आजही तो साजरा केला जातो. ज्याप्रमाणे अहिल्याबाई हिंदूचे सण उत्सव साजरे करत त्याप्रमाणे मुस्लिम धर्माचे सन उत्सव साजरे केल्याचे उल्लेख आहेत. 'चांदवड येथे जानेवारी महिन्यात नानावली बाबा या दर्ग्याचा उरूस भरतो. या उरूसाची सुरूवात रंगमहालापासून होते. नानावली बाबाच्या

दर्ग्यावरील नवे कपडे पूजेचे साहित्य अहिल्याबाई असताना त्यांच्याकडून येत असत. रंगमहालातून नानावली बाबाच्या दर्ग्यापर्यंत एक भुयार असून अहिल्याबाई चांदवड येथे आल्या म्हणजे या भुयारी मार्गाने नानावली बाबाच्या दर्शनाला जात होत्या."[१०] अशा प्रकारे अहिल्याबाई खऱ्या धर्माचे पालन करीत असत.

याशिवाय मध्यप्रदेशातील ज्योतिर्लिंग ओंकारेश्वर येथे दरवर्षी शिवरात्रीस ध्वजोत्सव साजरा केला जात असे या उत्सवाला अहिल्याबाई स्वत: जात हा उल्लेख पुढीलप्रमाणे 'अहिल्याबाई शिवरात्रीस ओंकारेश्वरास यात्रेस जाणार आहेत तेथे ध्वजोत्सव करणार तेथून उज्जनीस श्रीमहाकालाच्या दर्शनास जावे अशी वंदना आहे."[११] यावेळी ओंकारेश्वरास आलेल्या गरीब लोकांना वस्त्रे वाटली जात. दरवर्षी या उत्सवाला अहिल्याबाईंना स्वत: हजर रहाता आले नाही तर त्या ओंकारेश्वर येथील आपले उपाध्य सदाशिव भट यांचे बरोबर ध्वजोत्सवाचा सरंजाम रवाना करीत व त्यांच्यामार्फत आपला संकल्प पूर्ण करीत. इ. स. १७८३ साली त्यांनी त्यांना या ध्वजोत्सवासाठी जाता आले नव्हते म्हणून त्यांनी सदाशिव भट या आपल्या उपाध्यांना ध्वजोत्सवाचे सामान घेवून रवाना केले. अशाप्रकारे अनेक देवतांचे उत्सव अहिल्याबाईनी साजरे केले होते. या उत्सवांना त्या स्वत: हजर रहात आणि जर त्यांना स्वत: हजर रहाता आले नाही तर आपले उपाध्ये पाठवित. उत्सवाला लागणारा खर्च स्वत: करीत असत.

**विविध महिन्यातील दानधर्म :**

हिंदूधर्मात प्राचीन काळापासून दान करण्याची प्रथा अस्तित्वात आहे. धर्माचे तीन स्कंद असून दान हा पहिला स्कंद असल्याचे वर्णन उपनिषदात आढळते. कोणत्याही महत्त्वाच्या कृत्यात काही तरी दान करावे असा आदेश धर्मशास्त्राचा आहे. 'एखाद्या वस्तूवरील स्वत:चे स्वामित्व नष्ट करून तिच्यावर दुसऱ्या कोणाचे स्वामित्व निर्माण करणे ह्याला दान असे म्हणतात आणि अशी वस्तू स्विकारणे ह्याला प्रतिग्रह असे म्हणतात"[१२]

महाभारत, अग्नीपुराण, मत्सपुराण, इत्यादी प्राचीन ग्रंथात दानासंबंधी विस्तृत स्वरूपाची माहिती आपणास पहावयास मिळते. सर्व स्मृतींनी स्त्रीया व शुद्र या सर्वांना दान देण्याचा हक्क प्रदान केलेला आहे. स्वत: मिळविलेल्या संपत्तीचे दान देणाऱ्या व्यक्तीची स्मृतीकारांनी खूप प्रशंसा केलेली आहे.

कर्म पुराणात दानाचे पुढील चार प्रकार आहेत. 'नित्य, नैमित्रिक व काम्य असे त्रिविध दान सांगितले आहे. चौथे दान त्याला विमलदान असे म्हणतात''[१३] कोणत्याही फलाचा उद्देश मनात न धरता प्रत्येक दिवशी जे थोडे बहुत दान दिले जाते ते नित्यदान होय. पापनाश, प्रायश्चित या उद्देशाने ग्रहणादी पर्वकाळात जे दान दिले जाते त्याला नैमितीक दान असे म्हणतात. संतती विजय मिळावा, ऐश्वर्य प्राप्त व्हावे इत्यादी फलांची प्राप्ती व्हावी म्हणून ज्या कामनेने दान दिले जाते ते विमलदान होय. सर्व दानात विमलदान सर्वश्रेष्ठ असे दान होय.

अशा प्रकारे तत्कालीन कालखंडात दानाविषयी विविध प्रथा होत्या. ज्याच्याकडे मोठ्या प्रमाणात धनसंपत्ती आहे. उदा. राजे, संस्थानिक, जमिनदार, वतनदार हे लोक विविध सण, समारंभ, घरातील एखादी व्यक्ती आजारी असली किंवा एखाद्या आनंदाच्या क्षणी मोठ्या प्रमाणात गरीब जनतेला विद्वानाला दानधर्म करीत असत. आजही अनेक धर्मात ही प्रथा अस्तित्वात आहे.

### १) श्रावण महिन्यातील दानधर्म :

मराठा कालखंडात शिवाजी महाराज स्वत: श्रावण महिन्यात विद्वान लोकांना दक्षिणा वाटत असत. त्यांच्या मृत्युनंतर दक्षिणा वाटपाचे काम त्यांचा सेनापती खंडेराव दाभाडे यांच्याकडे आले. खंडेराव दाभाडे यांच्या मृत्यूनंतर दक्षिणा वाटण्याचे काम त्यांचा पुत्र त्रिंबकराव दाभाडे यांच्याकडे आले. त्रिंबकराव मरण पावल्यावर थोरले बाजीराव पेशवे यांनी दक्षिणा वाटपाचे काम आपल्याकडे घेतले आणि तेव्हापासून पुण्यास विद्वान ब्राह्मणांना

दक्षिणा दिली जात होती. पेशव्यांची श्रावणमास दक्षिणा संपूर्ण हिंदूस्थानात प्रसिद्ध होती. दक्षिणा घेण्यासाठी दूरदूरच्या प्रांतातून विद्वान ब्राह्मण पुण्यास येत. पेशव्याकडे दक्षिणा वाटण्याचे काम शेवटपर्यंत होते. श्रावण महिना हा चातुर्मासातील श्रेष्ठ असा महिना मानला जातो. या महिन्यात गोरगरिबांना अन्नदान व ब्राह्मणांना दक्षिणा वाटण्याची प्रथा होती. पेशवे कालखंडात ती मोठ्या प्रमाणात वाढली. पेशव्याप्रमाणेच त्यांचे सरदारही मोठ्या प्रमाणात या महिन्यात दानधर्म करीत असे.

इ. स. १७८३ साली महेश्वर येथे देशस्थ व रांगडे ब्राह्मण, तैलंग ब्राह्मण दक्षिणा घेण्यासाठी आलेले होते. अशा प्रकारचे उल्लेख ग्रंथातून मिळतात. ब्राह्मणाबरोबर राज्यातील जी गरीब जनता आहे त्यांनाही मोठ्या प्रमाणात अन्नदान केले जात असे.

## २) भाद्रपद, कार्तिक, मार्गशिर्ष या महिन्यातील दानधर्म :

श्रावण महिन्याप्रमाणेच भाद्रपद महिन्यात भागवत सप्ताह सुरू केला होता. त्यात पारायणे वाचण्याचा कार्यक्रम असे. तत्कालीन कालखंडात लोकप्रबोधनाची साधने नव्हती, शिक्षणसंस्था नव्हत्या त्यामुळे अशा प्रकारच्या धार्मिक कार्यक्रमातून लोकांना अनेक चांगल्या ग्रंथांचे व धर्मशास्त्रातील चांगल्या गोष्टीचे प्रबोधन केले जात. अहिल्याबाईंची राजधानी महेश्वर येथे दरवर्षी भाद्रपद महिन्यात भागवत सप्ताह आयोजित करून लोकांना विद्वान पंडिता मार्फत प्रबोधन केले जात असे अशाप्रकारे कार्तिक मार्गशिर्ष या महिन्यात वेगवेगळ्या सन उत्सवाच्या निमित्ताने अहिल्याबाई दानधर्म, दक्षिणा, अन्नदान इत्यादी धार्मिक कार्य पार पाडीत असत.

## ३) ग्रहणकाळात केलेला दानधर्म :

प्राचीन काळाप्रमाणेच मराठा कालखंडातही ग्रहणाच्या दिवशी पेशवे आणि त्यांचे सरदार मोठ्या प्रमाणात दान देत असे. ग्रहण हे मोठे अरिष्ठ मानले जात होते. ग्रहणाच्या वेळी सामान्य लोकही यथाशक्तीप्रमाणे दानधर्म करीत असत. तत्कालीन कालखंडात

विज्ञानाचा शोध नसल्यामुळे अनेक प्रथा परंपरेला अनुसरून लोक दानधर्म करीत असत. ग्रहणानंतर अनेक श्रीमंत लोक स्वत:ची तुला करून ग्रहांचा दोष नाहीसा करण्यासाठी तुला केलेले धन दान करीत. दानधर्म केल्याने चंद्रसूर्य या देवाचीही ग्रहपिडा नष्ट होते अशा प्रकारची प्रथा आहे. आजही भारतात विज्ञानाने प्रगती करूनसुद्धा मोठ्या प्रमाणात ग्रहण काळात अनेक अंधश्रद्धा पाळतात लोकांच्या मनावर अजूनही प्रथा परंपरेचा पगडा आहे. अहिल्याबाई होळकरांनी ग्रहणकाळात तुला केल्याचे उल्लेख आहेत. 'श्री सूर्यग्रहणास एक लक्ष रूपयांचा संकल्प करून हत्तीदान दिला. ३५ तुला केल्या. एक तुला मुख्य सुवर्ण व रुपये १६ हजार आपण व नातवास घेऊन तुला केली याप्रमाणे दानधर्म केला.''[१४]

अशाप्रकारे १४ जानेवारी १७८४ रोजी सुर्यग्रहणांच्या निमित्ताने अहिल्याबाई होळकरांनी एक लक्ष रुपयाचा संकल्प करून हत्ती दान दिला. स्वत:च्या एकूण ३५ तुला केल्या. सात मुख्य तुला सुवर्णाची होती दुसरी तुला १६ हजार रुपयांची व इतर तुला धान्य, गुळ, मीठ या स्वरूपात होत्या. यावेळी अनेक यात्रा आलेल्या होत्या त्या यात्रेकरूंना यातून भोजन दिले व यात्रेकरूंना दानधर्म केला. अशाप्रकारे अहिल्याबाई यातून कोणी उपाशी राहू नये हा उद्देश साधला. दानधर्माच्या विशाल छत्राखाली अनाथ, अपंग, गरीबांना आश्रय मिळाला.

### ४) अहिल्याबाईनी प्राण्यांसाठी केलेला दानधर्म :

अहिल्याबाई धार्मिक होत्या परंतु धर्मांध नव्हत्या. तत्कालीन कालखंडात मोठ्या प्रमाणात समाजात हिंदू-मुस्लिम द्वेष होता. मुसलमानांनी त्यांच्या अगोदरच्या कालखंडात हिंदूवर मोठ्या प्रमाणात अत्याचार केले होते. त्यामुळे हिंदू लोक मुस्लिमांचा द्वेष करीत. तरीही अहिल्याबाईनी हिंदू-मुस्लिम असा व्देष न करता सर्वांना समान स्थान दिले. ज्याप्रमाणे त्या हिंदू पंडितांना दानधर्म करीत त्याप्रमाणे त्या मुस्लिम मौलवांनाही दानधर्म करीत असत. एवढ्यावरती त्या न थांबता त्यांनी ज्याप्रमाणे मानव सुखी व्हावा हे पाहिले

त्याचप्रमाणे जनावरे, जंगलातील पशुपक्षी, नदीतील मासे यांच्यासाठी दानधर्म केल्याचे उल्लेख आहेत.

'गाई, गुरे, मुक्या प्राण्यांसाठी चारा वैरणीची व्यवस्था केली. गाईसाठी जमिनी लावून दिल्या पंढरपूर नजीक त्या बोहाळी या खेडेगावी या संदर्भात देवस्थानच्या जमीन आहेत.'[१५] गायींसाठी अनेक कुरणे अहिल्याबाई राखून ठेवित असत सरकारी खर्चानी गाय, वासरांचा, वैरणीचा खर्च भागविला जात असे. जनावरे जंगलात चरण्यासाठी जातात म्हणून त्यांच्या पिण्याच्या पाण्याच्या सोयीसाठी जंगलात अनेक ठिकाणी अहिल्याबाईने कुंडे व तळी बांधली होती. 'केवळ गरीब प्रजाच नव्हे तर पशु, स्थलचर, जलचर, प्राणीही तीने लेकरासारखे पोसले होते. रोज गोसेवा केल्याखेरीज ती अन्नग्रहण करीत नसे. तिने गायीगुरांसाठी कुरणे राखून दिली यात नवल नाही पण उभ्या पिकावर येणाऱ्या पाखरांच्या धाडी हाकण्यासाठी होणारा गोफण-गुंड्याचा प्रकार पाहून तिने सुगीच्या दिवसात अंतरा-अंतराने पिकल्या शेतांचा एक वाटा पाखरांसाठी राखून ठेवण्यासाठी नेमणुका दिल्या.'[१६]

अशा प्रकारे अहिल्याबाईची दानधर्माची कल्पना धर्मभोळी नव्हती तर त्या खरा धर्म आचरणात आणित असत. अहिल्याबाईंच्या भुतदये संदर्भात माल्कमने आपले मत नोंदविले आहे. ते विचारात घेण्यासारखे आहे. 'हा विश्वकौटुंबिक कळवळा पाहून आपणाला हसू येईल आणि तिने आपल्या संपत्तीचा मुख्य भाग ब्राह्मणास दानधर्मात दिला हे तिचे धर्मवेड पाहून आणि दूरदूरच्या देशी इमारती बांधण्यात व त्यांचे उत्पन्न चालविण्यात तिने आपला खजीना खाली केला हे पाहून आपणास तिला दोष द्यावसा वाटेल अशा प्रकारचे भाषण माल्कमने एका ब्राह्मणाशी केले. त्यावेळी त्या विद्वान मनुष्याने मला उलट रास्त सवाल केला की, अहिल्याबाईने दानधर्मात व संत्कृत्यात जो पैसा खर्च केला, त्याच्या दुप्पट पैसा जर सैन्य वाढविण्यात खर्च करती तर आज तीस वर्षे तिचा देश शांततेचा जो अनुभव घेत आहे व जे सुख उपभोगीत आहे, ते तिच्या प्रजेस मिळाले असते काय? व ती आज जी

पुण्यनिय वाटत आहे ती तशी वाटली असती काय? तिच्या धार्मिकपणाबद्दल कोणीही संशय प्रकट करीत नाही पण दानधर्माऐवजी तिच्यात नुसताच व्यवहारातला शहाणपणा असता तर तिला आपला उद्देश इतक्या विलक्षणारितीने सिद्धीस न्यावयाचा दुसरा मार्ग सापडला नसता. मी तिच्या कारकिर्दीच्या उत्तर भागात शेवटली काही वर्षे पुण्यात मोठ्या हुद्याच्या जागी होतो. तेथे तिचा नुसता नामोच्चार केला असता लोकांचे अंत:करण किती उचंबळून येत असे ते माझ्या अगदी डोळ्यापुढे आहे. तो सारा भाग मी चांगल्या रितीने जाणतो तिच्याशी वैर करणे अथवा परराष्ट्राकडून तिच्यावर स्वारी होण्याचा प्रसंग आला असता तिला सहाय्य न करणे, ह्या ज्या गोष्टी आहेत त्या आमच्या राजेरजवाड्यात देवता भूषण केल्यासारखा पापकारक समजतात अशाच प्रकारचा आदरभाव सर्व लोकांना होता"[१७]

अशा प्रकारे त्यांना दक्षिणेचा निजाम व टिपू पेशव्याप्रमाणे मान देत. त्यांच्या सहकार्यासाठी हिंदू-बरोबर मुसलमानही लोक सामील होत असे. अशा प्रकारचे विचार विविध ग्रंथात व्यक्त केले आहेत. या विचारावरुन अहिल्याबाईनी केलेल्या प्रामाणिक कार्यामुळे त्यांच्याबद्दल लोकात किती आदर होता हे स्पष्ट होते.

**कोटीलिंर्गाचेन उपासना प्रकार :**

प्राचीन कालखंडात हिंदू धर्मात अनेक प्रथा परंपरा चालत आल्या आहेत. आजही अनेक वेळा दुष्काळ, पूर किंवा राज्यावर अनेक नैसर्गिक आपत्ती आली असता राज्यात शांतता लाभावी म्हणून वेगवेगळ्या देवाची उपासना केली जाते. देवाला अभिषेक घातला जातो महापूजा केली जाते. २१ व्या शतकात विज्ञानवादी युगातही अशा प्रकारच्या प्रथा चालू आहेत. १८ व्या शतकातील मराठा कालखंडात विज्ञानाचा अभाव, शिक्षणापासून माणूस दूर होतात त्यामुळे राज्यात शांतता लाभावी यासाठी देवाताची उपासना केली जात असावी यातूनच कोटिलिंगार्चन उपासना अहिल्याबाईच्या राज्यात चालू झाली ती आजही चालू आहे.

महेश्वर व ओंकारेश्वर येथे कोटिलिंगार्चन हा देवाच्या उपासनेचा प्रकार आजही चालू आहे तो पुढीलप्रमाणे. नर्मदेतील माती आणून भिजवावयाची माती आणण्यासाठी बैलगाड्या लावण्यात आलेल्या आहेत. भिजवलेल्या मातीचे गोळे गडी माणसे महेश्वर येथील पूजा घरात आणतात. पूजा घरात १०८ पाटे मांडण्यात येतात. या पाटांवर समअंतरावर गोल आकाराच्या खाचा करण्यात आलेल्या आहेत. पाटांच्या समोरासमोर ब्राह्मण बसतात. एक ब्राह्मण नर्मदेतील मातीचा लहान गोळा खाचेत ठेवतो या गोळ्यास बाणाचा आकार देण्यात येतो. त्यावर समोरील ब्राह्मण एक तांदुळाचा दाणा लावतो अशी एक कोटिलिंगे रोज तयार केली जातात यासाठी अकरा अकरा ब्राह्मण समोरासमोर बसलेले असतात. तयार झालेली मातीची लिंगे नर्मदेत अर्पन केली जातात हे काम ब्राह्मणच करतात. विधीसाठी रोज सकाळी ७ वाजल्यापासून १० वाजेपर्यंत इतका वेळ लागतो. कोटिलिंगार्चनासाठी नेमण्यात आलेला ब्राह्मण आजमात्र पगारी नोकर आहेत. अहिल्याबाईच्या काळात, कोटिलिंगार्चन करणाऱ्या ब्राह्मणांना वार्षिक नेमणूका व वर्षासने व दक्षिणा दिला जात होता. याचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे. 'सांप्रत श्रावणमासचा उत्साह आहे. नित्य अडीच तीन हजार ब्राह्मण भोजन होत आहे. दोन-तीनशे ब्राह्मण लिंगाच्या अनुष्ठानास लाविले आहेत. लिंगेवाल्यास आठ रुपये दक्षिणा.'[१८]

अशा प्रकारे अहिल्याबाईच्या काळापासून हा उपासनेचा प्रकार आजही चालू आहे.

## अहिल्याबाई धार्मिक कार्यातून केलेली लोककल्याणकारी कामे :

### १) वर्षासने :

ज्या ठिकाणी अहिल्याबाईनी देवालये बांधली. त्यातील काही ठिकाणी मोठ्या प्रमाणात यात्रा भरत. लोकांची दळणवळण मोठ्या प्रमाणात असत. आजच्यासारखी सरकारी व्यवस्था नव्हती त्यामुळे तेथे लागणारा नोकर वर्ग अहिल्याबाईनी स्वत:च्या खाजगी पैशातून कायमस्वरूपी नेमला होता. वर्षासने मिळालेल्या व्यक्तीला कुटुंबाच्या

उदरनिर्वाहाची विवंचना रहात नसे तो आपला संपूर्ण वेळ मंदिराच्या देखरेखीसाठी घालवत असत. हिंदूप्रमाणे मुसलमानांच्या पिर-दर्गानाही वर्गानाही अहिल्याबाईनी वर्षासने नेमून दिली होती. याचे उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतात.

'पुणे येथील तुलसी बागेत राजश्री नारो अप्पाजी यांनी श्रीराम चंद्रजीच्या मूर्तीची स्थापना केली आहे. त्याच्या पूजा नैवद्याच्या खर्चाकरिता सालमजुरी सरकारातून वर्षासन मौजे मजकूर ऐवजी रुपये १०० (शंभर) करार करून देऊन हे सनद सादर केली असे तरी तुम्ही सनमजकूर पासून सदर्हू शंभर रुपये सालदरसाल श्रीचे पूजासाहित्य राजश्री नारो आप्पाजी याजकडे पावते करून पावती घेणे'[११] अशा प्रकारे अहिल्याबाई होळकरांनी २९-०१-१७६८ रोजी पुणे येथील तुळशी बागेतील प्रभुरामचंद्रांच्या पूजे-अर्चेसाठी १०० रुपयाचे वर्षासन कायमस्वरूपी दिले आणि यासाठी त्यांना पाबळ तालुक्यातील लाखण गावांचे उत्पन्न लावून दिले होते.

अशा प्रकारचे वर्षासने अहिल्याबाईनी संपूर्ण देशात अनेक ठिकाणी लावून दिली होती. हे करताना त्यांनी आपल्या राज्यापुरतेच कार्य न करता संपूर्ण भारतभर जनतेच्या कल्याणासाठी धार्मिक कार्य केले. वर्षासनाच्या तक्ता पुढीलप्रमाणे -

# वर्षासनाचा तक्ता

| अ. नं. | देवालयाचे नांव संस्थेचे नांव | वर्षासन कोणाला देण्यात आले | वर्षा सनाची रक्कम | वर्षासनातील रक्कमेचा विनियोग | संदर्भ |
|---|---|---|---|---|---|
| १ | तुळशीबाग राममंदिर, पुणे | नारो अप्पाजी | १००.०० | पुजा व नैवद्यासाठी | ठाकुर वा.वा., होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, पृ.१६७. |
| २ | अबड येथील देवाचे उत्सव | चिमाबाईचा शिष्य देवबा | १०५.०० | उत्सवखर्च | ठाकुर वा.वा., होळकरशाहीचा इतिहास, पृ.२७९. |
| ३ | प्रयाग | अबादास सुखरामभट | १५०.०० | त्रिवेणी नैवद्यासाठी | उपरोक्त |
| ४ | अन्नछत्र पैठण | अनंतरुपी बीन गणेश | गावगन्नाचे उत्पन | अन्नछत्र चालविण्यासाठी | ठाकुर वा.वा., होळकर इतिहासाची साधने, पृ.१६९. |
| ५ | मारुती मंदीर उज्जैन | घनश्याम भट्ट | ४८ | पूजा अर्चा | ठाकुर वा.वा., होळकर शाहीचा इतिहास, पृ.२१६. |
| ६ | नाहरसैय्यद पीर दर्गा | तारशा फ कीर मदारी अवलीया | जमीन ईनाम | देखभाल व शिष्य परंपरा चालविण्यासाठी | ठाकुर वा.वा., होळकर इतिहासाची साधने, पृ.२३२. |
| ७ | उज्जैन देवस्थान | राजेश्वर भट | १००.०० | पुजाअर्चा | ठाकुर वा.वा., होळकर शाहीचा इतिहास, पृ.२१६. |
| ८ | देवस्थान | जुहुराम भट | २४.०० | पुजाअर्चा | उपरोक्त |
| ९ | -,,- | विद्याधर भट | २५.०० | -,,- | उपरोक्त |
| १० | -,,- | केशव भट | ९०.०० | -,,- | उपरोक्त |
| ११ | -,,- | प्रेमचंद भट उज्जैन नगर | ९०.०० | -,,- | उपरोक्त |
| १२ | -,,- | कृष्णशास्त्री उज्जैनकर | २५.०० | -,,- | उपरोक्त |
| १३ | -,,- | सोमेश्वर भट | ३६.०० | -,,- | उपरोक्त |
| १४ | -,,- | यशेश्वर गंगाधर भट उज्जैनकर | ६५.०० | -,,- | उपरोक्त |
| १५ | -,,- | घनश्याम भट | १२.०० | -,,- | उपरोक्त |
| १६ | -,,- | सीतर भट, गंगाधर भट उज्जैनकर | २०.०० | -,,- | उपरोक्त |
| १७ | -,,- | गरीबदास उदासी | ४०.०० | -,,- | उपरोक्त |
| १८ | दर्गा | बकावशहा फकीर | ३०.०० | -,,- | ठाकुर वा.वा., होळकर शाहीचा इतिहास, पृ.२१६. |
| १९ | कुरुक्षेत्र | अमृतराव वैद्य | वासवाड गाव इनाम | -,,- | ठाकुर वा.वा., होळकर इतिहासाची साधने, पृ.१५९. |
| २० | हैद्रबाद | शहाशफी पीरजादे | १००.०० | -,,- | ठाकुर वा.वा., होळकर शाहीचा इतिहास, पृ.२७७. |

वरील दिलेल्या तक्त्यावरून काही गोष्टीचे स्पष्ट उल्लेख सापडतात ते पुढीलप्रमाणे अहिल्याबाईनी फक्त हिंदू लोकांनाच वर्षासने दिली नाही तर काही पीरस्थानांना देखील वर्षासने दिली होती. सोबतच्या तक्त्यातील माहिती ही संपूर्ण आहे असे म्हणता येणार नाही कारण उपलब्ध कागदपत्रातील यात माहिती देण्यात आली आहे. अहिल्याबाईंनी बरीच मंदिरे बांधून त्यांची व्यवस्था करून दिली असली तरी त्याबद्दलची वर्षासन विषयाची माहिती मात्र उपलब्ध नाही.

## अहिल्याबाई होळकरांनी यात्रेकरूंना केलेले आर्थिक सहकार्य :

तत्कालीन कालखंडात लोकांची धर्मावर श्रद्धा असल्यामुळे लोक तीर्थयात्रा मोठ्या प्रमाणात करत असत. लोकांची ती पर्यटन स्थळे होती. तत्कालीन कालखंडातील राजे, संस्थानिक धनिक लोक यात्रेकरूसाठी अन्नछत्र, त्यांची राहण्याची व्यवस्था, रस्त्यामध्ये पाणपोई इत्यादी सोयी-सुविधा करीत असत. अहिल्याबाईंनी तर संपूर्ण जीवनात अशा प्रकारची अनेक लोकोपयोगी कामे केली. पेशव्याच्या कालखंडात महाराष्ट्रात काशी आणि उत्तरेतील तीर्थयात्रेला जाताना मोगलाई, खानदेश, नेमाड, माळवा, बुंदेलखंड या मार्गाने जावे लागत होते. महाराष्ट्रातून काशीला जाणारे अनेक लोक महेश्वर मार्गाने जात असत कारण त्या लोकांची सर्व सोय अहिल्याबाई करत असत.

इ. स. १७८५ मध्ये पुढीलप्रमाणे यात्रा महेश्वरास आली होती. 'श्री महायात्रा बारा तेरा हजार देशीहून आली... बाईनी पागा वगैरे देऊन. ओंकारेश्वरापासून उज्जनी पावेतांच चवकी पहारा करून पोहचवून दिले... राजश्री रामराव त्रिंबक व राजश्री बाबुराव वैद्य व राजश्री केसोपंत कुंटे असे त्रिवर्ग... बाईचे भेटी करता आले. भेट घेऊन एक दिवस ठेवून घेतले... उज्जैनी पावेतो पंचवीस राऊत देऊन निरोप दिला'[२०] राजश्री रामराव त्रिंबक बाबुराव केसोपंत कुटे हे १३ हजार यात्रेकरू घेऊन निघाले असता. त्यांनी मदतीसाठी अहिल्याबाईना कळविले त्यावेळी अहिल्याबाईनी आपल्या प्रदेशातून त्यांची यात्रा

सुखरूपपणे पोहचवून देण्याचे आदेश आपल्या कामविसदारांना पाठविले होते. अशाप्रकारे आलेल्या अनेक यात्रेकरूंना अहिल्याबाई सहकार्य करीत असत.

काशी, प्रयाग व गया ही हिंदूंची पवित्र तीर्थक्षेत्रे इंग्रजांच्या ताब्यात होती. त्यांनी यात्रेकरूवर कर आकारला होता. त्या करातून यात्रेकरूंना माफी मिळावी म्हणून अहिल्याबाईनी स्वत: प्रयत्न केले होते. अहिल्याबाईनी गव्हर्नर जनरलने अयोध्याच्या नबाबास व गया येथील आपल्या कलेक्टर यांना कळवून कर माफ केला होता'[२१]

प्रभाकर शाहीराने आपल्या पोवाड्यात यात्रेकरूंना अहिल्याबाईनी कशा रितीने मदत करीत याचे वर्णन केले आहे ते पुढीलप्रमाणे

'यात्रेकऱ्यांना वाटी पंचे तोडी कोणास अंगरखे कोणास नवे जोडे, कोणास महेश्वरी उंच धोतरे जोडे ॥ कोणास दुशाला कोणास बटुशडे, कुठे रानात पाणी गार तयासाठी मुशाफीर काय धावत जाई, विश्रांती पावती पाहून आमराई'[२२]

अशाप्रकारे अहिल्याबाई होळकरांनी यात्रेकरूंच्या सोयीसाठी रस्ते तयार केले होते. रस्त्यावर सावलीसाठी झाडे लावले. पाणपोया सुरू केल्या. यात्रेकरूंना वस्त्रे, पैसे दिले. कोणास पायी चालणे जमत नसल्यास त्यास घोडा दिला. अशाप्रकारे अहिल्याबाईनी यात्रेकरूंना सहकार्य केले.

### अहिल्याबाई होळकरांनी चालू केलेली अन्नछत्रे :

अहिल्याबाईनी अनेक महत्त्वाच्या तीर्थक्षेत्री यात्रेकरूंसाठी अन्नछत्रे सुरू केली होती. अहिल्याबाई ज्या महेश्वरी राहत त्याठिकाणी त्यांनी कायमचे अन्नछत्र सुरू केले होते. त्याठिकाणी असणारे अनेक अपंग, गरीब, यांना ते अन्नदान होत असे. विविध सन, उत्सव अशावेळी मोठ्या प्रमाणात त्याला गर्दी होत असे. 'महेश्वर येथील अन्नछत्राचा एक वर्षाचा खर्च साधारण ३१ हजार रुपये होता हा खर्च खाजगी जहागिरीच्या उत्पन्नातून चालत असे.'[२३]

महेश्वर प्रमाणेच संपूर्ण हिंदुस्तानात निरनिराळ्या तीर्थाच्या ठिकाणी अहिल्याबाई होळकरांनी अन्नछत्र सुरू केले होते. इ. स. १७८० साली तीर्थक्षेत्रांच्या खर्च ४१२३० एवढा झाला होता.

४१२३० तीर्थक्षेत्र, देवस्थान, अन्नछत्र वगैरे

१८०० श्रीक्षेत्र द्वारका

३०० श्रीक्षेत्र रामेश्वर

४००० श्रीक्षेत्र गया

३५०० श्रीक्षेत्र काशी

७००० श्रीक्षेत्र प्रयाग

७००० श्रीक्षेत्र अयोध्या

१००० श्रीक्षेत्र पुष्कर

३००० श्रीक्षेत्र वृंदावन

२००० गावेतीनचे उत्पन्न भरतपूर पैकी मौजे गंगारसोली सेत व तमरेल प्रमाणे

१००० हुंडी सरकारातून

५००० श्रीक्षेत्र पंढरपूर ऐन ४००० व बोहाली १०००

१२०० श्रीक्षेत्र हरिद्वार

२००० श्रीक्षेत्र चित्रकूट

९०० कोरेगाव गीमातीर

६२५ श्री भीमाशंकर

७०० श्री जगन्नाथराय

२५० श्री कालहस्त्री प्रांत कर्नाटक

३२५ श्री परशराम क्षेत्र

३० श्री व्यंकटेश गिरी कापूर आर्ती'[२४]

एकूण = ४१२३०

अशा प्रकारे संपूर्ण हिंदूस्थानभर अहिल्याबाईंनी यात्रेकरूंच्या सोयीसाठी अन्नछत्र सुरू केले होते. द्वारका, रामेश्वर, गया, काशी, अयोध्या, वृंदावन, पंढरपूर, हरिद्वार, भीमाशंकर, परशराम क्षेत्र इत्यादी ठिकाणी अहिल्याबाईंनी अन्नछत्र सुरू केले या अन्नछत्राचा खर्च ४१२३० रुपये होता. तीर्थक्षेत्राच्या व्यतिरिक्त अहिल्याबाईंनी ज्या ठिकाणी मंदिरे बांधली त्या ठिकाणी अन्नछत्रे सुरू केली होती याचे उल्लेख ग्रंथातून मिळतात. आजही खाजगी होळकर ट्रस्ट मार्फत यात्रेदिवशी एका दिवसाचे अन्नछत्र चालविले जाते. भारतात रामेश्वर, जगन्नाथपुरी, द्वारका, पैठण, महेश्वर, अमरकंटक, वृंदावन, सुपलेश्वर, इंडिया, उज्जैन, पुष्कर, पंढरपूर, चिंचवड येथे अन्नछत्र चालवून एका दिवसाचे अन्नदान केले जाते.

**अहिल्याबाईनी विवाह, मुंज व रुग्ण लोकांना केलेली आर्थिक मदत :**

अहिल्याबाईंनी फक्त हिंदू पंडित यांनाच सहाय्य न करता राज्याची प्रजेच्या सर्वतहरेच्या आडी-अडचणी लक्षात घेऊन कोणताही जातीभेद न करता व्यक्तीगत पातळीवर आर्थिक मदत करीत असत त्याचे उल्लेख पुढीलप्रमाणे मिळतात.

इ. स. १७९४ मध्ये चिमणाजी जयराम पारनेरकर यांच्या मुलाचे लग्न होते त्यासाठी अहिल्याबाईंनी 'राजश्री चिमणाजी जयराम पारनेरकर पुत्राचे लग्नाकरिता निरोप घेवून -- २२ रोजी गेले बाईंनी पाच हजार रुपये खर्चास दिल्हे'[२५] अहिल्याबाई होळकर यांचा खासगीचा दिवाण मुकूंद हरी यांनी दत्तक पुत्र घेतलां. दत्तक विधान झाल्यावर मुकूंद हरी यांनी त्या मुलाची मुंज करण्याचे ठरविले त्यांच्याकडे पैशाची अडचण होती त्यावेळी अहिल्याबाईंनी 'मुकूंद हरी यांचे चिरंजीवाचे मुंजीस हजार रूपये खर्चास दिले. मुकूंदराव हरि यांचे घरी दत्तक पूत्राची मुंज ते दिवशी होती तेथे आहेरास गेली होती'[२६] अशाप्रकारे आपल्या

दरबारातील अथवा महेश्वर येथील कोणाची आर्थिक अडचण असल्यास अहिल्याबाई ती अडचण दूर करीत असत व त्या कार्यक्रमाला त्या स्वत: हजर राहत असत.

आपला नोकरवर्ग आणि त्यांची कुटुंबे यांच्या सुख-सोयीसाठी अहिल्याबाई नेहमी दक्ष रहात असे. आपल्या नोकरवर्गाशी त्यांची वागणूक स्नेहाची राहत असत मात्र नोकर वर्गाच्या कामाच्या ठिकाणी त्या कर्तव्यकठोर होत. महेश्वर येथील आपल्या प्रजापैकी अथवा नोकर वर्गापैकी कोणी आजारी असेल तर त्यांच्या समाचाराला अहिल्याबाई स्वत: जात त्याला त्यावर उपचार सुचवत त्याला आर्थिक मदत करीत असत अशा प्रकारचे उल्लेख आहेत. 'राजश्री विसाजी शामराव लांबहाते यास दोन महिने शरीर स्वस्थ नाही. औषधी उपाय करीत आहेत, बाईही त्यांच्या दोन वेळा त्यांच्या परामर्षास गेली होती'[२७] विषाजी शामराज हे अहिल्याबाईचे कारभारी होते. जुलै-ऑगस्ट १७८३ या दोन महिन्यात ते आजारी असल्यामुळे अहिल्याबाई स्वत: त्यांच्या भेटीला दोन वेळा गेल्याचे पेशव्यांचा वकील केसो भिकाजी दातार यांनी पुण्यास कळविले होते, तेव्हा बाईंनी दोनशे रूपये औषध उपायास दिल्हे होते, क्रियेसाठी तीनशे रुपये दिल्हे तेरावे दिवशी त्यांच्या घरात जाऊन मुलांस वस्त्रशेला एक दिल्हा'[२८] अहिल्याबाईचे आश्रीत असलेले व्यंकटशास्त्री आजारी असताना त्यांच्या औषध उपचारासाठी अहिल्याबाईंनी दोनशे रूपये दिले होते परंतु औषध उपायांचा उपयोग न होता, व्यंकटशास्त्री मरण पावले असता अहिल्याबाईंनी त्यांच्या घरी जाऊन त्यांच्या मुलाचे सांत्वन केले. त्याला दुखवट्याची वस्त्रे देऊन व्यंकटशास्त्रींची क्रियाकर्मासाठी तीनशे रूपये दिले.

आपल्या अधिकारी वर्गापैकी जर एखादी व्यक्ती आजारी असून ती निपुत्रीक अवस्तेत मरण पावली तर त्यांचे संस्थान पूर्ववत चालावे यासाठी अहिल्याबाई त्यांना दत्तक घेण्याची परवानगी देत. 'रा अप्पाजीराम पळशीकर यास प्रस्तुत शरीरी समाधान नाही म्हणून परस्पर ऐकिले त्यावरून रामजी त्रिंबक कारकून पाठविले आहेत. शरीर प्रकृतीची भावना

लिहून पाठवितील आमचे विचारे चांगला मुलगा पाहून दत्तकपुत्र जरूर घ्यावा. दत्तकपुत्र लाभदायक घेऊन पुत्रात्वची जाहलिया अती उत्तमच आहे. संशय न घेता लिहिल्याप्रमाणे करावे औषध उपाय चांगला करून प्रकृती चांगली होय ते करणे... कोणाविसी घबरे न होणे श्री बरेच करील'"[२१]

अप्पाजीराव या सेवकाला पत्र पाठवून त्यांची विचारपूस केली. त्याला पुत्र नसल्यामुळे पुत्र दत्तक घ्यावा असे अहिल्याबाईनी कळविले. अप्पाजीराव यांचे संस्थान पूर्ववत चालावे यासाठी तुकोजीराव होळकरांना पत्र पाठवून त्यांची तजविज करण्यास सांगितले होते. अशाप्रकारे प्रत्येक सेवकाची त्या काळजी घेत असत. त्यामुळे होळकर संस्थानचे लोक त्यांना मातोश्री, लोकमाता म्हणत असत.

**अहिल्याबाई होळकरांनी संपूर्ण भारतात बांधलेली व जीर्णोद्धार केलेली मंदिरे :**

भारतामध्ये १२ व्या शतकापर्यंत अनेक नवी मंदिरे बांधली गेली होती तर अनेक स्वयंभू देवतांच्या मंदिरांचे जीर्णोद्धार करण्यात आलेले होते. याच शतकात दक्षिणेत यादव घराण्याचा उदय झाला आणि लवकरच हे घराणे वैभवाला पोहचले होते. यादवांच्या कारकिर्दीत दक्षिण भारतात धर्मभावना वाढीस लागून अनेक मंदिरांची निर्मिती मोठ्या प्रमाणावर झाली होती परंतु याचवेळी जागतिक धर्मकारणांत आणि राजकारणात इस्लाम या नव्या शक्तीचे वर्चस्व निर्माण झाले. अरबस्थानातील इस्लामी राज्यकर्त्यांनी सुरवातीला हिंदूस्थानावर आक्रमण करण्यास सुरूवात केली. इ. स. ७१२ मध्ये महंमदबिन कासीमने सर्वप्रथम भारतावर आक्रमण केले होते. यानंतर ११ व्या आणि १२ व्या शतकात महंमद घोरी, महंमद गझनी या तुर्की आक्रमकांनी हिंदुस्थानवर अनेक स्वाऱ्या करून हिंदूची अनेक भव्य मंदिरे नष्ट केली होती आणि अगणित संपत्ती आपल्याबरोबर नेली. यावेळीपर्यंत दक्षिण भारत सुरक्षित होता परंतु इ. स. १२९४ साली आलाउद्दीन खिलजीने दक्षिण भारतातवर स्वारी केली आणि यानंतर अवघ्या पंचवीस वर्षात देवगिरीच्या यादवांचे

वैभवशाली राज्य नष्ट झाले. इ. स. १५६५ मध्ये विजयनगरचा पाडाव झाल्यानंतर उत्तरे प्रमाणेच दक्षिण भारतावरही इस्लामी राज्यकर्ते शासन करू लागले. दिल्लीचे सुलतान बहामनी सुलतान आणि यानंतरचे मोगल राज्यकर्ते या सर्वांचेच धोरण हिंदू विरोधी असून आक्रमक, असहिष्णू व हिंसक होते. यातील काही मुस्लिम राजकर्त्यांनी हिंदूच्या अनेक मंदिरांचा नाश केला. तत्कालीन कागदपत्रात हिंदूच्या देवतांच्या मूर्ती फोडणे हे काझीचे प्रमुख काम असल्याचे उल्लेख सापडतात.

प्रजा जरी हिंदू असली तरी राज्यकर्ते मुस्लिम असल्यामुळे १३ व्या शतकापासून मंदिर बांधणे, मंदिरांचा जीर्णोद्धार करणे कोणासही शक्य नव्हते. १७ व्या शतकात छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वत: मंदिर बांधणे व जीर्णोद्धार हे कार्य हाती घेतले. मुस्लिम आक्रमकांनी उध्वस्त केलेल्या मंदिरांच्या जीर्णोद्धार करणे. नवीन मंदिरे बांधून हिंदूच्या मनावर झालेले आघात दूर करणे त्यांची अस्मिता जागृत करणे, त्यांच्यात विश्वास निर्माण करणे आवश्यक झाले होते आणि हे कार्य मंदिर निर्मितीतून होणारे होते. परंतु त्यासाठी फार मोठ्या प्रमाणावर पैसा लागत असल्यामुळे सामान्य लोक हे कार्य करू शकत नव्हते म्हणून छत्रपती शाहू महाराज, गुरू ब्रह्मेंद्रस्वामी, बाळाजी बाजीराव पेशवे यांनी पुण्यास व त्र्यंबकेश्वर येथे भव्य व सुंदर मंदिरे बांधली. पेशव्यांचे सरदारही या बाबतीत मागे नव्हते. त्यांनी वाई, सातारा, सांगली तासगांव टोके, नाशिक, माहुली इत्यादी ठिकाणी बांधलेली मंदिरे लक्षणीय अशी आहेत. पेशव्यांच्या सर्व सरदारात अहिल्याबाई होळकरांनी धार्मिक लोककल्याणकारी कार्य म्हणून सर्वात जास्त मंदिरे बांधली ती संपूर्ण भारतात आहेत. या मंदिराचे बांधकाम त्यांनी आपल्या खाजगी जहागीरीच्या उत्पन्नातून केले होते.

मंदिरे, तीर्थक्षेत्र सामाजिक जीवनात महत्त्वाची भूमिका बजावतात. मंदिरे हे केवळ देवांची निवासस्थान नसून समाजातील व्यक्ती घटना ह्या त्यांच्याशी निगडीत असतात. मंदिरात होणारे सण, समारंभ, उत्सव ह्यांच्या निमित्ताने यात्रा भरतात. सणांच्या उत्सवाच्या

यात्रेच्या निमित्ताने विविध सामाजिक घटक एकत्र येतात. त्यामुळे व्यक्तींच्या सामाजिकरणात सण, यात्रा, उत्सव यांना महत्त्वाचे स्थान आहे. यात्रेमध्ये बाजार भरवले जातात त्यानिमित्ताने अनेकविध व्यापारी बाजारामध्येच येत असतात वस्तूची उपलब्धता विनिमय होत असे त्यामुळे आर्थिक व्यवहार मोठ्या प्रमाणात होत असे. मंदिर हा इतिहासाचा एक स्त्रोत आहे. अनेक ऐतिहासिक व्यक्ती घटना त्या वस्तूशी निगडीत असतात म्हणून मंदिरे हे ऐतिहासिक साधन म्हणून जशी महत्त्वाची असतात त्याप्रमाणेच राजकीय समाज जीवनातील अभ्यासातील एक महत्त्वाचा अभ्यास घटक म्हणूनही महत्त्वाचे असतात.

तत्कालीन कालखंडात मंदिरे बाधण्यामागचा उद्देश हा असे की मंदिरातून प्रबोधन, कथा, किर्तन, भजन, प्रवचन, धार्मिक ग्रंथाचे पारायण, चर्चा, धर्मसभा, पाठशाळा, उत्सव, जत्रा, पूजा, अर्चा, जात पंचायतीच्या सभा, न्यायनिवाडा करणे इत्यादी असल्यामुळे या मंदिरांना संस्कार केंद्राचे व ज्ञानपीठाचे स्वरूप प्राप्त झालेले होते. मराठा कालखंड आजच्या सारख्या शिक्षण संस्था, प्रसार माध्यमे यांचा अभाव होता. लोकांना मनोरंजानासाठी आकाशवाणी, दूरदर्शन, चित्रपट, इलेक्ट्रॉनिक्स साधने यांचा अभाव होता. तसेच अनेक सार्वजनिक कार्यक्रमासाठी आजच्यासारखे हॉल, कार्यालये, उपलब्ध नव्हती तर या सर्व गोष्टीसाठी मंदिराचा उपयोग केला जात असे. लढाईच्या काळात येता-जाता सैनिकांच्यासाठी विश्रांती व आश्रय ठिकाणे होती. विविध धर्मासाठी मंदिर, मसीदा श्रद्धास्थाने होती. अहिल्याबाईनी बांधलेल्या या मंदिराचा उपयोग कथा, किर्तन, भजन, प्रवचन, पारायण, न्याय निवाडा करण्यासाठी होत असे. तसेच नृत्य, गायन, वादन, शिल्पकला, वास्तुकला, चित्रकला, मूर्तीकला अशा कलांना या मंदिर बांधणीच्या कामामुळे उत्तेजन मिळाले. अनेक लोकांना रोजगार उपलब्ध झाला.

इ.स. १७६७ पासून अहिल्याबाईनी प्रत्यक्ष राज्यकारभार पाहण्यास सुरूवात केली आणि तेव्हापासून होळकरांच्या राज्यात स्थापत्य कलेचा मोठ्या प्रमाणावर विकास झाला. मुस्लिम आक्रमणाला बळी पडलेल्या अनेक मंदिराच्या बांधणीचे व जीर्णोद्धाराचे कार्य हाती घेतले. त्या कालखंडातील ती गरज होती असे संशोधनातून स्पष्ट होते.

**चौंडी येथे अहिल्याबाईनी बांधलेली मंदिरे :**

अहिल्याबाई होळकर यांचे जन्मगाव चौंडी हे गांव अहमदनगर जिल्ह्यात जामखेड तालुक्यात आहे. जामखेड पासून ३० कि. मी. अंतरावर चौंडी गाव आहे. या गावी हरणा व सीना या दोन नद्यांचा संगम असून सीना नदीच्या उजव्या तीरावर हे गाव वसलेले आहे. अहिल्याबाईंच्या या जन्मगावी वडिलांचे घर, गढी, जीर्णावस्थेत शिल्लक आहेत. त्यांच्या माहेरचे वंशज अद्यापही या गावी राहतात त्यांची आठवी पिढी असून गोविंदराव शिंदे या गावचे पाटील आहेत. या आपल्या जन्मगावी अहिल्याबाईनी शनेश्वर महादेव मंदिर, अहिलेश्वर महादेव मंदिर आणि चौंडीदेवी मंदिर अशी तीन मंदिरे बांधली आहेत. यांचे उल्लेख ग्रंथातून मिळतात ते पुढीलप्रमाणे

**१) शनेश्वर महादेव मंदिर :**

'शनेश्वर महादेव मंदिर ६००० रूपये किंमतीचे पक्के शिखरबंद बांधले'[३०] चौंडी या गावी ६००० रुपये खर्च करून अहिल्याबाई होळकर यांनी शनेश्वर महादेवाचे मंदिर बांधले. हे मंदिर पूर्वभिमूख असून ४ ते ५ फूट उंच दगडी जोत्यावर बांधण्यात आले आहे. तीन पायऱ्या चढून गेल्यावर दगडाचा चौथरा आहे. मंदिराचे संपूर्ण बांधकाम काळ्या पाषाणाचे आहे. सुरूवातीस एक सभामंडप असून या सभामंडपात उंच दगडी चौथऱ्यावर पाषाचा नदी स्थानापन्न आहे. मंदिराचे प्रवेशद्वार दगडी कमानीचे असून दरवाजा लाकडी आहे.

या मंदिरात ३ ते ४ फूट खोल गर्भगृह आहे. या गर्भगृहात शनेश्वर महादेवाची संगमरवरी पिंड असून पार्थिवलिंग पाषाणाचे आहे मुख्य सभा मंडपावर एक आणि पिंडीच्या

बरोबर एक असे दोन कळस या मंदिरात आहेत. कळसाचे काम विटा आणि चुना यांच्यात करण्यात आलेल आहे. मंदिराच्या दर्शनी भागावर 'होळकर सरकार' असा संगमरवरी फलक लावण्यात आलेला आहे. या मंदिराची व्यवस्था बापू बनाते ही व्यक्ती पाहते. त्याला कोणत्याही प्रकारचे मानधन अथवा नेमणूक नाही. तो केवळ श्रद्धेपोटी हे काम करतो. अहिल्याबाई होळकर यांनी चौंडी येथील देवस्थानची पूजा करण्यासाठी पूजाऱ्याची नेमणूक केली. त्याला ७४२ रुपये नेमणूक देण्यात आलेली होती. आज मात्र या पूजाऱ्याचे कोणतेही वंशज या मंदिराच्या पूजेसाठी येत नाहीत. मंदिराच्या मागील बाजूने सीना नदी वाहते. लोकांना पाण्याची सोय व्हावी. ने-आण करणे सोपे जावे म्हणून तेथे घाट बांधलेला आहे.

अहिल्याबाईंनी जेथे मंदिर बांधत असत त्याचा आराखडा स्वत: त्या पाहत असत. त्यातील अनेक त्रूटी त्या स्वत: दूर करत असा प्रकारचे उल्लेख संशोधनातून मिळतात. अहिल्याबाईंनी तीर्थयात्रेच्या निमित्ताने, लढाईच्या निमित्ताने अनेक प्रदेशांना भेटी दिल्या होत्या त्यामुळे त्यांना वेगवेगळ्या प्रदेशाचा भूगोल तेथील समाज त्यांच्या अडीअडचणी त्यांनी पाहिल्या होत्या. अहिल्याबाईनी ज्या ठिकाणी मंदिरे बांधली त्यांचा उपयोग तत्कालीन कालखंडात मोठ्या प्रमाणात झाला. परंतु आजही चौंडी गावात विविध सामाजिक व धार्मिक कार्यक्रम पार पाडण्यासाठी व अनेक गरीब लोकांच्या विश्रांतीसाठी त्याचा उपयोग होतो आहे.

## २) अहिलेश्वर महादेव मंदिर :

जामखेडहून चौंडीस येताना लांबूनच हे मंदिर दृष्टीस पडते 'श्री अहिलेश्वर मंदिर २०,००० रु. खर्च मंदिर शिखरबंद व अष्टपैलू चबुत्रा असून आतल्या बाजूस श्री शंकराची स्थापना केलेली आहे तसेच ती अहिल्याबाई यांची मूर्ती पार्थीव पूजा करून राहिले आहे'[११] अहिल्याबाईनी २०,००० रूपये खर्च करून हे मंदिर बांधलेले आहे. मंदिर पूर्वभिमुख असून अतिशय भव्य व प्रशस्त आहे. या मंदिराचे बांधकाम १०-१५ फूट उंच जोत्यावर करण्यात

आलेले आहे. सात पायऱ्या चढून गेल्यावर आयताकृती चौथरा असून या चौथऱ्याच्या चारही बाजूंनी १५ ते १७ फूट जागा सोडून मुख्य मंदिर बांधण्यात आलेली आहे. चौथऱ्यास तीन पायऱ्या चढून गेल्यावर मंदिराचा मुख्य सभामंडप लागतो. यानंतर मुख्य गर्भगृहाचे प्रवेशद्वार हे दगडी कमानीचे असून दरवाजा लाकडी आहे. मंदिरात अहिलेश्वर महादेवाची भव्य शाळुंका पिढी पाषाणाची आहे. मंदिरातील या शिवलींग व्यतिरिक्त इतर लहान तीन शिवलिंगे आहेत. या मंदिरात अहिल्याबाईंच्या मृत्यूनंतर त्यांची मूर्ती या मंदिरात बसवली असावी ती ही मंदिरात आहे.

मंदिराचे बांधकाम दगडाचे असून कळस मात्र विटा आणि चूना यांच्यात बांधण्यात आलेला आहे. मंदिराच्या डाव्या बाजूस मंदिरास लागूनच एक लहानशी मशिद आहे. या मशिद अहिल्याबाईनीच बांधली असावी. मंदिरास लागून उजव्या बाजूस भव्य पटांगण आहे. त्याचा उपयोग अन्नछत्रासाठी केला जात होता असे तेथील लोक सांगतात तसेच सार्वजनिक कार्यक्रमासाठी या जागेचा उपयोग करतात. गावातील भजन, किर्तन, सभा यारसाख्या कार्यक्रमासाठी होत आहे.

### ३) चौंडी देवी मंदिर :

चौंडी देवी हे चौंडी गावाचे ग्रामदैवत आहे. प्राचीन काळापासून आहे यासाठी मंदिर अहिल्याबाईने बांधले. 'श्री चौंडीदेवी मंदिर १४००० रूपये सदरहू मंदिर पक्के शिखरबंद आहे.'[३२] या मंदिरासाठी तत्कालीन कालखंडात १४००० रुपये खर्च केले होते. चौंडीदेवी मंदिर पूर्वाभिमुख शनेश्वर आणि अहिलेश्वर या मंदिराप्रमाणेच हे मंदिरही उंच जोत्यावर बांधण्यात आलेले आहे. मंदिराचे बांधकाम अतिशय साधे आहे. मंदिराच्या बाजूला किर्तीमुख आहेत. दोन दीपमाळा असून त्यातील एक पडलेली आहे. सभामंडपानंतर देवीच्या मंदिराचे गर्भगृह सुरू होते. त्याचे द्वार दगडी कमानीचे असून दरवाजा लाकडाचा आहे. गर्भगृहात शेंदूर लावलेली काळ्या पाषाणाची चौंडी देवीची उभी मूर्ती आहे.

चौंडी देवीचे बांधकाम लाल पाषणाचे असून शिखर मात्र चुना आणि विटा यांच्यात बांधलेले आहे. शिखराकडे खालून वर आठ आणि सर्वात वर सहा अशा कमानी करण्यात आलेल्या आहेत. हे मंदिर सीना नदीच्या घाटावरच बांधण्यात आले आहे. चौंडी या गावात तीनही देवस्थानचे उत्सव साजरे केले जातात. महाराष्ट्र शासनाने १९९५ साली अहिल्याबाईंच्या २०० व्या पुण्यतिथीच्या निमित्ताने त्यांच्या राहत्या वाड्याचा, मंदिरांचा जीर्णोद्धार केला आहे. त्याअगोदर अहिल्याबाईंनी संपूर्ण देशभर मोठ्या प्रमाणात काम करून सुद्धा त्याच्या जन्मस्थळांची दखल घेतली नव्हती. तरीही आजून याचा मोठ्या प्रमाणात विकास होऊन प्रसिद्धी मिळावयास पाहिजे तेवढ्या प्रमाणात मिळाली नाही. अलिकडील काळात हे हळूहळू पर्यटकांचे ठिकाण होऊ लागले आहे. ३१ मे हा त्यांचा जन्मदिवस त्या दिवशी विविध जाती धर्माच्या लोकांकडून त्यांची जयंती त्यांच्या जन्मगावी साजरी केली जाते. यासाठी महाराष्ट्रातील विविध भागातून तसेच कर्नाटक राज्यातून १ लाखापेक्षा जास्त लोक या ठिकाणी एकत्र येतात. अशाप्रकारे अहिल्याबाईंच्या जन्मगावाची स्थिती आहे.

**पंढरपूर येथे अहिल्याबाई होळकर यांनी बांधलेले मंदिरे :**

**१) श्री विठ्ठल मंदिरास अहिल्याबाई यांनी दिलेल्या देणग्या :**

विठ्ठल हे या देशातील अनेक कष्टकरी माणसांचे दैवत आहे. पंढरपूरला आणि विठ्ठलाला प्राचीन काळापासून फार मोठा इतिहास आहे. वर्षातून ज्या दोन आषाढी व कार्तिकी या वाऱ्या भरतात त्या दोन यात्रांना संपूर्ण देशातून अनेक जाती-धर्माचे लोक येतात. त्यातून देशाची राष्ट्रीय एकात्मता साध्य होते. तसेच ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ या थोर संतानी संपूर्ण समाजव्यवस्थेला जीवनाचा खरा धर्म काय असतो याचे महत्त्व पटवून देऊन संपूर्ण भारतभर समतेचा संदेश दिला. साने गुरूजी यांनी दलितांना मंदिर प्रवेश व्हावा म्हणून पंढरपूरात उपोषण केले. अशा प्रकारच्या अनेक ऐतिहासिक घटनांचा क्रम या

पंढरपूरला आहे. पंढरपूर शहराची वाढ आणि विकास झाला तो विठ्ठल मंदिरामुळे, तेथील लोकांना रोजगार उपलब्ध झाला. अनेक लहान-मोठे उद्योग उभे राहिले. अशाप्रकारच्या अनेक तीर्थक्षेत्राचे महत्त्व ओळखून अहिल्याबाईंनी तेथे मंदिरे बांधली तेथील लोकांच्या सोयीसाठी घाट, धर्मशाळा, अन्नछत्र सुरू केले. अशाच प्रकारे पंढरपूरचे तीर्थक्षेत्राचे महत्त्व ओळखून मल्हारराव होळकर, अहिल्याबाईंनी तेथे देणग्या दिल्याचे उल्लेख सापडतात व काही ठिकाणी शिलालेख ही आहेत.

सुभेदार मल्हारराव होळकरांनी या देवस्थानाच आपले उपाध्ये नेमून त्यांनी 'कासेगाव प्रांत विजापूर येथील जमीन पैकी ईनाम बिघे, बागाईत १० व विहिर पासील जिराईत.... बिघे ५ एकूण बिघे सुमारे १५ गोडवण मळा... करार करून देऊन हे इनामपत्र तुम्हास दिले... एकूण पंधरा बिघे जल, तरू पाषाण, निधी, निक्षेप, अधीकरून ईनामदेखील विहिर दिली असे तरी तुम्ही आपले पुत्र पौत्रादी वंश परंपरेने अनुभव घेणे'[३३] पंढरपूर येथील गंगाधर भट आणि प्रल्हाद भट यांना ही जमीन वंशपरंपरेने देण्यात आली होती. अशा प्रकारे तत्कालीन कालखंडात अनेक राज्यकर्ते पंढरपूरच्या विठ्ठलाची देखभाल करणाऱ्या सेवकांना जमीन इनाम देत असत. खंडेराव होळकरांनी व अहिल्याबाई होळकर यांनी पंढरपूरची यात्रा केली आणि या देवास खंडेराव होळकरांनी नैवेद्यासाठी ४५ रुपये नेमणूक दिली होती तीच नेमणूक अहिल्याबाई होळकरांनी पुढे चालू ठेवली. 'श्रीच्या नित्योपयोगी उपकरणे चांदीची करून दिली. मौल्यवान अलंकार श्री रुक्मिणी आणि पांडुरंगास अर्पण केले. अद्यापही चांदीची उपकरणी देवाच्या पूजेप्रसंगी वापरली जातात व सोने, मोती, हिरे व रत्नांचे अलंकार सणवारी देवास घातले जातात. श्री विठ्ठल मंदिरात दिपोत्सवासाठी दिपमाळ दगडाची बांधून त्या शेजारी पिण्याचे पाण्यासाठी दगडास रांजण ठेवला'[३४] अशाप्रकारे लोकांची श्रद्धास्थाने असणाऱ्या ठिकाणी अहिल्याबाई होळकर वेगवेगळ्या सुविधा उपलब्ध करून दिल्या.

## २) पंढरपूर येथील राममंदिर :

अहिल्याबाईंनी यात्रेकरूंची सोय व्हावी म्हणून तेथे एक वाडा बांधला आहे. वाड्यात अहिल्याबाईंनी पंढरपूर येथील होळकर वाड्यात शिवमंदिर बांधण्यासाठी पाया खोदला परंतु पाया खोदताना मारुतीची मुर्ती सापडली म्हणून अहिल्याबाईंनी या ठिकाणी शिवमंदिर न बांधता राममंदिर बांधले आणि या मंदिरासमोरच मारुतीचे लहानशे मंदिर बांधले. याचा उल्लेख पुढीलप्रमाणे 'श्री क्षेत्र पंढरी येथे कैलासवासी तीर्थस्वरूप मातोश्री अहिल्याबाई सो यांनी देवालय बांधून श्री सीताराम देवाची स्थापना करून श्रीच्या पूजेअर्चेचे काम आमचे तीर्थरूपास सांगून नेमणूक रूपये १०० वां परंपरेची सनद करून दिली व आमचे ज्येष्ठ बंधू तिर्थस्वरूप बापू अनंत बडवे यांना श्री सिताराम देवाच्या खर्चाप्रित्यर्थ मौजे बोहळी परगणे कासेगाव येथे सरकार शेती मळा व सरकार वर्गाचा या जमीनीच्या उत्पन्न खर्चाचा वंश परंपरेचा करार करून दिल्हा'[३५] 'पंढरपूर येथे जे बडवे उपाध्ये पुजारी यांचे उत्पन्न, अन्नछत्रातून श्री पांडुरंगास श्री सीताराम देवास नैवेद्य व नित्यावळीस असाम्य तीन व पांडुरंगाच्या नित्य नैमित्रीक उपचारासाठी व बडवे उपाध्ये यांचे संभावना बिदागी म्हणून वार्षिक नेमणूक रुपये १५०० या खेरीज श्री सिताराम देवाच्या नावे पुजे प्रित्यर्थ नेमणुक शंभर'[३६]

अशाप्रकारे अहिल्याबाईंनी श्री पांडुरंगास आणि राममंदिरास नेमलेल्या उपाध्यांना १५०० रुपये वार्षिक नेमणूक तत्कालीन कालखंडात केल्या व शेजारी बोहाळी गावी जमीनी इनाम दिल्या. 'हे मंदिर बांधण्यासाठी ६००० रुपये खर्च केला होता.'[३७] पंढरपूर येथील राममंदिराच्या पायरीखाली अहिल्याबाई होळकर यांच्या नावाचा शिलालेख आहे परंतु तो आता अस्पष्ट झाला आहे.

## नाशिक येथील मंदिरे :

महाराष्ट्रातील नाशिक हे एक तीर्थक्षेत्र आहे ते गोदावरी नदीच्या काठी वसले आहे. याला महाराष्ट्रातील दक्षिण काशी नावाने संबोधले जाते. नाशिक येथे कुंभमेळा भरला होता. या तीर्थक्षेत्री अहिल्याबाईंनी अनेक मंदिरे बांधली आहेत त्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे.

### १) अहिल्याराम मंदिर :

नाशिक येथील बहुतांश मंदिरे रामाची असून अहिल्याबाई होळकर यांनी सुद्धा गोदावरी काठी पंचवटी घाटावर अहिल्याराम मंदिर बांधले आहे. 'नाशिक मुंबई इलाका श्रीराम मंदिर यात अहिल्यामातेची मूर्ती आहे'[३८] अहिल्याराम मंदिर १७८६ साली अहिल्याबाईने बांधले आणि ते आपले उपाध्ये नानाभट क्षेमकल्याणी यांना दान दिले. भटजींना दर दिवसाला १ रूपया याप्रमाणे वर्षासन नेमलेले होते. आज जनार्दन गोपाळ शेमकल्याणी हे या मंदिराची व्यवस्था पाहतात. नानाभट क्षेमकल्याणी त्यांना अहिल्याबाईनी जमीनही दान दिलेली आहे ती आता जनार्दन गोपाळ क्षेमकल्याणी यांच्याकडे आहे.

अहिल्याराम मंदिराचे प्रवेशद्वार पश्चिमेस आहे हे मंदिर १२ फूट उंचावर असून काळ्या पाषाणात बांधण्यात आलेले आहेत. या मंदिराचे छत लाकडी पटवाचे असून मुख्य मंदिर लाकडाचे आहे. मंदिराच्या समोर प्रशस्त सभा मंडप आहे. आतील बाजूस राम-लक्ष्मण सीता आणि खालील बाजूस अहिल्याबाई यांच्या संगमरवरी मुर्त्या आहेत. या मंदिराचे नानाभट क्षेमकल्याणी यांना पुजारी म्हणून नियुक्त केले होते तशी सनद अहिल्याबाईनी दिली होती आजही ती त्यांच्या वंशजाकडे आहे. नाशिक या ठिकाणी अहिल्याबाई, मल्हारराव, खंडेराव यांनी भेटी दिल्याचे उल्लेख आहेत आजही मंदिराच्या सभामंडपात निरनिराळे सार्वजनिक कार्यक्रम होतात.

## २) विश्वेश्वर मंदिर :

विश्वेश्वर मंदिर पंचवटी घाटावर काळ्या पाषाणात बांधण्यात आले आहे. मंदिर अतिशय भव्य आणि प्रशस्त असे आहे. प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूस कितीमुख यानंतर मुख्य गामिरा संगमरवरी शळुकापिंडी मंदिर १०० फूट उंच किल्ला आणि बालेकिल्ला असे मंदिराचे बांधकाम आहे. गोदावरीच्या काठावर हे मंदिर असून अहिल्याराम मंदिराच्या बरोबर मागच्या बाजूस आहे.

या मंदिराबद्दल कागदपत्र उपलब्ध नसले तरी त्याठिकाणी अहिल्याबाई आणि खासगी ट्रस्ट इंदोर असे शिलालेख आहेत. राजप्रसादजी शिखपाल हे पुजारी म्हणून मंदिराची व्यवस्था पाहतात.

## संगमनेर येथील अहिल्याबाई यांनी बांधलेले अहिल्याराम मंदिर :

संगमनेर येथे पाच नद्यांचा संगम झालेला असल्यामुळे या गावाला संगमनेर असे म्हणतात. याठिकाणी अहिल्याबाई होळकर यांनी अहिल्याराम मंदिर बांधले आहे. याबद्दलचे एक पत्र महेश्वर दरबारच्या बातमीपत्रात उपलब्ध आहे. पेशव्यांचे वकील केसो भिकाजी दातार यांनी याबद्दलची माहिती पुण्यास कळविली आहे ती पुढीलप्रमाणे ‘अहिल्याबाई होळकर यांचे अश्रीत यांनी कसबे संगमनेर येते श्रीराम यांची मूर्ती पंचायतांना सुद्धा घेऊन ठेवल्या. एक स्थळ ते त्याचे दोन तीनशे पावेतो खरेदी केले. त्या स्थळी देवालय बांधून श्रीच्या मूर्तीची स्थापना करून नित्य किर्तन पूजा चालवावी असा मनोभाव म्हणून विनंतीपत्रे सेवेशी भटजींनी लिहली आहेत व समक्ष बाईस विनंतीपत्र लिहवयास सांगितले आहे की, भटजी आमचे आश्रीत यांचा हेतू वतनाचे स्थळी देवालय करावे तर सरकारचे आज्ञापत्र तेथील कामविसदारास की भटजींनी स्थल जागा घेतली त्या जागेची महजर खर्च न पडता करून देऊन बिनदिक्कत श्रीच्या देवालयाचे काम निर्विघ्न शेवटपर्यंत निर्विघ्न होम तो अर्थ करावा’[३९]

संगमनेर येथील मंदिर बांधण्यासाठी अहिल्याबाई होळकर यांनी ३००० रुपये खर्च केले होते. मंदिर अद्यापही अतिशय चांगल्या स्थितीत आहे. वेदशास्त्र संपन्न राजश्री सदाशिव भट जोशी राहणार संगमनेरकर हे अहिल्याबाईचे आश्रित होते. त्यांनी संगमनेर हे आपले वतनाचे गाव म्हणून याठिकाणी रामाचे मंदिर बांधावे म्हणून श्रीराम चंद्राच्या मुर्ती पंचायतना सुद्धा म्हणजे राम, लक्ष्मण, सीता, हनुमान यांच्या मूर्त्या घेवून ठेवल्या. अहिल्याबाईंनी कमाविसदास पत्र पाठविले व मंदिराच्या कामात कोणताही व्यत्यय येणार नाही. याबद्दल विनंती केली. संगमनेर येथील राममंदिर काळ्या दगडात बांधलेले आहे. मंदिराच्या मध्यभागी प्रशस्त चौक असून चौकाच्या तीन बाजूंना गॅलरी आहे. मंदिर तीन मजली आहे. मंदिराचे प्रवेशद्वार दगडाच्या कमानीचे आहे. मूळ राममंदिर लहान होते. १९६६ साली संगमनेर येथील डॉ. सराफ यांनी कै. लक्ष्मीबाई बाळकृष्ण सराफ यांच्या स्मरणार्थ जीर्णोद्धार केला. या मंदिराला ६० रूपये वर्षासन आजही इंदोर ट्रस्टतर्फे देण्यात येते तसेच येथील पुजारी यांना जमीन व घर इनाम देण्यात आले होते. आज पुजाऱ्याचे कोणीही वंशज अस्तित्वात नाही. श्री वल्लभ करबळेकर हे मंदिराची व्यवस्था पाहतात याची नियुक्ती इंदोर ट्रस्टकडून करण्यात आलेली नाही. ट्रस्टतर्फे येणाऱ्या पैशातून मंदिराचा खर्च भागविला जातो.

## जेजुरी (महाराष्ट्र) येथील मंदिरे :

जेजूरी हे गाव पुण्याच्या अग्नेय दिशेस ३० मैल अंतरावर आहे. जेजूरी येथे कऱ्हे पठार व किल्ला-कोट अशा दोन ठिकाणी खंडोबाची स्थाने आहेत. हे जेजुरीच्या नैऋतेस सुमारे चार मैलावर उंचीच्या डोंगरावर आहे. कडे पठारावरून पूर्व व ईशान्य दिशेच्या सुमाराने सरळ चालत व पायऱ्या चढून गेल्यावर जेजुरीच्या खंडोबाचे सध्याचे टेकडीवरील देवालय लागते याचे बांधकाम सुभेदार मल्हारराव होळकरांनी केले आहे. महाराष्ट्रात जी प्रसिद्ध यात्रेची ठिकाणे आहेत त्यात जेजुरीची यात्रा प्रसिद्ध आहे. 'श्री क्षेत्र जेजुरी येथील

कोटाचे काम राजश्री मल्हारजी होळकर सुभेदार यांनी सुरू करविले. किल्ल्याचे कार्यास प्रारंभ शके १६५२ (ता. ९-३-१७३०) वैशाख शुद्ध ३ रोजी केला एकंदर खर्च ५८००,०० खर्च झाला. कारखान्यावर शामजी नारायण यांचे हातून हिशोब झाला. १ तलावाच्या कामास रु. १८००,००० खर्च झाला सुरूवात शके १६७८ साली"[४०]

मल्हारी मार्तंड हे होळकरांचे कुलदैवत त्यामुळे या देवस्थानासाठी होळकरांनी लाखो रूपये खर्च करून अनेक वेळा मंदिराचे बांधकाम केलेले आहे. खुद्द मल्हाररावांनी या मंदिराच्या किल्याचे काम इ. स. १७३० साली सुरू केले होते. त्यासाठी त्यांनी ५८ लक्ष रूपये खर्च केला होता. या मंदिराच्या बांधकामावर लक्ष ठेवण्यासाठी नारायण यांची नियुक्ती मल्हाररावाने केली होती. हा किल्ला बांधण्यास २६ वर्षे लागली होती. 'शामजी नारायण यांच्या मदतीसाठी अहिल्याबाई होळकरांनी सिधो बापूजी बेलसरे यास पाठविले."[४१] जेजुरी येथील किल्यास तीन दरवाजे आहेत. उत्तर दरवाजाने मंदिरात जाण्यास ३८५ पायऱ्या अहिल्याबाई होळकर यांनी बांधलेल्या आहेत. उत्तरेच्या दरवाज्यावरच देवस्थानाचा नगारखाना असून तो होळकरांनी सुरू केलेला आहे. या द्वाराने आत शिरताच पूर्वाभिमुख मल्हारी मार्तंडाचे मंदिर लागते. गाभाऱ्यात खंडोबा व म्हाळसा यांची दोन स्वयंभूलिंगे आहेत. तसेच खंडोबाची मूर्ती असून या मूर्तीच्या दोन बाजूने दोन दगडी मूर्त्या आहेत त्यांना बाळाई व जोगेश्वरी म्हणतात. या देवस्थानाची व्यवस्था पाहण्यासाठी सुभेदार मल्हारराव होळकर यांनी वेदमुर्ती शंकरभट, तानभट खाडे यांना आपले उपाध्य नेमले होते. '२० जुलै १७२९ वेदमुर्ती राजश्री शंकरभट, तानभट खाडे उपाध्ये क्षेत्र जेजुरी तीर्थ उपाध्येपण आम्ही तुम्हास दिले आहे तरी आम्ही अगर आमचे वौसीचे जे कोणी क्षेत्र मजकुरी येतील ते आपल्यास अगर आपले वौषजास पूजित जातील आपण ती मार्तंडती पास आमचे विराई अभिष्टचिंतन करीत जाणे"[४२] या देवस्थानच्या उत्पन्नासाठी

अहिल्याबाईंनी ८ लाख उत्पन्नाच्या जमिनी लावून दिल्या होत्या अशाप्रकारे तेथील देवस्थानच्या सुरक्षतेसाठी किल्ला बांधून त्याची व्यवस्था होळकर घराण्यांनी केली होती.

### १) जेजुरी येथील मल्हार गौतमेश्वराचे मंदिर :

जेजुरी येथील मल्हार गौतमेश्वराच्या मंदिराचे बांधकाम चालू असताना अहिल्याबाईंनी तेथील उपाधी सिधो बापू यास मंदिराचे व सभामंडपाचे काम लवकर आटपावे यासाठी पुढील सूचना केल्या आहेत. 'इ. स. १७९३ राजश्री निरो बापूजी निस्वत कारखाना जेजुरी यास तुम्ही पत्र पाठविली ते पाठवून लेखनार्थ अवगत झाला तयाची उत्तरे येणे प्रमाणे, १) श्री मल्हारेश्वरचे देवालयाचे काम होऊन सभामंडपाचेही काम आटपत आले, दोन थर मात्र राहिले ते सत्वरीच होती म्हणोत लिहले त्यास सभामंडपाचे काम कापणी पर्यंत झालेच पाहिजे. राहिले ते सत्वरीच आटोपून घेणे. २) नंदीचे चौथऱ्याचे काम चांगले आणि लौकर आटोपो असे करणे, ३) नंदी करता पाषाण तीन चार काढले ते फुटके निघाले याजकरता दुसरा अडीच गज उंचीचाच काढला आहे. आणावयास आटाहास्य लागेल. आता नंदी तयार करविता म्हणून लिहिले त्यास आणावयाची तजवीज करून नंदी सत्वर सिद्ध होय ते करणे पत्रे पाठवून कारखान्यासंबंधी वगैरे सविस्तर लेखण करीत जाणे'[४३] अशाप्रकारे जेजुरी गावाच्या अग्नेय दिशेस अहिल्याबाई होळकर यांनी ६०,००० रुपये खर्च करून मल्हार गौतमेश्वराचे मंदिर बांधले आहे. अशा प्रकारचे उल्लेख कागदपत्रात आहेत.

मल्हार गौतमेश्वराचे मंदिर बांधकाम हेमाडपंथी पद्धतीचे आहे. मल्हार गौतमेश्वराचे मंदिर अद्यापही चांगल्या स्थितीत आहे. या मंदिराची व्यवस्था जेजुरी येथील खाजगी देवी अहिल्याबाई चॅरिटीज ट्रस्टतर्फे पाहण्यात येते. अद्यापही देवस्थानाला इनाम दिलेल्या जमिनी आहेत. अशाप्रकारे तत्कालीन कालखंडात अहिल्याबाईंनी शिल्पकला, वास्तुकला यांना प्रोत्साहन दिले. अनेक लोकांच्या हातांना काम उपलब्ध करून दिले. अनेक ठिकाणी सभामंडप बांधून सार्वजनिक कार्यास प्रोत्साहन दिले.

खंडोबाचे भक्त म्हणून वाघ्या-मुरळी यांना ओळखले जाते ते लोकांचे मनोरंजन करतात. मराठा कालखंडात त्यांची मोठ्या प्रमाणात बेठबिगारीतून माफी मिळवून दिली होती. हीच व्यवस्था अहिल्याबाई होळकरांनी चालू ठेवून त्यांच्या उपजिविकेसाठी जेजुरीच्या कऱ्हे पठारावरील गवत कापण्याचे काम या लोकांना दिले होते त्यातून त्यांचा उदर-निर्वाह होत असे अशा प्रकारे पारंपारिक कलाकारांची सोय अहिल्याबाईंनी केली होती.

भारतामध्ये प्राचीन काळापासून शिक्षणाचे कार्य हे मंदिरातून चालत असे. धर्मग्रंथाचे वाचन, ज्योतिषशास्त्र, न्यायविषयक, धर्मशास्त्राचे वाचन, पठण इत्यादी प्रकारचे शिक्षण मंदिरातून चालत असे. आजच्या सारख्या शिक्षणसंस्था तत्कालीन कालखंडात नव्हत्या. वेगवेगळे धर्माची मंदिरे व मसीदी प्रबोधनाची साधने होती. हिंदूचे प्रबोधन मंदिरातून तर मुस्लिमांचे प्रबोधन मसीदीतून चालत असे. भारतामध्ये ज्या संस्कृत पाठशाळा असत त्याही तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी असत. त्यामुळे तत्कालीन राजे संस्थानिक, धनिक लोक मंदिरे बांधत असत. अहिल्याबाई होळकरही त्याला अपवाद नव्हत्या त्यांनीही संपूर्ण भारतात तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी, ज्या भागात यात्रा भरतात त्या ठिकाणी मंदिरे बांधल्याचे संशोधनातून दिसूण येते. आज २१ व्या शतकातही आमदार निधी, खासदार निधी यातून अनेक समाजमंदिरे, गावातील जुन्या मंदिरांचा जीर्णोद्धार करून दिला जातो याच्या मागचा उद्देश प्रामुख्याने लोकांचा राज्यकारणासाठी पाठिंबा मिळवणे हा आहे. परंतु मराठा कालखंडात विविध यात्रा, उत्सवाच्या निमित्ताने धार्मिक जागृतीतून लोकांना एकत्र आणने हा उद्देश होता. आजच्या लोकशाहीच्या कालखंडात धर्माच्या नावाखाली जागतिक पातळीवर व भारतात राजकारण केले जात आहे. वेगवेगळ्या धर्माच्या लोकांचा पाठींबा मिळवण्यासाठी त्यांना सवलती देणे. धर्माच्या नावाखाली लोकांना प्रोत्साहीत करून त्यांचा पाठींबा मिळवणे हा अधर्म भारतामध्ये चालू झाला आहे. हे आजच्या लोकशाही

व्यवस्थेला हानीकारक आहे. परंतु तत्कालीन कालखंडात मंदिरे बांधण्यामागे लोककल्याण हा अहिल्याबाईचा हेतू होता.

**२) जेजुरी येथील विठ्ठल मंदिर :**

जेजुरी या ठिकाणी अहिल्याबाईनी विठ्ठल रुक्मिणीचे मंदिर बांधलेले आहे हे मंदिर २८ बाय २० अशा लांबी रुंदीचे आहे. मंदिराच्या भिंती चुना आणि विटा यांच्या बांधलेल्या असून मंदिरास कळस नाही तर पत्राचे शेड आहे. मंदिराचा दरवाजा लाकडी आहे. आतील बाजूस २२ फूट लांबी रुंदीचा सभा मंडप असून त्यात विठ्ठल रुक्मिणी यांच्या मुर्ती पाषाणाच्या आहेत. जेजुरी येथे पौष आणि माघ पौर्णिमेस मोठी यात्रा भरते यावेळी अनेक गावावरून देवाच्या काठ्या येतात. या काठ्यामध्ये होळकरांच्या काठ्या मुख्य असतात. या काठ्या मिरवणुकीने गडावर येतात. यावेळी एळकोट, एळकोट जय मल्हार असे जयघोष करून भंडारा म्हणजे हळद खोबरे उधळतात.

जेजुरी या देवस्थानास मराठा कालखंडात अनेक जणांनी भेटी दिल्याचे उल्लेख आहेत. छत्रपती शिवाजी महाराज जेजुरीला येवून गेल्याचे उल्लेख येथील शिलालेखात सापडतात.

**चांदवड येथील मंदिरे :**

**१) रेणुका मंदिर :**

चांदवड हे नाशिक जिल्ह्यात आहे. मल्हारराव होळकरांना चांदवडची जाहगिरी सरदेशमुखी म्हणून मिळाली होती. चांदवड हे मल्हाररावांच्या उपराजधानीचे गाव होते. नाशिकपासून ४० मैल अंतरावर असून मुंबई-आग्रा रोडवर हे गाव आहे. गावाजवळ तांबकडा नावाचा सह्याद्रीचा एक डोंगरकडा आहे. त्या कड्यावर रेणुकादेवी मंदिर आहे. डोंगराच्या कडेला कोट बांधून एक कमान उभारण्यात आली आहे. देवळाच्या दोन्ही बाजूस ओवऱ्या आहेत याचा उपयोग धर्मशाळा म्हणून होतो.

नवरात्र नऊ दिवस आणि वटपौर्णिमेला एक दिवस चांदवडच्या रेणुका देवीची मोठी यात्रा असते. चांदवडीच्या देवीस अहिल्याबाई होळकरांनी सोन्याचे दागिने घातल्याचे उल्लेख मिळतात. यात्रेकरूंसाठी पिण्याच्या पाण्यासाठी दोन टाक्या बांधल्या आहेत. 'देवीचे मंदिर आतून बाहेरून जुन्याच बांधणीचे असून संपूर्ण बांधकाम अहिल्याबाईच्या वेळचे आहे.'[४४] आजही संपूर्ण व्यवस्था ट्रस्टमार्फत केली जाते.

**२) मारूती मंदिर :**

चांदवड येथे अहिल्याबाई होळकरांनी मारूती मंदिर बांधले आहे. मंदिराच्या गर्भग्रहाच्या मागील भिंतीतच अंगचीच मारूतीची लहान पाषाणाची मूर्ती आहे. या मंदिराच्या उजव्या बाजूस महादेवाचे आणि डाव्या बाजूस दुसरे गणपतीचे लहान मंदिरे आहेत. या मंदिरासमोर एक लहान कुंड असून या कुंडात अद्यापही पाणी आहे. मारुती मंदिराचे बांधकाम दगडाचे आहे. या मंदिराची व्यवस्था होळकर येथील खाजगी ट्रस्ट पाहते.

**३) विठ्ठल मंदिर :**

अहिल्याबाईनी बांधलेले मंदिर चांदवड गावाच्या मध्यभागी असून मंदिराचे बांधकाम वाड्याप्रमाणे लाकडाचे आहे. मंदिर दोन मजली आहे. आत चौरस सभागृह, सभागृहात उंच चौथऱ्यावर विठ्ठल रुक्मीण यांच्या पाषाणाच्या मुर्त्या आहेत. मंदिराचा उपयोग पुराण, प्रवचन, किर्तन तसेच अनेक प्रबोधनाचे कार्यक्रम चालतात.

**४) कार्तिकेश्वर महादेव मंदिर :**

मुंबई-आग्रा रोडवर हे मंदिर आहे. मंदिराचे क्षेत्र एक एकर आहे. मंदिराचे प्रवेशद्वार दगडी महीरपीचे आहे. त्यावर नक्षीकाम आहे. आतील गर्भगृहात महादेवाची पिंड आहे. मंदिराची व्यवस्था खाजगी ट्रस्ट चांदवड पाहते. साफसफाईसाठी पगारी नोकराची व्यवस्था करण्यात आलेली आहे. त्यामुळे मंदिर आजही चांगल्या अवस्थेत आहे.

## ५) कृष्ण मंदिर :

चांदवड येथील जुन्या महालात राधाकृष्ण मंदिर अहिल्याबाईनी बांधलेले आहे. या मंदिराचे बांधकाम लाकडाचे आहे. मंदिरास प्रशस्त असा सभा मंडप असून त्याला १२ खांब दगडाचे आहेत. या सभामंडपात एका बाजूस उंच दगडी चौथऱ्यावर राधाकृष्ण यांच्या कृष्णवर्णीय पाषाणाच्या मूर्त्या आहेत. 'शंकर हरी दिक्षित हे या मंदिराचे पुजारी असून त्याच्यापुर्वीच्या आठव्या पिढीत त्यांच्या वंशजांना हे मंदिर अहिल्याबाईंनी दान दिले होते. अहिल्याबाईंनी या मंदिरासाठी त्यांच्या वंशजाना १५० रुपये वर्षासन दिले होते'[३५] पुजाऱ्याचे वंशज आजही मंदिराची व्यवस्था पाहतात.

## ६) मारूती मंदिर :

मारूती मंदिर चांदवड गावाच्या बाहेर आहे. मंदिराचे प्रवेशद्वार दक्षिणेला आहे. संपूर्ण मंदिराचे बांधकाम काळ्या पाषाणाचे प्रवेशद्वार दगडी महिरपीचे असून त्यावर नक्षीकाम कोरण्यात आलेले आहे. आतील गर्भगृहात मारूतीची उभी मूर्ती आहे. मंदिरावर मोठा दगडी घुमट असून त्या समोर पुन्हा ५ लहान घुमट आहे. मंदिराची उंची साधारणत: ५० फूट आहे. मंदिराच्या समोर १२ फूट उंचीच्या दगडाच्या २ दिपमाळा आजही आहेत. मंदिर अतिशय चांगल्या अवस्थेत असून मंदिराची व्यवस्था ट्रस्ट पाहते.

चांदवड हे होळकरांचे उपराजधानीचे ठिकाण असल्यामुळे अहिल्याबाईने तेथे अनेक मंदिरे बांधली. तेथे असलेल्या शिलालेखावरती ही वरील माहिती मिळते. त्यांनी मंदिरे बांधून त्याची व्यवस्था पाहण्यासाठी पुजाऱ्यांना गावे इनाम दिली. चांदवडला रेणुका देवीच्या यात्रेवेळी यात्रेकरूंना राहण्यासाठी धर्मशाळा बांधली.

## पुणतांबे येथील व्यंकटेश मंदिर :

पुणतांबे हे गाव गोदावरी नदीकाठी वसले आहे. ते अहमदनगर जिल्ह्यात येते. या संपूर्ण गावाला अहिल्याबाईनी तत्कालीन कालखंडात तटबंदी बांधून दिली. या गावात

अहिल्याबाईनी बालाजी व्यंकटेशाचे मंदिर बांधले आहे. मंदिराचे बांधकाम चुना आणि विटा यांच्यात करण्यात आले आहे. एकच गाभारा असून उंच चौथऱ्यावर अनेक लहान मोठ्या मूर्त्या आहेत. त्यातील काही पितळी आहेत. अहिल्याबाईंनी बालाजी व्यंकटेश या मंदिरासाठी ५ पुजाऱ्यांची नेमणुक केली होती. त्यांना निरनिराळ्या नेमणूका दिल्या होत्या. 'बालाजी व्यंकटेश्वरा (पु) १) विश्वनाथ काशिनाथ, २) गंगाधर लक्ष्मीकांत, ३) आबाजी कावजी, ४) नारायण मनोहर, ५) लक्ष्मीकांत व्यंकटेश (जहाँगीर गावचे उत्पन्न) गोरठ्या उत्पन्न १३०१ पुणतांबे येथे ६० बिघे जमीन उत्पन्न २००, अवांतर उत्पन्न ४१ रुपये भिकणगावातून चित्तलिता कोपरगांव येथे बिघ ५ उत्पन्न ५०'[४६] गोरठ्या या होळकरांच्या खासगी जहागिरीत असलेल्या गावाचे १३०१ रु. एवढे उत्पन्न या पुजाऱ्यांना नेमणूकीसाठी देण्यात आले होते. पुणतांबे येथील ६० बिघे आणि कोपरगाव तालुक्यातील चित्तलीता या गावातील १५ बिघे जमिन देवस्थानला देण्यात आली होती.

**महाबळेश्वर येथील रेवाडेश्वर मंदिर :**

महाबळेश्वर महाराष्ट्रातील एक प्रसिद्ध पर्यटन स्थळ व थंड हवेचे ठिकाण आहे. साताऱ्याच्या वायव्येस ५३ कि. मी. 'शहरापासून उत्तरेस सुमारे चार कि. मी. वर जुने क्षेत्र महाबळेश्वर आहे यावरून या गिरीस्थानाला महाबळेश्वर हे नाव पडले. महाबळेश्वराच्या मंदिराजवळ कृष्णाबाई व अनिबलेश्वर (विष्णु) ही दोन मंदिरे आहेत. कृष्णाबाई मंदिरात कृष्णा, कोयना, वेणा, गायत्री व सावित्री ह्या पाच नद्यांचे पाणी एकत्र येऊन एका गोमुखातून एका कुंडात पडते व त्यातून दुसऱ्या कुंडात जाते याला ब्रह्मकुंड असे म्हणतात'[४७] या ठिकाणी 'अहिल्याबाई होळकरांनी रेवाडश्वराचे मंदिर बांधले'[४८] मंदिर आजही चांगल्या स्थितीत आहे. पंढरपूर ट्रस्ट तर्फे देवस्थानाची व्यवस्था पाहण्यात येते.

**भुसावळ खानदेश येथील चांगदेव मंदिर :**

या चांगदेव मंदिराचे शंकर गुरव हे पुजारी असून त्यांच्या वंशजांना चांगदेव मंदिराच्या पुजेची सनद दिली आहे. ही सनद आज उपलब्ध नाही. त्यांना १७१ रुपये इंदोर ट्रस्टकडून मानधन येते. चांगदेवाचे मंदिर पुरातन असून दगडी आहे. हे मंदिर तापी-पूर्णाच्या काठावर आहे. होळकर इतिहासात याचा उल्लेख पुढीलप्रमाणे सापडतो 'भुसावळ खानदेश चांगदेवाचे मंदिर, तापी पूर्णा संगमावर'[४९]

**किल्लेधारूर येथील अंबादेवीचे मंदिर :**

किल्ले धारूर हे बीड जिल्ह्यातील तालुक्याचे गाव आहे. या ठिकाणी अहिल्याबाई होळकर यांनी अंबादेवीचे मंदिर बांधले. 'धारूर किल्या परिसराच्या बाहेरही अनेक प्रेक्षणीय स्थळे आहेत. किल्याच्या पश्चिमेस अंदाजे दोन किलोमीटर अंतरावर दर्शन अंबादेवीचे मंदिर आहे. नवरात्रात येथे भाविकांची गर्दी होते'[५०] हे मंदिर अहिल्यादेवीने बांधल्याचे उल्लेख सापडतात.

महाराष्ट्रात अशी अनेक मंदिरे अहिल्याबाईनी बांधलेली आहेत परंतु त्याचे कागदोपत्री उल्लेख नाहीत. काही ठिकाणी शिलालेख आहेत त्यावरून पुरावे उपलब्ध होतात. तत्कालीन कालखंडात धार्मिक कार्याबाबत अहिल्याबाईच्या दातृत्वाचा लौकिक सर्वदूर पसरला होता. त्यामुळे वेगवेगळ्या भागातून व्यक्ती येऊन त्यांनी मंदिरे बांधण्याची विनंती करत असत त्यांना अहिल्याबाईंच्याकडून आर्थिक मदत मिळत असावी असे संशोधनातून दिसून येते. काही गावातील मंदिराविषयी वृद्ध लोक हे मंदिर अहिल्याबाईंनी बांधले असे सांगतात. अशाप्रकारे अहिल्याबाईनी महाराष्ट्रात अनेक ठिकाणी धार्मिक कार्य केले आहे.

**अहिल्याबाई होळकर आणि शैव संप्रदाय :**

प्राचीन काळात पूर्ण पेटलेल्या अग्नीची पूजा केली जात असे. पूर्ण पेटलेल्या अग्नी यालाच शिवस्वरूप मानले जात होते. शिव म्हणजे कल्याणकारी सर्व प्राणीमात्राचे पोषण करणारी देवता हे एक प्रतीक तयार झाले होते. पुराणकाळात निरनिराळे भक्तीमार्ग उदयास येऊन अनेक संप्रदाय निर्माण झाले होते असे असले तरी शैव आणि वैष्णव हेच दोन प्रमुख संप्रदाय होते. मध्ययुगीन आणि मराठा कालखंडातही हेच संप्रदाय प्रमुख होते. मराठा कालखंडात मात्र या संप्रदायाच्या अनेक लोकांचा राजकीय क्षेत्रात उत्कर्ष होऊन ते सरदार या पदाला पोहचले होते. पेशव्यांच्या प्रमुख सरदारात होळकरांचा सहभाग असून त्यांचे घराणे शैव संप्रदायी होते. याच घराण्यातील अहिल्याबाई होळकर होत्या. त्यांनी अनेक मंदिरे बांधली असली तरी त्यात प्रामुख्याने शिव मंदिराचा समावेश जास्त आहे. 'होळकरांचे घराणे शैव पंथी, तेव्हा कुलाचारा प्रमाणे शैवपंथाकडे म्हणजे श्री शंकराच्या मंदिराकडे त्यांचे लक्ष जाणे साहजिकच आहे.'[५१]

अहिल्याबाई होळकरांनी बारा ज्योतिर्लिंगापैकी नविन बांधलेली व जीर्णोद्धार केलेली मंदिरे :

संपूर्ण भारतात बारा ज्योतिर्लिंग आहेत ते पुढीलप्रमाणे - १) सौराष्ट्र देशात सोमनाथ (गुजरात राज्य), २) श्री शैल पर्वतावर मल्लिकार्जुन (आंध्र प्रदेश), ३) उज्जैनिस महाकाल (म. प्रदेश), ४) ओंकारेश्वर व मंगलेश्वर (म. प्रदेश), ५) परळी वैजनाथ (महाराष्ट्र), ६) भीमाशंकर (महाराष्ट्र), ७) रामेश्वर (मद्रास), ८) औढा नागनाथ (महाराष्ट्र), ९) काशी विश्वेश्वर (उ. प्रदेश), १०) त्र्यंबकेश्वर (महाराष्ट्र), ११) हिमालयाती केदारनाथ (उ. प्रदेश), १२) वेरूळ येथील घृषणेश्वर (महाराष्ट्र) या ज्योतिर्लिंगापैकी सोमनाथ व काशी येथील मंदिरे अहिल्याबाईंनी संपूर्णपणे नव्यानी

बांधलेली आहेत. परळी वैजनाथ, ओंकारेश्वर, ममलेश्वर आणि घृषणेश्वर या ज्योतिर्लिंगाचा जीर्णोद्धार केलेला आहे.

## १) सोमनाथ (गुजराथ) :

सोमनाथ हे बारा ज्योतिर्लिंगातील आद्य असे ज्योतिर्लिंग असून भारतातील अतिप्राचीन असे शैवक्षेत्र आहे. 'इ. स. ६४९ मध्ये मैत्रक वंशातील राजा धरसेन याच्या राजवटीस दुसरे दगडी नवे देवालय उभे करण्यात आले. हे मंदिर स्थापत्य कलेच्या दृष्ट्या व कला दृष्ट्या वैभवशाली होते. याचा सभा मंडप उघडा असून त्याच्या पायऱ्या समुद्राकडे होत्या. मंदिराच्या दक्षिणेला समुद्राच्या लाटा अडविण्यासाठी प्रचंड तटबंदी होती.'[५२] सोमनाथ मंदिरातील गाभाऱ्यांत रत्नदीपांचा लखलखाट अहोरात्र असायचा, देवाच्या भांडारगृहात अमाप द्रव्याचा साठा होता.

११ व्या शतकात सौराष्ट्रात चालुक्य वंशीय भीमदेव या शिवभक्त राज्याच्या कारकिर्दीत १०२५ मध्ये गझनीच्या महंमदने सोमनाथावर स्वारी केली 'चुंबकाच्या चमत्कृतीपूर्ण कैशल्यामुळे, अधांतरी असलेली सोमनाथाची भव्य मूर्ती गझनीच्या महंमदाने शुक्रवार ता. ११ मे १०२५ च्या सकाळी ९:४५ वाजता फोडून तोडून 'मूर्तिभंजक' हा किताब मिळवला त्याने या मंदिरातील अठरा कोटीची लूट केली'[५३] 'इ. स. ११६९ साली गुजराथचा राजा कुमारपाल याने सोमनाथाचे मंदिर पुन्हा बांधले. ते इ. स. १२९७ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीने आपल्या सेनापती अलतफखान यास पाठवून उध्वस्त केले. पुन्हा इ. स. १३२५ मध्ये जुनागडचा राजा महिपाल याने हे मंदिर बांधले व या देवस्थानाला पुन्हा वैभवाचे दिवस येवू लागले परंतु इ. स. १४६९ च्या सुमारास महंमद बेगडाने हे मंदिर लुटले.'[५४] दुसरा मजफरशहा याने हे मंदिर लुटले आणि इ. स. १७०१ मध्ये औरंगजेबाने संपूर्ण मंदिराची नासधूस केली यानंतर जवळ जवळ ८० वर्षे हे मंदिर भग्नावस्थेत होते. इ. स. १७८३ साली अहिल्याबाई होळकर यांनी सोमनाथाचे नवीन मंदिर बांधले. याचा

कागदोपत्री उल्लेख पुढीलप्रमाणे 'सोरटी सोमनाथ येथील देवालय नूतन करविले तेथे दहा हजाराच्या हुंड्या देऊन कारकून पाठविला.'[५५]

ही नोंद इ. स. १७८५ ची आहे म्हणजे यावेळी सोमनाथाच्या मूर्तीची स्थापना करून वाखपूजा करण्यात आली असावी कारण यावेळी मंदिराचे काम पूर्ण झालेले असून कारकूनाबरोबर दहा हजार रुपयांची हुंडी पाठविण्यात आली आहे.

हे गाव यावेळी नवाबाच्या ताब्यात असून शिवलिंग मशिदीत अडकलेले होते. अशा परिस्थितीत नवीन मंदिर बांधून त्यात मूर्तीची स्थापना करणे त्यातून अहिल्याबाईचे धार्मिक कर्तव्य स्पष्ट होते. इ. स. १९५१ मध्ये भारताचे गृहमंत्री सरदार वल्लभाई पटेल यांच्या नेतृत्वाखाली सोमनाथाचे दुसरे मंदिर बांधले आणि ११ मे १९५१ रोजी डॉ. राजेंद प्रसाद यांच्या हस्ते मूर्तीची प्राण प्रतिष्ठा केली. यावेळी वेदमुर्ती तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी पौरिहित केले होते.

अशाप्रकारे अनेकवेळा मुस्लिम राजवटीत हे मंदिर उध्वस्त केले. अनेकदा ते बांधण्यात आले परंतु अहिल्याबाईनी बांधलेल्या मंदिराच्या विस्मृती करू शकत नाही. कारण अहिल्याबाईनी बांधलेले मंदिर हेच मुख्य मंदिर आहे.

## २) काशी विश्वनाथ :

काशीचे दुसरे नाव वाराणसी आहे. प्राचीन काळापासून प्रसिद्ध असलेल्या या क्षेत्राचे वैभव आणि हिंदूचे पावन, पवित्र, विशाल काशी क्षेत्राचे महत्त्व मुसलमानी राज्यकर्त्यांना सहन झाले नाही. इ. स. १०३३ ते इ. स. १६६९ पर्यंत यांनी या तीर्थक्षेत्रांचा अनेकवेळा विध्वंस केला. 'सिकंदर लोदीने इ. स. १४९४ मध्ये हे मंदिर पूर्णपणे उध्वस्त करून ते बांधण्याचा पुन्हा कोणी प्रयत्न करू नये अशी आज्ञा काढली'[५६] १५६९ मध्ये तेथील लोकांनी बादशाहाच्या याचना करून मंदिर बांधण्यास परवानगी मिळवली व मंदिर बांधण्यात आले. परंतु औरंगजेबाने सत्तेवर येताच काशी या तीर्थक्षेत्रावर आक्रमण करून

काशी विश्वनाथाच्या मंदिराबरोबर काशीमधील अनेक मंदिरे उध्वस्त केली. 'इ.स. १६६९ मध्ये काशी विश्वनाथाचे मंदिर पूर्णपणे नष्ट करून त्याठिकाणी मशिद बांधली' [५७] ती मशिद अद्यापही त्या जागेवर आहे.

पेशव्यांच्या कारकिर्दीत हिंदूची तीर्थक्षेत्रेच आपल्या ताब्यात यावीत म्हणून सर्व पेशव्यांनी प्रयत्न केले होते. माधवराव पेशव्यांनी आपल्या मृत्युपूर्वी राज्यातील प्रतिष्ठित मुत्सद्यांकडून आपल्या नऊ कलमी यादीच्या अंमलबजावणीबद्दल शपथा घेतल्या त्या यादीतील एक कलम पुढीलप्रमाणे होते. 'काशी प्रयाग ही दोन स्थळे सरकारांत यावी असा तीर्थरूपांचा हेतू होता. त्यास प्रस्तुत करण्याजोगे दिवस आहेत. प्रयत्न करून दोनही स्थळे हस्तगत करावी' [५८] या दृष्टीकोनातून मल्हारराव होळकरांनी प्रयत्न केला 'मल्हारजीचे चित्रांत की मशीद श्री विश्वेश्वराची ज्ञानवावी जवळी ते पाडून देवालय करावे सर्वांचे चित्तास येत नाही, ब्राह्मण चिंता करतात, दुर्दशा होईल म्हणोन' [५९] इ. स. १७४३ च्या सुमारास सुभेदार मल्हारराव होळकर उत्तरेच्या मोहिमेवर असताना काशी येथे गेले त्यावेळी विश्वनाथाच्या जागेवरील पुर्नस्थापना करावी अशी त्यांची इच्छा होती परंतु मुस्लिम शासकांच्या भितीने काशी येथील सर्व ब्राह्मणांनी मल्हाररावाच्या या विचारास मान्यता दिली नाही.

नाना फडणीसांनी काशी येथील विश्वनाथाचे मंदिर बांधण्यासाठी प्रयत्न चालविले होते यावेळी उत्तरेत महादजी शिंदे यांचे चांगले वजन असून त्यांनी दिल्ली दरबार व मुस्लिम अमीर उमराव आणि इंग्रज वचकून होते. म्हणून महादजी शिंदे यांच्या दिवाणास पत्र पाठविले होते. 'श्री काशी क्षेत्रात श्री विश्वेश्वराचे देवालय एक हजार वर्षाचे जुने त्यास विश्वेश्वराचे स्थळ मोकळे होऊन पूर्ववत देवालय व देवस्थापना व्हावी हे हिंदूधर्मास योग्य आहे. याकाळी पातशहा जवळ उद्योग केल्यास होईल असे आहे. त्यास ऐसी गोष्ट जाहली पाहिजे फिरोन दावा न राहे. पूर्वापार मजकूर पातशहास समजावून कधी कोणाकडून उपद्रव न

होयसे पत्र करून घ्यावे या गोष्टीचा उद्योग जरूर करावा'[६०] नानांच्या या पत्रास महादजी शिंदे यांच्या दिवाणाने पुढील प्रमाणे उत्तर दिले. 'गोष्ट पाटील बाबाशी दोन चार वेळा बोललो त्यास काशीचा मजकुराचा जाबसाल स्पष्ट काहीच सांगितला नाही. लांबणीचा जाबसाल बोलतात की ही गोष्ट केल्यास सर्वा यवनास वाकडे वाटेल अस्फत दौल व इंग्रज एक आहेत त्याचीही भीड इंग्रजास पडेल अशी पर्यायाची बोलणी बोलतात परंतु आम्ही त्यास सांगतो की येणे करवून आपला सर्व हिंदूत नक्ष होईल, सरकार सेवाही थोरलीच घडेल किर्तीस्पद होईल'[६१] अशाप्रकारे आपले म्हणने महादजी शिंदे यांनी नानास कळविले.

औरंगजेबाने जुने काशी विश्वनाथाचे मंदिर उध्वस्त केल्यावर शंभर वर्षे या देवासाठी देवालय नव्हते. विश्वनाथाचे शिवलिंग विहरीत टाकण्यास आले होते 'अठराव्या शतकाच्या अखेरीस अहिल्याबाई होळकरांनी सध्याचे मंदिर बांधले हे मंदिर लहानसे असून मध्यभागी एक चौरस कुंड असून त्यात विश्वश्वरलिंगाची स्थापना करण्यात आलेली आहे. यात्रेकरू अभिषेकाचे पाणी, फुलपत्री आणि पूजाद्रव्य त्या कुंडातच टाकतात व हाताने चाचपडून विश्वेश्वराला स्पर्श करतात या मंदिराचा कळस सोन्याचा आहे. पंजाबचा महाराजा रणजीतसिंग याने कळसाचे काम केले' [६२] काशी विश्वनाथ मंदिराची लांबी ५५ फूट व रुंद ३८ फूट असून एक लक्ष रुपये खर्च करून अहिल्याबाईनी हे मंदिर बांधलेले आहे.

अशाप्रकारे अहिल्याबाईंनी मुस्लीम व हिंदूच्या धार्मिक भावना लक्षात घेवून मशिद न पाडता त्यापासून काही अंतरावर त्यांनी नवीन मंदिराची उभारणी केली. मुस्लिम लोकांना न दुखविता हा प्रश्न सोडविला. आजपर्यंतच्या राज्यकर्त्यांना जे शक्य झाले नाही ते अहिल्याबाईंनी करून दाखविले व खऱ्या अर्थाने धर्मनिरपेक्षतेची अंमलबजावणी तत्कालीन कालखंडात करून दाखविली.

## ३) परळी वैजनाथ येथील ज्योतिर्लिंग :

देशातील बारा ज्योतिर्लिंगापैकी महाराष्ट्रात पाच ज्योतिर्लिंग असून मराठवाड्यात तीन ज्योतिर्लिंगे आहेत. परळी वैजनाथ हे ज्योतिर्लिंग बारा ज्योतिर्लिंगातील पाचव्या क्रमाकांचे आहे. परळी हे क्षेत्र बीड जिल्ह्यात असून अंबेजोगाई पासून पूर्वेकडे १५ मैल अंतरावर आहे.

परळी वैजनाथ येथील ज्योतिर्लिंगाचे मंदिर प्राचीन असावे असे येथील एका शिलालेखावरून कळते. पूर्वेकडे असलेल्या जुन्या घाटाच्या एका दगडावर शके १९०८ ही नुसती नोंद मात्र केलेली पाहवयास मिळते. या क्षेत्राला वेगवेगळ्या कालखंडात वेगवेगळी नावे होती. परळी येथील वैजनाथाला वैद्यनाथ असेही म्हणतात. इ. स. १७८४ साली अहिल्याबाईनी या मंदिराचा जीर्णोद्धार केला. या क्षेत्राचा जीर्णोद्धार अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण असा आहे. '२०५ वर्षापूर्वी जेव्हा अहिल्याबाईंनी या मंदिराचा जीर्णोद्धाराची योजना आखली तेव्हा जीर्णोद्धारासाठी आवश्यक तितका दगड कोठून आणावा ही विवंचना पडली शेवटी उत्तर सीमेवरील त्रिशुला देवीच्या डोंगराला तसा दगड मिळाला व कामास प्रारंभ केला. अहिल्याबाईंच्या योजनेप्रमाणे पाहिजे तितका दगड तेथे मिळाला आणि वैजनाथ मंदिराची आज उभी असलेली वास्तू भव्य अशा स्वरूपात उभी राहिली.'[६३]

अहिल्याबाईनी जीर्णोद्धार केलेले मंदिर यात अहिल्याबाईचा शिलालेख आहे तो पुढीलप्रमाणे -

> प्रसादोनृपशालिवान शके षटशून्य सप्तेदुभि
> श्यक्रेयम्प्रमिते भृगौ मधुशुयौ पक्षे तियौ पंचमे ॥
> खंडेराय सुकांतया सुतनया मल्हारी नाम्मो विभो इथे
> क्रोभिनि थैव होलकरया कांत्या स्नुषा अहल्याय ॥

श्रीमंत राजे मल्हारराव होळकरांचे चिरंजीव राजे खंडेराव महाराज यांच्या साध्वी पत्नी अहिल्याबाईनी शालिवाहन शके १७०६ क्रोधिनी जाम संवत्सरे चैत्र शुद्ध पंचमी रोज शुक्रवारी हे मंदिर बांधले.

अहिल्याबाईनी जीर्णोद्धार केलेले मंदिर संपूर्ण बांधलेले आहे. मंदिर प्रदक्षीणेचा मार्ग प्रशस्त असा आहे मंदिराच्या वरील शिखराजवळ पूर्वभिमुख असा दीड फूट उंचीचा दगडाचा सुभेदार मल्हारराव होळकरांचा घोड्यावर बसलेला होळकरशाही पगडी घातलेला पाठीला ढाल, कमरेला तलवार, पायात मराठेशाही चढाव असा पुतळा आहे. हा पुतळा अहिल्याबाईनी तयार केला आहे असे संशोधनातून स्पष्ट होते. अशाप्रकारे अहिल्याबाई होळकरांनी परळी येथील प्राचीन लहानश्या मंदिराचा जीर्णोद्धार केला. त्याला भव्य आणि दिव्य स्वरूप प्राप्त करून दिले या बांधकामासाठी त्यांनी किती खर्च केला याबद्दल कागदोपत्रात उल्लेख नाहीत. मंदिराचे बांधकाम करताना ते तज्ञ लोकांकडून केलेले दिसते. अशाप्रकारे परळी वैजनाथ हे मंदिर अहिल्याबाईंनी बांधले.

## ४) ओंकारेश्वर (मध्य प्रदेश) :

कावेरी आणि नर्मदा यांच्या पवित्र संगमाच्या परिसरात ओंकारेश्वराचे मंदिर आहे. 'ओंकारेश्वर मंदिराचा आकार प्राचीन बौध्दविहिरा सारखा दिसतो. मंदिर प्रदक्षिणाच्या वाटेवर शेकडो भग्नमूर्ती व बौद्धविहारीच्या भग्न कमानी आढळतात. सांप्रताचे ओंकारेश्वराचे मंदिर अहिल्याबाई यांनी बांधलेले आहे. ओंकारेश्वराचे लिंग ओबड धोबड आहे. शिवाय हे लिंग नेमके शिखराच्या खाली नसून ते बरेच बाजूला आहे. या शिवलिंगाभोवती सदैव पाणी भरलेले असते. ओंकारेश्वराच्या जवळच पार्वती, गणपती यांच्या मूर्त्यांची स्थापना करण्यात आलेली आहे. मंदिराच्या दुसऱ्या मजल्यावर महाकालेश्वर लिंग व तिसऱ्या मजल्यावर वैधनाथेश्वर लिंग आहे. ही दोन्ही शिवलिंगे शिखराच्या खाली येतात.'[६४]

ओकारेश्वराच्या मंदिराच्या बाहेर पूर्वाभिमुख विशाल नंदीची स्थापना अहिल्याबाईनी केलेली आहे त्यानंतर तेथेच मामलेश्वराचे मंदिर आहे. औरंगजेबाने हिंदूचे अनेक मंदिरे नष्ट केली त्यामध्ये हे मामलेश्वराचे मंदिर उध्वस्त करून टाकले. या मंदिराचा जीर्णोद्धार नंतर अहिल्याबाई होळकर यांनी केला. 'ज्योतिर्लिंग ममलेश्वर महादेव मंदिर ५००० रुपये पक्के शिखरबंद बांधले'[६५] या मंदिरासाठी अहिल्याबाईनी नेमलेल्या पूजाऱ्यांना १३५ रुपये २ आणे नेमणूक होती अहिल्याबाई होळकर या स्वत: दरवर्षी ओंकारेश्वराच्या यात्रेला जात आणि त्याठिकाणी ध्वजोत्सव हा कार्यक्रम करीत व गोरगरीबांना वस्त्र वाटीत. ओंकारेश्वर येथे पर्वताच्या दोन्ही बाजूने नर्मदा व कावेरी वाहतात आणि पर्वताच्या एका टोकाजवळ त्यांचा संगम झालेला आहे. अशा प्रकारे अहिल्याबाईंनी ओंकारेश्वर मंदिर अहिल्याबाईंनी बांधले.

### ५) श्री घृणेश्वराचे ज्योतिर्लिंग (महाराष्ट्र) :

घृणेश्वर हे बारा ज्योतिर्लिंगातील महत्त्वाचे ज्योतिर्लिंग असून महाराष्ट्रातील पाचव्या क्रमांकाचे ज्योतिर्लिंग होय. वेरुळ हे क्षेत्र औरंगाबाद पासून १८ मैल अंतरावर आहे. औरंगजेबाने दक्षिणेवर स्वारी केली असता इतर देवस्थानाबरोबर घृष्णेश्वर मंदिराचीही मोडतोड केली तेव्हापासून मंदिर भग्न अवस्थेत होते पुढे इ. स. १७३० मध्ये अहिल्याबाईच्या सासू गौतमाबाई होळकर यांनी या मंदिराच्या जीर्णोद्धाराचे कार्य हाती घेतले आणि ते नंतर अहिल्याबाईने पूर्ण केले असे तेथील शिलालेखावरून कळते. 'इ. स. १७५४ मध्ये वेरूळ हा परगणा मोगल बादशहाने अहिल्याबाईस चोळीसाठी दिला होता'[६६] म्हणजे हे गाव त्यांच्या खाजगी उत्पन्नाचे होते त्यातून त्यांनी या देवस्थानाचा खर्च केला असावा.

ऐलगंगा नदीच्या काठी शिवालय तीर्थाच्या पूर्व दिशेला अर्धा मैल अंतरावर घृष्णेश्वर ज्योतिर्लिंग महादेवाचे मंदिर आहे हे मंदिर अतिशय नाविन्यपूर्ण आणि भव्य असे

आहे. मंदिराचा आवार मोठे असून त्याची लांबी-रुंदी पूर्व-पश्चिम २४० फूट आणि दक्षिणोत्तर १८५ फूट आहे मुख्य मंदिराची लांबी रुंदी बाहेरून ८४ बाय ८१ अशी आहे. मंदिरास महाद्वाराशिवाय दोन पक्षद्वार आहेत. मंदिराचे मुख्य प्रवेशद्वार असून द्वाराच्या मध्यभागी गणपती कोरण्यात आलेला आहे. सभा मंडपाच्या मध्यभागी ३ ते ४ फूट उंचीचा भव्य लाल पाषाणाच्या नंदी बसवण्यात आलेला आहे.

अशाप्रकारे घृष्णेश्वराचे मंदिराचा जीर्णोद्धार अहिल्याबाई होळकरांनी केला.

**अहिल्याबाई होळकरांनी ज्योतिर्लिंगाच्या ठिकाणी केलेली कामे :**

अहिल्याबाईंनी ज्या ठिकाणी तीर्थक्षेत्र आहेत त्या ठिकाणी कोणत्या ना कोणत्या स्वरूपात सामाजिक व धार्मिक कार्य केल्याचे स्पष्ट होते त्याच प्रमाणे १२ ज्योतिर्लिंगाच्या ठिकाणचे महत्त्व जाणून त्यांनी तेथे धार्मिक कार्य केले आहे. १२ ज्योतिर्लिंगापैकी सोमनाथ, सौराष्ट्र, उ. प्रदेश येथील काशी ज्योतिर्लिंगाच्या देवालयाचे बांधकाम नव्याने केले. म. प्रदेशातील ओंकारेश्वर, ममलेश्वर, तसेच महाराष्ट्रातील परळी वैजनाथ आणि वेरूळ येथील घृष्णेश्वर या मंदिराचा जीर्णोद्धार केला.

**६) श्री शैल्य मल्लिकार्जुन :**

श्री शैल्य मल्लिकार्जुन हे ज्योतिर्लिंग आंध्रप्रदेशच्या मध्यभागी दुर्गम पर्वत राजीमध्ये शैल्य पर्वतावर विराजमान असून समुद्रसपाटीपासून त्याची उंची १५६९ फूट इतकी आहे. श्री शैल्य या ठिकाणी अहिल्याबाईनी मंदिर बांधावे अशी हैद्राबाद येथील निजामाच्या दरबारात असलेल्या अहिल्याबाईच्या वकिलाची इच्छा होती आणि त्याने त्या दृष्टीने अहिल्याबाई पत्र पाठविले 'हिंदुस्थान, दक्षिण सर्वत्र तीर्थ बारा ज्योतिर्लिंगात महाराजांनी थोडे बहुत घाट, देऊळ हर एक कामे केली. मल्लिकार्जुनास काही न ऐकले तेथे ही एक दोन कामे घडोन यावी मोठी किंवा स्वल्प'[६७] याच पत्रात माधवराव लक्ष्मण यांनी येथील परिस्थिती अहिल्याबाईस कळविली होती. हे मंदिर डोंगरावर शिवाय अरण्यात असल्यामुळे दोन-तीन

महिनेच देवाचे पूजा अर्चा होते. देवापुढे येणारी ५० हजार रूपये दक्षिणा पठाणाकडे जाते म्हणून आपण या ठिकाणी काही व्यवस्था करावी. त्यानुसार अहिल्याबाईनी गोपाळ नारायण यांना शिवमंदिर बांधण्यासाठी रवाना केले आणि त्यांच्या बरोबर आपले आज्ञापत्र व नवाबास एक पत्र पाठविले तसेच मंदिराचा नकाशा पाठविला होता व माधवराव लक्ष्मण यांनी दरबारातून परवानगी घेण्याचे सांगितले.

या योजनेनुसार अहिल्याबाईंनी श्री शैल्य मल्लिकार्जुन येथे येणाऱ्या यात्रेकरूंची सोय व्हावी म्हणून 'एक घाट बांधला त्याच घाटावर शिवालयाचे देऊळ तयार करावयास एक कारकून राजश्री गोपाळ नारायण आले'[६८] श्री शैल्य मल्लिकार्जुनाच्या दर्शनाला जाताना गंगेत म्हणजे कृष्णा नदीत स्नान करून यात्रेकरू जातात. ही नदी ८० फूट खोल आहे. येथे स्नानासाठी जाणाऱ्या लोकांची मोठ्या प्रमाणात गैरसोय होत असे याठिकाणी अहिल्याबाईंनी घाट बांधला. या घाटावरच एक शिवमंदिर बांधले ते म्हणजे श्री शैल्य मल्लिकार्जुन ज्योतिर्लिंग होय.

### ७) महाकालेश्वर – उज्जैन येथील ज्योतिर्लिंग (म. प्रदेश) :

उज्जैन म्हणजे पूर्वीची अवांन्तिका नगरी सप्तपुऱ्यापैकी एक तसेच महाकालेश्वराचे ज्योतिर्लिंग उज्जैन येथे आहे. हे शहर मध्यप्रदेशातून असून इंदोर पासून ते ६५ ते ७० कि. मी. अंतरावर सिप्रा नदीच्या काठी वसलेले आहे. उज्जैन येथील महाकालेश्वराचे मंदिर प्राचीन काळी चंद्रसेन राजाने बांधले होते. या मंदिराचा दिल्लीच्या सुल्तानाने शमसुद्दीन अल्तमसने विध्वंस केला. यानंतर इ.स. १७३४ मध्ये राणोजी शिंदे यांनी या मंदिराचा जीर्णोदार केला. कोटीतिर्थातले शिवलिंग काढून त्याची विधीपूर्वक प्राणप्रतिष्ठा केली.

या देवस्थानला आहिल्याबाई होळकर यांनी 'तिंकजपूर आणि तिळोनी या गावातील ५४११८ रुपये आणि ९ पैसे एवढी उत्पन्नाची जमीन देवस्थानच्या जमीन इनाम दिलेली होती. या देवस्थानच्या पुजेअर्चेसाठी पुजारी नेमून त्यांना नेमणूका करुन दिल्या

होत्या. रामचंद्र शास्त्री ८३० रुपये १४ अने एवढा होता. अहिल्याबाईनी ३००० किंमतीचा बगीचा दिलेला होता'[६१] अशा प्रकार अहिल्याबाईनी महंकालेश्वर येथील जोतिर्लिंगांस धार्मिक कार्य केलेले होते.

## ८) भिमाशंकर जोतिर्लिंग(महाराष्ट्र):

१२ जोतिर्लिंगापैकी हे सहावे स्थान असून महाराष्ट्रातील हे दुसरे जोतिलिंग आहे. हे क्षेत्र पुण्यापासून १२० कि.मी. अंतरावर खेड अंबेगाव तालुक्यात आहे. हे देवस्थान अरण्यात असून समुद्र सपाटीपासून त्याची उंची ३४५४ फूट इतकी आहे. या मंदीराचा अनेक व्यक्तीनी जीर्णोद्वार केला. शेवटी नाना फडनविसानी या मंदिराच्या जीर्णोव्दाराचे काम हाती घेतले व त्यांच्या पत्नीने ते पूर्ण केले.

या देवस्थानासाठी अहिल्याबाईनी पुजेसाठी ब्राह्मणाची नियुक्ती केली होती. देवस्थान अरण्यात असल्यामुळे यात्रेकरुंच्या सोयीसाठी एक धर्मशाळा व एक विहीर बांधली होती. या देवस्थानासाठी महाशिवरात्रीत गंगेची कावड नेमून दिली होती. इत्यादी व्यवस्था तेथे अहिल्याबाईनी केल्या होत्या.

## ९) औढा नागनाथ येथील ज्योतिर्लिंग:

ओढा नागनाथ हे १२ जोतिर्लिंगातील आठवे स्थान आणि महाराष्ट्रातील तिसरे ज्योतिर्लिंग आहे. औढा नागनाथ हे क्षेत्र परभणी क्षेत्रात असून हिंगोली तेथून २० कि.मी. अंतरावर आहे. पुराण आणि पद्मपुराणात वर्णन केल्याप्रमाणे औंढा नागनाथ मंदिर युधिष्टीराने बांधून प्राण-प्रतिष्ठा केली असल्याचे उल्लेख मिळतात. या देवस्थानासाठी अहिल्याबाईनी गंगेची कावड नेमून दिली होती तसेच पुजेसाठी नेमणूक दिली होती. त्याचा कागदोपत्री उल्लेख पुढीलप्रमाण '१६-४-१७८४ रोजकिर्द मुक्काम महेश्वर यादी श्री औंढा नागनाथाचे पुजनाचे काम सरकारातून वेदशास्त्र संपन्न विठ्ठल भट्ट बिन लेंबकभट्ट उपनाम

भोपी वास्तव क्षेत्र आमरत ....सरकारचे तिर्थ पुरोहित याचकडे सांगून बारमाही नेमणूक येणेप्रमाणे"[७०]

औंढा नागनाथ मंदिरासाठी अहिल्याबाईची ८१ रुपयाची नेमणूक देवून त्यासाठी आंबड परगाण्यातील महालाचे उत्पन्न लावून दिले होते. विठ्ठल भट्ट, त्रिंबक भट्ट यांनी आपले पुरोहित नेमले होते. त्यांचे वंशज अद्यापही औंढा नागनाथ येथे देवाची पुजा करतात. या देवास अहिल्याबाईनी गंगेची कावड नेमून दिली होती.

## १०) त्रंबकेश्वर येथील ज्योतिर्लिंग :

बारा ज्योतिर्लिंगापैकी त्रंबेकश्वर हे १० वे स्थान व महाराष्ट्रातील ४ थे स्थान असून नाशिक जिल्ह्यात आहे. नाशिक पासून ३० कि.मी. अंतरावर गोदावरी काठी अंजिनेरी पर्वताच्या पायथ्याजवळ वसलेले आहे. या देवस्थानाच्या जीर्णोद्वारची सुरुवात इ.स. १७५५ मध्ये नाना फडणविसानी केली होती. हे काम ३१ वर्ष चालून १७८६ मध्ये संपले असा शिलालेख या मंदिराच्या उत्तर व्दारावर आहे.

या देवस्थानाच्या पुजेसाठी अहिल्याबाईनी दयाळ भट, रघुनाथ भट, आनंत भट या तीन बंधुना आपले तिर्थपुरोहित नेमले होते आणि त्याना पाच बिघे जमीन इनाम दिली होती तसेच बागेसाठी पाणी पुरवठा करण्यासाठी मोती तलाव बांधून दिला होता तो अद्यापही चांगल्या स्थितीत अस्तित्वात आहे. आपल्या पुरोहिताना वाडा बांधून दिला हा वाडा अद्याप सुस्थितीत आहे. पुजारी याचे वंशज याच वाड्यात रहातात. त्रंबेकश्वर जोतिर्लिंगाची नित्य पुजा अद्यापही चालू आहे. या ज्योतिर्लिंगास अहिल्याबाईनी श्रावण महिण्यात गंगेची कावड नेमून दिली होती. लोकांना येण्याजाण्यासाठी कुशावर्त तिर्थ ते त्रंबकेश्वर असा पूल बांधला. त्रिभवनेश्वर मंदिर बांधले होते.

## ११) केदारनाथ ज्योतिर्लिंग (मध्यप्रदेश):

१२ ज्योतिलिंगात ११ वे स्थान केदार नाथाचा प्रामुख्याने पशुपथीनाथ व केदारनाथ ज्योतिर्लिंगात समावेश होतो. केदारनाथ हे उत्तर प्रदेशातील गडवाल जिल्ह्यात आहे. समुद्रसपाटीपासून ११७६० फूट उंचीवर केदारनाथ व बदरीनाथ या नावाच्या हिमालयाच्या दोन क्षेत्रास केदारपुरी असे म्हणतात. तीन बाजूस बर्फाच्छादीत लहानशा पठारावरही केदारनाथाचे देवालय आहे. या मंदिराचे बांधकाम पांडवानी केल्याचे उल्लेख मिळतात. 'या मंदिराचा आठव्या शतकात आद्य गुरु शंकराचार्यांनी केला होता तसेच मंदिरावर सुवर्ण कलश आहे तो अहिल्याबाई यांनी केला.'[७१] बद्रिनाथ व केदारनाथ या मार्गावर अहिल्याबाई धर्मशाळा व कुंड बांधले आहे तसेच पुजेसाठी बाग, गाईसाठी कुरण दिले होते. अहिल्याबाईंच्या केदारनाथ येथील कार्याबद्दल सर जॉन माल्कम यांनी स्तुती केलेली आहे. 'माझा पोलिटिकल असिस्टंट, कॅप्टन टी.डी. स्टुअर्ट हा इ.स. १८१८ साली केदारनाथला गेला होता. अहिल्याबाईच्या नावाबद्दल त्या टोकास असलेल्या प्रांतात किती विलक्षण आदर होता हे तो मला वारंवार सांगे'[७२] अशा प्रकारची स्तुती माल्कम करतो.

वरील विश्लेषणाचा विचार करता देशातील १२ ज्योतिर्लिंगाच्या ठिकाणी अहिल्याबाईनी वेगवेगळी धार्मिक कार्ये केली आहेत हे संशोधनातून दिसून येते. त्यानी तत्कालिन कालखंडात दोनशे वर्षापेक्षा जास्त कालखंड उलटून गेला तरी त्यांनी बांधलेल्या धर्मशाळा, कुंड, मंदिरे, घाट आजही सुस्थितीत आहेत. यावरुन त्या कालखंडातील सर्व वास्तू बांधणाऱ्या कलाकारांची कला किती कुशल होती हे स्पष्ट होते. आजच्या कालखंडात १०० वर्षापूर्वी बांधलेल्या इमारती कोसळून अनेक लोक मृत्यूमूखी पडत आहे यावरुन अहिल्याबाईनी अनेक कामे अहिल्याबाईनी स्वतः जावून पाहिली आहेत, वेळोवेळी वस्तुशिल्पकाराना सुचन्या दिल्या होत्या. येथे त्यांच्या नेत्वृत्वाच्या अंगी असलेल्या कर्तव्यदक्षपणाची जाणीव होते.

## अहिल्याबाईनी महेश्वर राजधानी बांधलेली मंदिरे:

मध्यप्रदेशातील पश्चिम निमाड या जिह्यातील महेश्वर हे तालुक्याचे ठिकाण आहे. ऐतिहासिक नगरी म्हणून हे ठिकाण आज प्रसिध्द आहे. याचे कारण असे की, अहिल्याबाईनी १९६७ मध्ये आपले राज्यकारभाराचे ठिकाण इंदोरवरुन महेश्वर हे केले. ते ठिकाण भौगोलिकदृष्ट्या सुरक्षित आहे. अहिल्याबाईनी तेथे साध्या पध्दतीचा वाडा बांधला तेथे अनेक देवांची मंदिरे बांधली. त्याचबरोबरच मशिदीही बांधल्या. अनेक ठिकाणी घाट, तलाव, रस्ते, विहीर, कुंड बांधले. त्यामुळे महेश्वराचा विकास होवू लागल्या. अहिल्याबाईनी विनकरानां आश्रय दिला. त्यामुळे वस्त्रउद्योग मोठ्या प्रमाणात महेश्वरला चालू झाला. आजही महेश्वर साडी संपूर्ण भारतभर प्रसिध्द आहे. या व्यवसायाचे आधुनिकीकरण होळकराचे वंशज शिवाजी राजे होळकर यांनी केली आहे. रेवा सोसायटी महेश्वर या नावांने साड्याचे उत्पन्न या ठिकाणी चालू आहे. अहिल्याबाईनी अनेक सुविधा उत्पन्न करुन दिल्यामुळे व्यापारी तेथे आले. त्यामुळे महेश्वरच्या व्यापार उद्योगाला चालना मिळाली, महेश्वर नगरीचा विकास झाला अशा प्रकारे महेश्वर नगरी अहिल्याबाईनी वसवली आहे.

### १. काशी विश्वेश्वराचे मंदीर, महेश्वर:

अहिल्याबाईना व मल्हाररावांना काशीच्या विश्वेश्वराची पुन्हा स्थापना करण्याचा मनोदय होता. मल्हाररावांना मोहिमेमुळे हे कार्य अखेरपर्यंत जमले नाही. अहिल्याबाईंनी काशीला विश्वेश्वराची पुन्हा स्थापना केली. हे मंदिर संपुर्ण दगडी काळ्या पाशानात व घडीव दगडात बांधलेले आहे. मंदिराला तीन उंच कळस आहेत. मंदिराचा चौथरा साठ फुट उंचीचा आहे. त्याता तिन्ही बाजूनी प्रवेशव्दार आहे. मुख्य गाभाऱ्यात आत शिवलिंग आहे. शिवलिंगाच्या समोर मोठा नंदी व कासव कोरलेला आहे. या संबंधी उल्लेख पुढील प्रमाणे आहे. 'अहिल्याबाईंची स्वारी इंदोरहून महेश्वर संवत १८२४ भाद्रपद मासी इ.स. १७६७

मध्ये येवून राहिली. वाडे मंदिरे प्राचीन देवळे कसे कसी बांधविली व स्थापना केली. प्रथम सरकारवाडा बांधविला व स्थापना केली. श्री नर्मदेचा घाट वाड्याखाली बांधला व नंतर काशी विश्वेश्वराचे मोठे देऊळ शिखर बांधवून स्थापना केली'[७३] अशा प्रकारे अहिल्याबाईनी विश्वेश्वर मंदिर बांधले.

## २. भवानी देवीचे मंदिर:

महेश्वर येथील बस स्थानकाजवळ म्हणजेच गावाच्या उत्तर दिशेला भवानी मंदिर अहिल्याबाईनी बांधलेले आहे. भवानी देवी हे गावांचे ग्राम दैवत असावे. या मंदिरा भोवताली प्रशस्त आवार आहे. मंदिराचे प्रवेशद्वार पूर्वेला असून मुख्य दरवाजा लाकडी आहे. मंदिराचा मुख्य कळस १२५ फुट उंचीवर आहे. मंदिर संपूर्ण चौथऱ्यावर उभारलेले आहे. मंदिराचे बांधकाम काळ्या पाशानात केलेले आहे. मुख्य गाभाऱ्यात भवानी देवीची मुर्ती असून ती चांगल्या स्थितीत आहे. या मंदिरालाच विध्यवासिनी मंदिर असे संबोधण्यात येते. अहिल्याबाई होळकरांनी इ.स. १७७८ मध्ये हे मंदिर बांधून त्याची स्थापना केली असा उल्लेख मिळतो. 'श्री भवानी देवीचे मंदिर शहराच्या उत्तर दिशेस सवंत १८३५ (इ.स. १७७८) साली बाईसाहेबांनी बांधून स्थापना केली.'[७४]

## ३. राजराजेश्वरी मंदिर महेश्वर:

महेश्वर येथील वाड्यापासून निघणाऱ्या पश्चिमेस राज राजेश्वराचे प्राचीन मंदिर आहे. या मंदिराचा अहिल्याबाई होळकरांनी जीर्णोध्दार केल्याची नोंद सापडते ती पुढील प्रमाणे, 'सहस्त्र बाहु कांतवीर्य यांचे मंदिराचा जिर्णोध्दार केला' [७५] महेश्वर येथील राजराजेश्वर शिवालय म्हणजे सम्राट कार्तिविर्युजुर्न यांचे समाधी स्थळ आहे. या शिवमंदिराच्या गर्भगृहात शिवलिंग असून त्याच्या जवळच अष्टाधातुची शिवपार्वतीची मुद्रा आहे. या मंदिरात शेकडो वर्षापासून पारंपारीक पध्दतीने शुध्द तुपाचे आकरा नंदादिप अखंड

प्रज्वलीत आहे. शिवालयाच्या चारही बाजूनी क्रमंश: सुर्य मंदिर, गणपती मंदिर, दुर्गा मंदिर, विष्णू मंदिर आणि राम मंदिर बांधण्यात आलेले आहे.

राजेश्वराचे मंदिर संपूर्ण पाषाणात बांधण्यात आलेले आहे. या मंदिरास विविध रंग देण्यात आलेले आहेत. मंदिरास एक सभा मंडप असून त्यास अठरा खांब आहे. या खांबावर भारतीय कलेचा आदर्श दाखविणारे नक्षिकाम व कलाकृती केली आहे. मंदिराच्या प्रवेशद्वाराबाहेर एक लहान गॅलरी करण्यात आली आहे. आतिल गर्भगृहात पाशानाचे शिवलिंग असून पंचधातुची शिवपार्वतीची प्रतिमा आहे. राजराजेश्वर मंदिराला एकूण दोन कळस आहेत. सभामंडपावर एक आणि शिवलिंगावर एक. या कळसास सोन्याचा मुलाम आहे.

या देवासाठी अहिल्याबाईंनी गंगेची कावड नेमूण दिली होती. या मंदिराची व्यवस्था पाहण्यासाठी पुजारी नेमला होता. त्यास जमीन इनाम दिली होती. अशा प्रकारे अहिल्याबाई होळकरांनी राजराजेश्वराच्या मंदिराचा जीर्णोद्धार केला.

**४. पंढरीनाथाचे मंदिर महेश्वर :**

अहिल्याबाईच्या दहनभूमीकडून अहिल्याघाट, पेशवेघाट अशा अनेक घाटावरून सरळ पूर्व दिशेला गेली की पंढरीनाथाचे उंच चौथऱ्यावर उभारलेले मंदिर समोरच दिसते. मंदिर पूर्वाभिमुख आहे. मंदिरात प्रवेश  करण्यासाठी १६ पायऱ्या आहेत. संपूर्ण मंदिर दगडात बांधले आहे. मुख्य सभागृहात लाकडी दरवाजा आहे. दरवाजावर गणेश पट्टी आहे. मंदिराला एकूण १८ खांब असून खांबावर सुंदर नक्षीकाम केलेले आहे. मंदिराचा गाभारा अष्टकोनी असून गाभाऱ्यात विठ्ठल-रूखमाईच्या मूर्ती आहेत. मंदिर आजही चांगल्या स्थितीत आहे. अहिल्याबाई होळकरांनी हे मंदिर बांधल्याचे कागदोपत्री पुढील प्रमाणे उल्लेख मिळतो. 'श्रीमंत अहिल्याबाईसाहेबांची स्वारी इंदुराहून महेश्वर संवत १८२४ भाद्रपद मासी येऊन राहिली. वाडे, मंदिरे, प्राचीन देऊळे कसकसी बांधविली व स्थापना

केली. प्रथम सरकार वाडा बांधिला व श्री नर्मदेचा घाट वाड्याखाली बांधविला नंतर रेवाकाठी विठोबाचे देऊळ बांधविले. प्रत्येक देऊळ बांधित जाऊन त्याचे पूजे-अर्चेची व्यवस्था करीत गेले."[७६]

अहिल्याबाई होळकरांनी या मंदिराची पूजा-अर्चेची व्यवस्था सध्याचे बिपीनचंद्र बाबूराव तिवारी महेश्वर यांचे सात पिढ्यांपूर्वीचे वंशज श्री उदेभट यांचेकडे सोपविली होती. यासाठी अहिल्याबाई होळकरांनी त्यांना ४७ बिघे जमीन दान केल्याची माहिती त्यांनी दिली. त्यांची सनद आज त्यांच्याकडे उपलब्ध नाही.

## ५. महेश्वर येथील वाड्यातील अहिल्याबाईंचे पूजा घर :

अहिल्याबाई दिनचर्यातील पूजा हा महत्त्वाचा भाग मानत. त्यांची देवावर विशेषतः शंकरराव श्रद्धा होती. तत्कालीन कालखंडात सर्व राजे स्वतःचे आत्मबल वाढविण्यासाठी देवावर श्रद्धा ठेवत असत तत्कालीन कालखंडात विज्ञान तंत्रज्ञानाचा विकास झाला नव्हता. त्याप्रमाणे अहिल्याबाई होळकरांनी त्यांच्या वाड्यात एक पूजाघर बांधले होते.

अहिल्याबाई होळकरांनी जुन्या घटणीचा वाडा राहण्यासाठी बांधला. या वाड्याचे वैशिष्ट्ये असे की यातून नर्मदा नदीचे दर्शन होते. या वाड्याच्या दक्षिण तटा लगत अहिल्याबाई होळकरांनी देवघर बांधले. अहिल्याबाई या पूजाघरात पांढरे वस्त्र परिधान करून नित्येनियमाने दोन वेळा पूजा करीत असत. या पूजाघरात एक लाकडी चंदनाचे देवघर आहे. याची माहिती तेथील मॅनेजर यांनी दिली. देवाचे पाट चांदीचे आहेत. श्री. शंकराचे चांदीचे एकूण चार मुखवटे आहेत. त्याचप्रमाणे चांदीच्या पाच लहान पींडी आहेत. मल्हारी मार्तंडाचा मुखवटा चांदीचा असून कुलदैवताचे चांदीचे टाक आहेत. भारतातील गंगा, जमुना, सरस्वती, गोदावरी सिप्रा, नर्मदा या पवित्र नद्यातील शाळुंखानी ३ मोठ्या थाल्या भरलेल्या आहेत. एक सुमारे २३ किलो वजनाचा सोन्याचा पाळणा आहे यात गोपाल, बाल मुकुंद व उजव्या हाताचा शंख ठेवला आहे. आज ट्रस्ट तर्फे त्याची पूजा केली जाते. हे सर्व

मौल्यवान आहे. त्यामुळे तेथे कोणालाही आत प्रवेश दिला जात नाही फक्त दर्शनाची सोय केलेली आहे. शासनाने सुरक्षतेसाठी २ पोलीस व ट्रस्टचे २ वाचमन तेथे असतात. महेश्वर येथील सर्व मंदिराची साफसफाई करण्यासाठी ट्रस्टने पगारी कामगार लावलेले आहेत. तसेच पूजेअर्चेसाठी नेमण्यात आलेल्या पुजाऱ्यांना ट्रस्टतर्फे मानधन दिले जाते.

**उज्जैन येथील चिंतामणी गणेशाचे मंदिर :**

संपूर्ण भारतात शिवाशी निगडित अशी १२ ठिकाणे आहेत. त्यातील मध्यप्रदेशातील उज्जैन महाकालाच्या ज्योतिर्लिंगाचे प्रसिद्ध धार्मिक तीर्थक्षेत्र आहे. कालिदास, राजाभोज, विक्रमादित्य या सर्वांनी उज्जैनला धार्मिकतेचे महत्त्व प्राप्त करून दिले. त्यात अहिल्याबाई होळकरांनी भर घातली. उज्जैन हा शिंदे यांचा प्रांत तरीही अहिल्याबाईंनी येथे आपली सेवा अर्पण केली आहे. अहिल्याबाईंनी चिंतामणी गणेश या पुरातण देवालयाचा जीर्णोद्धार केला त्याचा उल्लेख कागदोपत्री पुढीलप्रमाणे सापडतो. 'श्री क्षेत्र अवंतिका उज्जैन माळवा श्री. चिंतामणी गणपती मंदिर, धर्मशाळा व कावडी.'[७७]

चिंतामणी गणपती मंदिर प्राचीन असून त्याचा जीर्णोद्धार अहिल्याबाई होळकर यांनी केला. चिंतामणी गणेशाचे मंदिर उज्जैन रेल्वे स्टेशनपासून ७ किलोमीटर अंतरावर आहे. मंदिराचे प्रवेशद्वार पूर्वेला आहे. मंदिराला २२ खांब आहेत ते पुरातन आहे. त्यावर रेखीव नक्षीकाम केलेले आहे. या देवस्थानची व्यवस्था पाहणाऱ्या पुजाऱ्याला अहिल्याबाई होळकरांनी ५३ बिघे जमीन दिली होती.

**इंदोरचे गुटकेश्वर महादेव मंदिर :**

होळकरांच्या इंदोर या संस्थानाला दीर्घ व श्रेष्ठ अशी परंपरा आहे. या संस्थांमध्ये क्षेत्रफळ २४ हजार ६०० किलो मीटर होते. मल्हारराव होळकरांनी त्यांची स्थापना केली. इ. स. १६९४ ते १७६६ हा मल्हाररावाचा काळ होता. त्यांनी पेशव्याच्या सैन्यात कर्तबगारी बजावल्यामुळे पेशव्यांनी त्यांनी माळव्याची जहागीर दिली. मल्हाररावांनी त्यांच्या

इतमामला साजेसा राजवाडा बांधला. १७४१ मध्ये इंद्रेश्वर मंदिर बांधण्यात आले. त्यावरूनच इंदोर हे नाव प्रचलित झाले. अहिल्याबाई होळकर होळकरांची सून म्हणून वयाच्या आठ वर्षांच्या असताना इंदोरला आल्या. मल्हारराव होळकरांच्या व पतीच्या निधनानंतर इंदोरचा राज्यकारभार त्यांनी चालविला. त्यावेळी इंदोरला गरूड तीर्थ गुटकेश्वर देवालय बांधले. इंदोरच्या अग्नेय दिशेस ६ मैलावर देवगुण राज्याला एक डोंगर असून त्याच्या पायथ्याशी त्याच नावाने एक खेडेगाव आहे. तेथे प्रतिवर्षी शिवरात्रीस मोठी यात्रा भरते.

या मंदिराच्या नेमणुकीचा उल्लेख सापडतो. इतर उल्लेख मात्र सापडत नाहीत. तरीही संबंधित मंदिर निश्चित अहिल्याबाई होळकरांनी बांधलेले आहे. असे इंदोरचे होळकरशाहीचे संशोधक व लेखक डॉ. गणेश मतकर यांनी सांगितले. 'श्री गुटकेश्वर महादेव गुराडया पुजाऱ्याचे नाव सुरजमल ब्रिजलाल नेमणुकीचा आकार ३७-०० रुपये'[७८] गुटकेश्वर महादेव मंदिर हे अहिल्याबाई होळकरांची इंदोर शहरातील एकमेव निर्मित मंदिर आहे. १२ कि.मी. अंतरावर आहे. मंदिर घडीव पाषाणात बांधलेले आहे. मुख्य प्रवेशद्वारातून प्रवेश केल्यानंतर मुख्य आवारात ४ दिशांना ४ मंदिरे असून मध्यभागी असलेले ४ प्रवेशद्वार असलेला मंदिराचा गाभारा आहे. मुख्य मंदिराभोवती एकेक अशा २ धर्मशाळा ओवऱ्याच्या आकाराच्या आहेत. मुख्य मंदिराच्या समोर भव्य आणि मोठे कुंड आहे. येथून जवळ सिप्रा नदीचा उगम आहे. या मंदिराच्या ठिकाणी अहिल्याबाईनी धर्मशाळा बांधली, पुढे काशी, मथुरेला जाणाऱ्या यात्रेकरूंसाठी तेथे अन्नछत्र सुरू केले.

**आलंमपूर येथील मंदिरे :**

आलमपूर हे मध्य प्रदेशातील भिण्ड जिल्ह्यातील बहार तालुक्यातील एक लहानसे गाव आहे. आलंमपूर हे ग्वाल्हेरपासून ४० किलोमीटर आंतरावर आहे. होळकर राज्यातील परगण्याचे मुख्य कार्यालय आलंमपूरला होते.

पानिपताचे अपयश धुऊन काढण्यासाठी व उत्तरेस पुन्हा मराठ्यांचे वर्चस्व निर्माण करण्यासाठी राघोबादादा, मल्हारराव होळकर, महादजी शिंदे, मालेराव व तुकोजी होळकर इत्यादी मंडळी मोहिमेवर निघाली. आलमपूरलाच होळकर राज्याचे संस्थापक मल्हारराव होळकर यांचा मृत्यू झाला. त्यामुळे या गावाला महत्त्व प्राप्त झाले. राघोबा दादा पेशवे यांनी या गावी मल्हाररावांची छत्री बांधण्याचा मनसुबा व्यक्त केला. मल्हारराव होळकरांची स्मृती म्हणून आजूबाजूच्या राजे-राजवाड्यांनी आलमपूरला सुंदर गाव बनविण्याचे ठरविले. २७ गावे परगण्याला भेट म्हणून दिली. तेथे बांधलेली मंदिरे पुढीलप्रमाणे

## १) सुर्यमंदिर :

हे मंदिर मराठा शैलीचे एक आकर्षक मंदिर आहे. ते पूर्वभिमुख आहे. आता मात्र गाभारा आणि तळ एवढेच शिल्लक आहे. शिखर मुघल शैलीचे असून त्यावर कलश आहेत. मंदिरांच्या डाव्या व उजव्या बाजूला रथाकृती आहेत.

मंदिराचे द्वार, छत व गाभारा इत्यादी भाग सर्वसाधारण आहे. गाभाऱ्यावर आरूढ असलेल्या सूर्याच्या प्रती व कलात्मक कोरीव काम केलेले आहे. संपूर्ण कोरीव काम जिवंत स्वरूपाचे वाटते. त्यावरती सुर्य किरणांचा प्रकाशाचा वेग प्रतिबिंबित होताना दिसतो. सुर्यबिंब हे होळकरांच्या नाण्यांची विशेषतः आहे.

## २) रेणुका मंदिर :

रेणुका मंदिराची निर्मिती उंच जागेवर केली असून सध्या फक्त गाभारा सुरक्षित आहे. गाभाऱ्याच्या आतील भाग साधारण आहे. मंदिराचे शिखर नागरी शैलीचे असून त्यावर कळस आहे. मंदिराचे कोरीव काम साधारण असून प्रवेशद्वाराजवळ दोन्ही बाजूनी रथाकृती असून त्यात मात्र प्रतिमा नाहीत. गाभाऱ्यात रेणुका देवीची प्रार्थना मूर्ती आहे. रेणुका देवीची मूर्ती कलात्मक दृष्टिकोनातून सर्वसाधारण आहे. मंदिराचे बांधकाम दगडी व

विटा चुन्याचे असून मराठा कालीन बांधकाम शैलीचे आहे. मंदिराचे बांधकाम दगडी व विटा चुन्याचे असून मराठाकालीन बांधकाम शैलीचे आहे.

रेणुका देवीस नेमणुकीचा उल्लेख आढळतो. तो पुढीलप्रमाणे 'श्री रेणुका मंदिर आलमपूर महाल मुलबिन नंदलाल तिवारी पुजारी नेमणुकांचा आकार ३-१९, १ आणा ९ पैसे'[७९] अशाप्रकारे रेणुका देवीचे मंदिर आहे.

## ३) मल्हारी मार्तण्ड मंदिर :

मल्हारी मार्तंण्डाचे मंदिर मल्हारराव होळकर यांच्या छत्री शेजारी बनविले आहे. गाभारा व सभा मंडपाच्या बांधकामाची शैली सर्वसाधारण आहे. गाभाऱ्याचे प्रवेशद्वार मुख्य पूर्व दिशेला आहे त्यातून प्रदक्षिणा मार्ग जातो. भिंतीच्या वरच्या भागावर शिखर बनविलेले आहे. मंदिराची स्थापना १२ बाय १२ इतक्या जागेवर केली आहे. गाभाऱ्याचे छत व भिंती सर्वसाधारण आहेत. गाभाऱ्यात घोड्यावर स्वार झालेल्या खंडोबाची मूर्ती आहेत. गाभाऱ्याच्या आतील भागावर कमळाच्या फुलाचे नक्षीकाम आहे. मल्हारी मार्तण्डाचे मंदिर म्हणजे मराठा शैलीचे स्थापत्य आहे.

येथील स्थानिक लोकांच्या म्हणण्यानुसार येथील संपूर्ण मंदिरे अहिल्याबाई होळकरांनी बांधलेली आहेत. याला आधार म्हणजे येथील एका विहिरीवर सापडलेला शिलालेख यावरून असे दिसून येते की आलमपूरला त्यांनी अनेक कामे केली त्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे :

'कुआपुदायो श्रीमंत महाराज मातुश्री

अहिल्याबाई होळकर कस्बा मल्हारनगर

श्री महादेव जी संनिध विद्यमान राज

श्री नारायण राव स्वामीजी संपन

१८३६ आषाढ वध ९ गुरुवार कुवाटको बिजस कुरद दिया बजो कारूवाच

सुने ताको राम राम सके १७०२ धुनांम संवत्सर सुरसेन तमस

तिमने मऱ्याव अलफ राह हे जिल

काल कुप्त कामदार राम कुशन

फरन्बीस का लिखंत प्रः सदाशिव का (हात)

ओंकार बुदैया विरसा कारीगर'[८०]

अशा प्रकारे अहिल्याबाईंनी मल्हाररावांच्या मृत्यू ठिकाणी त्यांच्या स्मरणार्थ विविध कामे केली.

**अमरकंटक येथील विश्वेश्वर मंदिर :**

हे मध्य प्रदेशातील विलासपूर जिल्ह्यातील पवित्र तीर्थक्षेत्र आहे. अमरकंटकला नर्मदा उगम पावते. त्यांनी अमरकंटकला 'धर्मशाळा, कोटीतीर्थ, वंशकुंड, गौमुखी व श्री विश्वेश्वराचे मंदिर बांधले. नर्मदेच्या उगम स्थानावर कोनाचे पक्के कुंड आहे. याला कोटीतीर्थ असे म्हणतात. यांच्या उत्तर तीरावर नर्मदेश्वर आणि अमरकंटकेश्वराची देवालये आहेत. अमरकंटकाच्या जवळ एक मंदिर आहे ते विश्वेश्वर मंदिर'[८१]

अहिल्याबाई होळकरांची नर्मदा नदीवर श्रद्धा होती. त्यामुळे तिच्या उगमाच्या ठिकाणी हे मंदिर बांधले.

**अयोध्या येथील मंदिरे :**

अयोध्या उत्तर प्रदेशातील महत्त्वाचे तीर्थक्षेत्र मानले जाते. सद्यकालीन परिस्थितीत अयोध्याचे रामंदिर बांधण्यावरून भारताच्या राजकारणात अनेक वेळा वाद निर्माण झालेला आहे. अयोध्याला मोठ्या प्रमाणात महत्त्व प्राप्त झाले आहे. अयोध्या ही श्रीरामांची जन्मभूमी आहे. अयोध्या शरयू नदी काठी आहे. भारतातील सप्तपुरीतील सर्व प्रथम स्थल म्हणून अयोध्याचे महत्त्व आहे. या ठिकाणी मंदिरे व २ धर्मशाळा व नदीवर घाट बांधला या घाटावरच श्रीरामाचे मंदिर बांधले अशा प्रकारचे उल्लेख कागदोपत्री सापडतात.

'राममंदिराशिवाय अहिल्याबाईंनी त्रेतारामपंदिर, श्री भैरव मंदिर, श्री नागेश्वर मंदिर बांधले.

१) श्रीराम मंदिर स्वर्गद्वारी ६६ बाय ५५ अंदाजे किंमत २५०००,०० श्री कै. अहिल्या मामासाहेब यांचे कारकीर्दीत बांधले एक मजली आहे.

२) श्री त्रेताराम मंदिर किंमत ५००० अहिल्याबाई यांचे कारकिर्दीत मंदिर पक्के मंदिर बांधलेले असून शिख र बंद आहे.

३) श्री नागेश्वर मंदिर १२ बाय १३ किंमत ५०० श्री कं. अहिल्याबाई साहेब यांचे कारकीर्दीत बांधले. सदरहू मंदिरात एक धर्मशाळा असून धर्मशाळेच्या पूर्वेस एका कोठडीत महादेवाची मूर्तीची स्थापना केली आहे.'[८२]

अशा रितीने अहिल्याबाईंनी अयोध्या ठिकाणी मंदिरे बांधण्याचे उल्लेख सापडतात.

**मथुरा येथील चैन बिहारी मंदिर :**

मथुरा हे गुजराथेतील एक प्राचीन असे तीर्थक्षेत्र आहे. सप्तपुरीतील एक-पुरी हिंदूचे पवित्र तीर्थक्षेत्र येथे प्रसिद्ध द्वारकाधीशाचे मंदिर आहे. अहिल्याबाई होळकरांनी येथे घाट, धर्मशाळा व श्री चैनबिहारी मंदिर बांधले याचा कागदोपत्री उल्लेख पुढीलप्रमाणे आहे. 'श्री मथुरा वृंदावन संयुक्त प्रांत श्री चैन बिहारी मंदिर'[८३]

**काशी येथील मंदिर :**

काशी हे भारतातील प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. प्राचीन काळापासून या पवित्र नगराची यात्रा करण्याचा प्रघात आहे. आजही अयोध्या, काशी, मथुरा हे तीर्थक्षेत्र हिंदू धार्मियात महत्त्वाचे स्थान आहे. बारा ज्योतिर्लिंगापैकी विश्वेश्वराचे ज्योतिर्लिंग आहे. अहिल्याबाईंनी येथे खालील मंदिरे बांधली. 'श्री क्षेत्री श्रीमनकणी दिवे व तारकेश्वराचे काम चालत आहे.'[८४] 'मंदिरे इ. श्री. कै. अहिल्याबाई साहेब यांचे कारकिर्दीत अंदाजे किंमत २५०००/,

श्री तारकेश्वर मंदिर मनकर्णिका घाट अंदाजे किंमत १०,०००/ श्री कै. अहिल्या मा साहेब यांनी बांधला.'[८५] अशा प्रकारचे उल्लेख मिळतात.

**चित्रकूट पर्वतावरील श्रीरामचंद्राचे मंदिर :**

चित्रकूट हे तीर्थक्षेत्र उत्तर प्रदेशात बंदा जिल्ह्यात आहे. चित्रकूटजवळची वस्ती सीतापूर आहे. सीतापूर हे पायस्विनी नदीच्या काठी वसले आहे. चित्रकुटावर अहिल्याबाईनी श्रीरामचंद्राचे मंदिर व इतर चार मूर्तींची प्राणप्रतिष्ठा केल्याचे उल्लेख होळकरांची इतिहासाची साधने यात आहेत. ते पुढीलप्रमाणे 'खंडा अनंत सुनेलकर यास की मूर्ती करणे त्याचा नकाशा करून पाठवावा त्याप्रमाणे करून म्हणोन लिहिले. ऐसियास चित्रकूट पर्वती सरकारातून मंदिर बांधले व श्री रामजीच्या मूर्तीच्या स्थापना करायची वास्तव मूर्ती सुरेख असणे.'[८६]

'अहिल्याबाईचे खंडो बाबूराव कामविसदार इंदूर यास पत्र रा. आनंदराव यादव कारकून निसबत सरदार याजसमागमे श्री रामपंचायताच्या मूर्ती चित्रकुटी स्थापनेकरिता व बाण एक श्री काशीस स्थापना निमीत पाठविला आहे.'[८७] अशा प्रकारे चित्रकूट पर्वतावर मंदिर अहिल्याबाई होळकरांनी बांधले.

**गया येथील विष्णुपद मंदिर :**

गया हे बिहारमधील त्रिस्थळी यात्रेतील पवित्र तीर्थक्षेत्र आहे. त्रिस्थळी यात्रेस काशीनंतर गयेस जातात. काशीपासून गया २०० कि.मी. अंतरावर आहे. अहिल्याबाई होळकरांनी गया येथे विष्णुपद मंदिर बांधले. यासंदर्भात अनेक उल्लेख सापडतात श्री क्षेत्र गयाहून मोहनीराज मुरार यांचे २१-१०-१७८३ चे एक पत्र होळकर शाहीच्या इतिहासाची साधने यात उपलब्ध आहे ते पुढीलप्रमाणे 'श्री क्षेत्र गया येथे धर्मकृत्य कात्रनुसंघानी महाराजांचे आज्ञे श्री इच्छे आनंदरूप असो... कारखाना, सभामंडप, दासघर व गरभी आसार जुडाई झाली. प्रस्तुत खाणीवर दगड पत्थर पडले आहे. बारसातीमुळे भारबदरीचे

अजाईमुळे राहिली काही दिवसांत भारबसरी चालेल. देशकाला, वर्तमान धर्म कृत्यास सत्वरीसिद्धी घडावी, हा हेतू सभामंडप उत्तर, मजबूत प्रकार म्हणोन आज्ञा.'[८८]

मोहनीराज मुरार या मंदिराची व्यवस्था पाहण्यासाठी नियुक्त केलेला अधिकारी असावा ते म्हणतात. आपले इच्छेनुरूप मी धार्मिक कार्याचे संपादन करीत आहे. कारखाना सभामंडप, दासघर व गर्मीआसार या सर्वांचे संपूर्ण निर्मिती झाली आहे. पावसामुळे मजुरांचा अभाव आहे. त्यामुळे काळे पाषाण, खाणीत पडलेले आहेत. त्यांना मंदिरापर्यंत आणणे कठीण आहे. तरीही हे कार्य लवकर करतो. आपला आदेश आहे की सभामंडप मजबूत झाला पाहिजे. याच पत्रासंदर्भात अहिल्या स्मारिकेत मथुरा मोहन चक्रवर्ती लिहितात की 'अहिल्याबाई होळकरांच्या धार्मिक किर्तीत भर घालणाऱ्या तीर्थक्षेत्रांत गया येथील विष्णुपद मंदिरदेखील आहे पूर्वीचे मंदिर लहान विटांचे बनविलेले होते. राणी अहिल्याबाईंच्या वेळी हे मंदिर अत्यंत जीर्णावस्थेत होते. तेथील तीर्थ पुरोहिताच्या विनंतीवरून अहिल्याबाईंनी याला नवीन भव्य विशाल स्वरूपात बनविले. मोहिनीराज मुराराने अहिल्याबाईंना या मंदिराच्या बांधकामाच्या प्रगतीबाबत वेळोवेळी माहिती पत्राद्वारे कळविली आहे. यावरून हे स्पष्ट होते की आताचे विष्णुपद मंदिर निर्मितीचे कार्य अहिल्याबाईद्वारा झाले. विष्णुपद मंदिराचे मुख्य सभा मंडप व गाभाऱ्याचे २०-१०-१७८३ पर्यंत पूर्ण झालेले होते असे म्हणता येईल. उरलेले काम १७८४ अथवा १७८५ मध्ये पूर्ण झाले असावे'[८९] अशा प्रकारचे उल्लेख कागदोपत्री सापडतात.

**बोधगया येथील जगन्नाथ मंदिर :**

गया येथून ६ कि.मी. अंतरावर बोधगया हे क्षेत्र आहे. या ठिकाणी अहिल्याबाईंनी जगन्नाथ मंदिराची उभारणी केली परंतु याबद्दलचे उल्लेख होळकरशाहीच्या दफ्तरात आढळून येत नाहीत. मथुरा मोहन चक्रवर्ती यांनी या मंदिराबाबत उल्लेख अहिल्या स्मरणीका पुस्तकात पुढीलप्रमाणे केले आहे. 'दक्षिणेतील आंतरराष्ट्रीय प्रसिद्ध बौद्ध तीर्थ हे

गया शहरापासून ६ कि.मी. अंतरावर असून तेथे महाराणी अहिल्याबाई यांनी दोन मजली पूर्वाभिमुख विटा आणि चुना यात जगन्नाथ मंदिर बांधले आहे. या मंदिरातील मूर्ती जगन्नाथ, सुभद्रा आणि बलराम यांच्या आहेत. मंदिराच्या दुसऱ्या भागात राम, सीता, लक्ष्मण, हनुमान यांच्या सुंदर मूर्ती बसविण्यात आलेल्या आहेत. या मंदिराच्या शेजारीच अहिल्याबाईंनी लोकनाथ व ऋणमोचन या दोन शिवालयांची स्थापना केलेली आहे. याशिवाय या मंदिराच्या जवळ खगेश्वर आणि नगेश्वर ही दोन शिवालये बांधलेली आहेत. जगन्नाथ मंदिरात सुंदर शिवलिंगास मूर्तीची सजावट अहिल्याबाईंनी केलेली आहे."[१०] या मंदिराची व्यवस्था येथील महंताकडे अहिल्याबाईंनी होती त्यांचेच वंशज अद्यापही या मंदिराची व्यवस्था पाहतात. अशा प्रकारे बोधगया मंदिराची उभारणी केली.

## अहिल्याबाईंनी पिरस्थानांना दिलेल्या नेमणुका :

अहिल्याबाई होळकरांनी ज्याप्रमाणे हिंदू धर्मातील लोकांच्या निरनिराळ्या देवतांच्या असंख्य मंदिरांची नव्याने उभारणी व जीर्णोद्धार केला. त्याप्रमाणे त्यांनी इतर धर्मातील लोकांचा द्वेष न करता त्यांच्या देवस्थानाला पूजा-अर्चा करण्यासाठी नेमणुका लावून दिल्या. १८ व्या शतकात मोठ्या प्रमाणात धर्मावर आधारित लढाई होत असताना. इतर धर्मातील लोकांना आश्रय दिला. त्यांच्यात भेदभाव केला नाही. त्यांनी धर्मनिरपेक्ष तत्त्वांची अंमलबजावणी १८ व्या शतकातच केली होती. त्यांच्या या धर्मनिरपेक्ष वृत्तीवरून संशोधन अर्थी असे म्हणता येईल की, अहिल्याबाई धार्मिक होत्या. परंतु धर्मांध नव्हत्या. याचा उल्लेख खालीलप्रमाणे -

अहिल्याबाई होळकरांनी महेश्वराला त्यांच्या राजधानीच्या गावी काही मुस्लिम पीरस्थानांना नेमणुका दिल्या होत्या. संशोधनाच्या निमित्ताने महेश्वर येथे गेले असता. या पीरस्थानांना भेटी दिल्या. आजही सर्व पीरस्थानाची देखभाल चांगली ठेवलेली आहे. होळकर ट्रस्ट तर्फे नेमणुका त्यांना प्रतिवर्षी मिळत असते. चांदशापीर व खेडपीर ही

महेश्वरातील जागृत देवस्थान मानली जातात. संबंधित देवस्थान गावातील किल्ल्याच्या बाजूलाच आहेत. त्याचे होळकर सरकारनी एकत्रित केलेल्या देवस्थान क्लासिफिकेशन लिस्टमध्ये सापडतात ते पुढीलप्रमाणे :

| पीरस्थानाचे नाव | पुजाऱ्याचे नाव | नेमणुकीचा आकार | आधार |
|---|---|---|---|
| १) चांदसा पीर | गुणबशआ | ३५ रु. ९ आणे, ९ पैसे | देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, इंदोर, १९२३ |
| २) खडेपीर | वलीमहमद | १०-८० | पृ. २३१ |
| ३) पीरस्थान मौ. अमीरशा | | | |
| भखारी मंडालेश्वर | ...... | १-०-३ | पृ. २४१ |
| मदनशा पीरनाव घाट | ..... | ०-१३-० | पृ. २४१ |

अशा प्रकारे अहिल्याबाईंनी हिंदूबरोबर मुस्लिम देवस्थानांना नेमणुका दिल्या.

## चांदवड येथील नानावली बाबाचा दर्गा :

चांदवड हे अहिल्याबाई होळकरांचे जहागिरीच्या प्रशासनाचे ठिकाण होते. महेश्वर प्रमाणेच अहिल्याबाई होळकरांनी येथे पुष्कळ मंदिरे बांधली. त्याबरोबरच नानावली बाबांच्या दर्ग्यालादेखील त्यांनी पूजा-अर्चसाठी व्यवस्था करून दिली होती. आजमात्र कागदोपत्री त्यासंदर्भात उल्लेख सापडत नाहीत. अहिल्याबाई तत्कालीन कालखंड त्यावेळी चांदवड मुक्कामी असत त्यावेळी नानावली बाबांच्या दर्ग्याच्या दर्शनार्थ जात असत अशी माहिती तेथील ट्रस्टच्या मॅनेंजर यांनी दिली. रंगमहालाजवळच नानावली बाबाचा दर्गा गावातच आहे. दर्गा संपूर्ण कौलारू छताचा आहे. चांदवडला ज्यावेळी उरूस भरतो त्यावेळी सदलचा पहिला मान अहिल्याबाईंच्या काळापासून परांपरागत होळकरांचा आहे. आजही तो चालू आहे. रंगमहाल ते नानावली बाबांचा दर्गा असे भुयारी मार्ग आहे. भुयारी मार्ग सध्या बंद करून ठेवला आहे.

**चांदवड येथील बुखारी बाबांचा दर्गा :**

बुखारी बाबाचा दर्गा मुंबई-आग्रा महामार्ग शेजारी असून अहिल्याबाईंनी बुखारी बाबांचा दर्गा त्यांच्याकाळात संपूर्ण बांधून काढला होता, अशी माहिती अहिल्या ट्रस्टचे मॅनेजर देतात. अहिल्याबाईनीच आपल्या कारागीराकडून इतर मंदिराचे बांधकाम चालू असताना दर्गा बांधून घेतला असावा परंतु कागदोपत्री त्याचा उल्लेख मिळत नाही.

अशा प्रकारे अहिल्याबाईंनी सर्वधर्मीयांसाठी धार्मिक कार्य केले. ज्या ठिकाणी मुस्लिम राजवटीत हिंदूंच्या मंदिराची तोडफोड झाली होती. त्यांचा जीर्णोद्धार केला तर काही ठिकाणी नवीन मंदिरे उभारली.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सर्व संस्थानाचे विलिनीकरण झाले. त्यात होळकर संस्थानदेखील विलीन झाले. १९६७ मध्ये होळकर संस्थानच्या सध्याच्या वंशज महाराणी उषाराजे होळकर यांनी खासगी देवी अहिल्याबाई होळकर चॅरिटीज ट्रस्ट स्थापन केला व त्यामार्फत संपूर्ण होळकर संपत्तीचा कारभार चालवला जातो.

**अहिल्याबाई होळकरांच्यावर केलेले आरोप व त्याचे स्पष्टीकरण :**

अहिल्याबाई होळकरांवर केलेल्या आरोपाचे तीन प्रकारात वर्गीकरण केले आहे. १) १९२०-२१ पूर्वीचे आक्षेप २) १९२९ मध्ये मराठी रियासत उत्तर विभाग-१ मध्ये केलेले आक्षेप, ३) गो. स. सरदेसाई यांनी 'न्यू हिस्ट्री ऑफ द मराठाज भाग-३ या इंग्रजी ग्रंथात केलेले आक्षेप.

पहिल्या कालखंडात केलेले मुख्य आक्षेप पुढीलप्रमाणे 'अहिल्याबाईच्या लाख पन्नास हजार रुपये सुभेदाराची तैनात म्हणून मिळे त्याहून कितीतरी अधिक पैसा तिने दानधर्मात खर्च केला. हा खर्च पैसा दौलतीच्या होळकरशाहीची पेशवाईची फौज राखण्याकरिता होता. तो तीने दानधर्मात उधळून टाकून फौजेकडे दुर्लक्ष केले आणि भटभिक्षुकांच्या नादी लागून ती पेशवाई बुडवण्यास कारण झाली.'[११] तदूनंतरच्या काळात

रियासतकार लिहितात होळकरांच्या अपरिहार्य अडचण होती, राज्यकारभार व पैसा अहिल्याबाई हाती आणि लष्करी कामास जबाबदार तुकोजी. त्या दोघांत सदैव बेबनाव, तुकोजी समरांगणावरील कामास तेवढा उपयोगी होता. परंतु स्वतः भानगडी सोडविण्याची पात्रता अंगी नसल्यामुळे तो स्वार्थसाधू कारभाऱ्यांच्या मुठीत वागे. त्यांत व्यसनाची भर. हिशोबाची तर क्षितीज नाही. इकडे अहिल्याबाई मोठी हिशोबी व करारी परंतु तिला स्वारीच्या भानगडी व अडचणी घरबसल्या पटत नसत. तुकोजीला कारभार कधी साधला नाही म्हणून स्वतंत्र जोखीम शिरावर घेऊन तडीस नेण्यास सर्वभैव असमर्थ होता.

आपल्या इंग्रजी ग्रंथात सरदेसाई लिहितात 'पुण्यात्मा अहिल्याबाई आपल्या राज्याच्या अंतःस्थ बाबीच्या अव्यवस्थेवर आणि देशाच्या बाह्य राजनीतीवर ह्या वेळेपर्यंत ज्याप्रमाणे महादजी शिद्यांनी आपले प्रमुख स्थपित करून घेतले होते. त्याप्रमाणे आपला पूर्ण ताबा जमवू शकली नाही. आपले धर्मकर्म व धार्मिक कार्यात सर्व काळ व्यस्त व एकाग्र राहून केवळ महेश्वरमध्येच अगदी अलिप्त राहत राहिली. ह्यामुळे इंग्रजी सत्ता मराठ्यांवर सारखा आपला दबाव वाढवून राहिली आहे. ह्याची पूर्ण जाणीव तिला झाली नाही. धार्मिक कार्यात अपेक्षेच्या बाहेर ती उदारपणा दाखवित होती. परंतु काळाच्या ओघाच्या जरुरीप्रमाणे सैन्यात सुधारणा करण्याची व आवश्यकतेनुरूप सेना सुसंघटित करण्याची आणि महादजी शिंद्यास त्यांच्या युद्धात व अन्य गोष्टी सहायता देण्याची आवश्यकता तिला भासली नाही परिणाम असा झाला की एकीकडे अहिल्याबाईच्या मुठीत द्रव्याची थैली आवळून राहिली आणि दुसरीकडे रणक्षेत्रात तुकोजीरावास त्याच्या सैन्यास उपासमार सोसावी लागली.''[१२]

**आक्षेपांचा विचार :**

प्रथम कालखंडात रावबहादूर द. बा. पारसनीस प्रोफेसर भानुव खरेशास्त्री वगैरेंनी अहिल्याबाईंचे राजकारणाचे बाबतीत जे आक्षेप घेतले आहेत. त्याचे समर्पक उत्तर बा. ना.

देव व इंदोरचे ख्यातनाम विद्वान साहित्य समालोचन कार वि. सी. सरवटेद्वारा पहिलेच दिले गेले आहे. खुलासेवार विवरण एम. डब्ल्यू बर्वेद्वारा इंग्रजीत लिहिलेल्या अहिल्याबाई चरित्रात परिशिट 'अ'मध्ये पाहण्यास सापडते मुख्य मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत. 'पेशवाईंची दौलत सांभाळण्यासाठी फौज राखण्याकरिता जी संपत्ती सुभेदार मल्हारराव यांजकडे होती त्याचे व्यतिरिक्त कितीतरी गाव व गावजमिनी पेशवा व निजाम यांनी मल्हाररावांच्या कुटुंबातील बायकांना स्वतंत्रपणे तोडून इनाम दिल्या होत्या.'[१३] अशा प्रकारे सुभेदार मल्हारराव होळकरांच्यापासून होळकर शाहीजवळ दोन प्रकारची संपत्ती राहतअसे जी संपत्ती होळकर घराण्याच्या स्वतःच्या निजी खर्चाकरिता असे तिला खासगी म्हणत व जी पेशवाईची दौलत सांभाळण्यासाठी फौज ठेवण्याकरिता असे तिला सरंजामी महाली संपत्ती म्हणत असत.

सुभेदार मल्हाररावांजवळ सरंजामी संपत्ती बाबतच्या केवळ साठ लाख रुपयांच्या मुलुख होता त्यापैकी चाळीस लाखाचा मुलुख तापीच्या उत्तरेस माळव्यात व वीस लाखांचा मुलुख तापीच्या पलीकडे दक्षिणेत होता आणि ह्या मोबदल्यात पंधरा हजार स्वार खडी फौज पेशवाईसाठी मल्हाररावास राखावयाची होती. होळकराशीहीची खासगी संपत्ती सरंजामी संपत्तीशिवाय अगदी वेगळी असल्यामुळे 'खासगी'चा हिशोबही अगदी वेगळा आणि अहिल्याबाईचे वेळेपासून त्यासाठी दिवाण खासगी म्हणून अगदी वेगळा अधिकार असे त्याची जागा वंशपरंपरेने चालणारी असून सुरुवातीपासून इ.स. १९०४ पर्यंत ती तशीच कायम होती.'[१४] 'खासगीची गावे व जमीन जुमला सरंजामी संपत्तीशिवाय अगदी वेगळा असल्यामुळे खासगीची मिळकतसुद्धा स्थायी स्वरूपाची होती. सुभेदार मल्हाररावांजवळ पंधरा कोटी रुपयांची खासगीची संपत्ती आपले मागे सोडून गेले होते.'[१५]

अशा स्थितीत अहिल्याबाईंनी जो पैसा दानधर्मात उधळून टाकला म्हणून जो आक्षेप केला जातो तो पैसा वस्तुतः खासगीचा म्हणजे केवळ होळकर घराण्याचा निजी मालकीचा

होता. त्यांचा सरंजामी संपत्तीशी काही संबंध नव्हता आणि म्हणूनच अहिल्याबाई म्हणत की मी आपले पोटे अन्न भक्षिते ते देखील यांचे नाही. अहिल्याबाई हिशोबाच्या बाबतीत मोठ्या चोख होत्या हे संशोधनातून स्पष्ट होते. त्या सरंजाम संपत्तीचा हिशोब पुण्यास नियमित पाठवित असत. याबाबत महादजीच्या वकील गोविंद कृष्ण यास महेश्वरास पाठवले तेव्हा त्याबाबतचे त्याच्या बोलण्यातून त्यांची व्यवहारीकता स्पष्ट होते. 'अहिल्याबाई त्यास म्हणाली मागे माझे विद्यमाने दौलतीचा महाल मुलकी कारभार मी केला आहे त्याचे हिशोब कितेब सर्व कारकुनाजवळ आहेत. दिवाणगिरीस मजजवळ नारो गणेश याचे भाचे मुकुंदराव आहेत. आपला हिशोब लागली तर एक कवडीची पाच देईन'[१६] अशा प्रकारे सरंजामी संपत्तीपैकी आपल्या जवळ काहीही राखून ठेवत नसत. उलट अहिल्याबाईंनी युद्धाच्या पेचप्रसंगी खासगीतून पैसे पाठविल्याचे उल्लेख खुद्द खरे शास्त्रीही कबूल करतात. याबाबत खासगीमधून पैशाची व्यवस्था करून पद्मसीकडून दोन लाख रुपये पाठविल्याचा उल्लेख महेश्वर दरबाराची बातमी पत्रे लेखांक २६५ मध्ये मिळतो.

फौजेकडे दुर्लक्ष केल्याबाबत जे आक्षेप आहेत. त्यासंबंधात अहिल्याबाईंनी फौजेची व्यवस्था कशा प्रकारे ठेवली होती ती पुढील विधानावरून दिसून येते. 'आजकाल पाटील बाबांचा दम तुकोजीबाबा फार राखितात आणि पाटील बाबांच्याही चित्तांत फार फंद असेल तर उभयतांही फौजसुद्धा चालून यावे. सुभेदाराचे पुण्याप्रमाणे येथेही कोणी बांगड्या लेऊन बसले नाही.'[१७] अशा प्रकारे अहिल्याबाई जर फौजेकडे दुर्लक्ष केले असते तर त्या हे धाडसी विधान करू शकल्या नसत्या त्यांच्याकडे राज्यांच्या संरक्षणासाठी फौज सदैव तयार असत. तसेच शिंदेकडील राणेखां भाईनेही नाना फडविसांस कळविले होते की जर तुम्ही असा विचार करीत असाल की चार-पाच हजार फौज पाठवून बाईस ठिकाणी बसवू तर तसे होणे शक्य नाही. अशा प्रकारे अहिल्याबाईंनी फौजेची तयारी ठेवली होती.

अहिल्याबाई भटभिक्षुकांचे नादी लागलेली होती. दानधर्म जरी करीत असली तरी अहिल्याबाई भटभिक्षुकांचे आहारी गेली होती, असे म्हणने कसे चुकीचे आहे हे पाहणे असल्यास महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग-१ लेखांक ४४ व ७७ मध्ये स्पष्ट उल्लेख मिळतात. आजारी असता अथवा स्वास्थ ठीक नसता मुत्सदी अगर भटभिक्षुक मराठी माणसे, खिजमतगार यास कोणास जवळ येऊ देत नाही. तसेच 'पुंडाई करण्याबद्दल महेश्वरातून ब्राह्मणांची हकालपट्टी करण्यात अहिल्याबाईने मागे पुढे पाहिले नाही. याबाबत विठ्ठल शामराज आपल्या पत्रात स्पष्ट लिहितात की यास्तव छत्र बंद केले तैलंग जितके व द्रविड जितके आहेत ते सारे येथून काढून देणे म्हणून बाईंनी सांगितले आहे. शंभर दीडशे तैलंग कुटुंबसुद्धा आहेत. तीन साडे-तीनशे सडे आहेत. कुटुंबसुद्धा आहेत त्यास असू द्यावे व बाकीच्यास काढून द्यावे असे सांगितले. वाड्यातही पुराणाजवळ शे-दीडशे ब्राह्मण येत होते तेही मना केले.'[१८] अशा प्रकारे अहिल्याबाई कोणाचेही न ऐकता प्रसंगी कर्तव्यकठोर झाल्या आहेत. अशा प्रकारे पहिल्या टप्प्यात केलेल्या आरोपाचे खंडन होते.

दुसऱ्या कालखंडातील आक्षेपाचा विचार करता पहिल्या कालखंडातील आक्षेपांच्या प्रत्युत्तराची सत्यता मौनरूपाने स्वीकार्य मानून सरदेसाईंनी इ. स. १९२९ च्या रियासत उत्तर विभागात निर्देशित कार्यकारण भावाचा मुद्दा समोर आणण्याचा प्रयत्न केला आहे आणि सर्व अव्यवस्थेचे मूळ होळकरशाहीची दुहेरी राज्यव्यवस्था असल्याचे दाखविले आहे. परंतु होळकरांच्या वंशजाना वस्त्रे देणे, कारभारी नेमून देणे, वगैरे कामे पेशवाईच्या मार्फत होत असल्यामुळे दुहेरी राज्यव्यवस्थेबाबत पेशवाईच्या राज्यकारभारावर विशेषतः बारभाईच्या कारभारावर आरोप केल्यासारखे आहे. अशा प्रकारचे आरोप शल्य बदलून त्यांच्या इंग्रजी पुस्तकात तिसऱ्या कालखंडातील पुस्तकात स्वरूप बदलून नवीन मुद्दे समोर आणण्याचा प्रयत्न केला आहे.

तिसऱ्या वर्गीकरणात रियासतकार सरदेसाई यांनी अहिल्याबाईच्या राज्यकारभाराबाबत मुख्यतः चार आक्षेप घेतले आहेत. १) इंग्रजी सत्ता मराठ्यांवर सारखा आपला दबाव वाढून राहिली आहे. ह्याची जाणीव अहिल्याबाईला झाली नाही. २) काळाच्या ओघाच्या जरुरीप्रमाणे सैन्यात सुधारणा करण्याचे व आवश्यकतेनुरुप सुसंघटित करण्याची तिला जरुरी भासली नाही. ३) महादजी सिंद्यास त्याच्या युध्दात व अन्य गोष्टीत साह्य करण्याची जरुरी तिने समजली नाही. ४) द्रव्याची थैली आपल्या मुठीत आवळून ठेवून अहिल्याबाईने तुकोजीरावास रणक्षेत्रांत त्याच्या सैन्यास उपासमार सोसणे भाग पडले.

प्रस्तुत आरोपाचे काळाच्या संबंधाने विचार केला अहिल्याबाईच्या बाबतीत रियासतकार परस्पर विरोधी विधाने करीतात असे आढळून येते. एकीकडे अहिल्याबाईच्या कारभाराबाबत निर्देशित आक्षेप घेतात तर दुसरीकडे भारतातील इंग्रजी राजकारणाचे अंत:स्थ रहस्यमय स्वरुप अहिल्याबाई पूर्णपणे उमजली होती असेही प्रतिपादन करतात ते लिहितात की 'इंग्रजांच्या आक्रमणशक्तीची मार्मिक व्याख्या अहिल्याबाई केली आहे'[९९] अहिल्याबाई इंग्रजाविषयी म्हणतात 'इंग्रजांची प्रबलता हिंदूस्थानात फार जाली. इंग्रज सर होणे दूरापास्त आहे. त्यास सर करण्यास सहाय्य एक श्रीमंत रावसाहेबांचा पुण्यप्रताप ते केवळ अवतारी पुरुष त्यांच्या कृपावीसणे मात्र मसलत सिध्दीस पावेल. वरकड व्याघ्रा दिक श्वपदे बळ व युक्तिप्रयुक्तीने मारतील परंतु आस्वलाचे मारणे फार कठीण आहे सुरत धरुन मारले तरच मरेल. नाहीतर आस्वलाचे चपेटीत कोणी सापडला तर गुदगुल्या करुनच आस्वल त्यास मारील. तद्वत ही इंग्रजाची लढाई आहे पहाता याचे मारणे फार कठीण'[१००] अशा प्रकारे विधान अहिल्याबाईनी इंग्रजाविषयी केले होते एवढेच नाही तर इंग्रजाच्या हिंदी राजकारणाच्या अंत:स्थ धोरणाचा अहिल्याबाईस पूर्णपणे उलगडा झाला होता ही गोष्ट संदर्भाच्या व मथळ्याच्या माध्यमातून स्वत: रियासतकार कबूल करतात. त्यावरुन स्पष्ट होते. त्यामुळे इंग्रजाविषयी जाणीव अहिल्याबाईंना होती हे संशोधनातून स्पष्ट होते.

दुसरा आक्षेप असा होता की, अहिल्याबाईस सैन्यात सुधारणा करण्याची व त्यास सुसंघटित करण्याची जरुरी भासली नाही प्रमुख आरोपाच्या बाबतीत एक गोष्ट लक्षात घेतले पाहिजे की १७८४ च्या सुरुवातीपर्यंत कोणत्याही मराठेशाही सरदाराला नवीन प्रकारच्या सैन्य संघटनेची जरुरी भासली नाही. प्रथम मराठा-इंग्रज युध्द मराठ्यांनी त्यांच्या गणिमी काव्याच्या पध्दतीनेच जिंकले. १७८४ नंतर मराठाशाहीत इंग्रजी पध्दतीच्या पलटणी उभ्या करण्याची लाट उसळली अनेक मराठा सरदारांनी फ्रेंच, अमेरीकन, सरदारांना हाताशी धरुन त्या पलटणी तयार केल्या. इ.स. १७९२-९३ च्या सुमारास अहिल्याबाईनी सुध्दा 'कर्नल जी.पी. बॉईड नामक अमेरीकन अधिकाऱ्यामार्फत पाश्चात्य पध्दतीची एक पलटण तयार करविली होती जो करार केला होता तो इन्दोर स्टेट गॅझेटियर भाग-२ मध्ये आजही पाहवयास मिळतो. त्याचे नांव महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग-२ मध्ये दृष्टिपतीस मिळते''[१०१] अशा प्रकारे अहिल्याबाईनी आपल्या सैन्य व्यवस्थेमध्ये सुधारणा केल्या होत्या.

तिसऱ्या आक्षेप महादजी शिंदेस त्यांच्या युध्दांत व अन्य गोष्टीत सहाय्य करण्याची जरुरी अहिल्यबाईना समजली नाही असा आहे याबाबत संशोधनातून जे महादजी शिंदेस जे सहाय्य अहिल्याबाईनी वेळोवेळी केली याचे उल्लेख पुढील प्रमाणे आहेत. ज्यावेळी इंग्रजांनी ग्वाल्हेर काबीज केले व इंग्रजी पलटणे शिप्री, कोल्हारास सिरींजकडे आली त्यावेळी अहिल्याबाईने महादजीस मदत केल्यास ते स्वत: कबूल करतात. रियासतकार लिहितात 'शिंप्रीस इंग्रज पलटणे आली. त्यांजवर आबंजी इंगळे पाठविले. सिरीजेतही इंग्रजींच्या दबाव पडला. अहिल्याबाईनी आबूंची इंगळे याचा बाप भिबंकजी इंगळे यास दीड हजार फौजेनिशी रवाना केले. मागाहून सदाशिव मल्हार बशी बावांनी रवाना केले. धोंडदेवही आंबूजीस सामील होण्याकरीता भेलशापुढे गेले''[१०२] याचप्रमाणे 'ज्यावेळी रामपूरा हातचा गेला. उदयपुरचे सेनेने आक्रमण सुरु केले त्यावेळी महादजी परिवार उज्जैनीस होता तेथे शिंदे बाया अगदी घाबरुन गेल्या व अहिल्याबाईस पत्र पाठविले की आम्ही तुम्हापाशी

येतो. बाईने ताबडतोब उत्तर पाठविले की आलात तर घर तुमचेच आहे परंतु तसे केल्याने किर्तीस बट्टा लागेल घाबरण्याचे कारण नाही. मी जवळच आहे. प्रसंग आला तर तीन प्रहाराच्या आत मी स्वत: येथे येवून जाईन एवढेच करुन अहिल्याबाई थांबली नाही लगेच सैन्य तयार केले व खाजगीचा डेरा बाहेर काढला आणि रोज तेथेच सैन्याची हजेरी होऊ लागली''[१०३] वरील विश्लेषणाचा विचार केला असता अहिल्याबाईनी महादजी शिंदेना वेळोवेळी मदत केल्याचे स्पष्ट होते.

चौथा आक्षेप म्हणजे द्रव्य आपले मुठीत आवळून ठेवून तुकोजीस रणक्षेत्रात त्याच्या सैन्यास उपाशी मारण्यास भाग पाडण्याचा आहे प्रस्तुत आक्षेप मुख्यत: चुकीच्या कल्पनावर आधारीत आहे. होळकर शाहीची सर्व सरंजामी मिळकत एकट्या अहिल्याबाई जवळच राहात असे असे चुकीचे गृहित धरलेले आहे. 'वस्तुत: होळकर शाहीच्या सरंजामी महालांचे तत्कालीन व्यवस्थेच्या दृष्टीने दोन भाग पडतात. एक सातपुड्याचे पलीकडे दक्षिणेकडील व दुसरा माळव्यातील पैकी दक्षिणेकडील मुलूख वीस लाखाचा व माळव्यातील चाळीस लाखाचा. दक्षिणेकडील महालांचा बंदोबस्त तुकाजीरावाकडे व माळव्यातील अहिल्याबाईकडे. ज्या अर्थी अहिल्याबाईकडे जास्त आमदानीचा मूलूख होता त्याअर्थी प्रत्यक्ष वास्तविकतेशिवाय निर्माण झालेले दिसतात. महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग-१ लेखांक ४९ त अहिल्याबाई स्पष्ट शब्दांत म्हणते. श्रीमंताची पत्रे वरचेवर दो महालासाठी यावी. देशी महाल आहेत त्या महालांचा पैका तिकडेच जात आहे अहिल्याबाई वरचेवर तुकोजीरावास पैका पाठवित असे याचा मुबलक पुरावा महेश्वर दरबारची बातमीपत्रे भाग१ व २ मध्ये सापडतो. गुजराथ व पुण्याकडे असता लाखो रुपये तुकोजीस पाठविल्याचे अहिल्याबाई म्हणते''[१०४] अशा प्रकारे अहिल्याबाईवरील आरोपाचे खंडन बर्वे एम.डल्ब्यू. यांनी नवीन लिहिलेल्या ग्रंथातून स्पष्ट होते.

या प्रकारणाचा व अहिल्याबाईवर झालेल्या आरोपाचा विचार करता १८ व्या शतकात प्रत्येक संस्थानिक आपले राज्य विस्तार कार्यास गुंतले होते. समाजव्यवस्थेमध्ये मोठ्या प्रमाणात विषमता होती. प्रत्येकजन एकमेकाविरुध्द लढाई करण्यास गुंतले होते त्यामुळे प्रजेकडे कोणाचे लक्ष नव्हते तत्कालीन काळात अहिल्याबाईनी आपल्या राज्यशिवाय संपूर्ण भारतात धार्मिक लोककल्याणकारी कार्य करुन राज्यात शांतता प्रस्थापित करुन राष्ट्रउभारणी केली. अहिल्याबाई होळकरांच्या धार्मिक कार्याचा आढावा घेतला असता असे दिसून येते की, धर्मामध्ये राजाने मानवतावादी लोकांचे कल्याण करणारे जे तत्व सांगितले आहे त्या तत्वाचा त्यानी अवलंब केला. असे संशोधनातून दिसून येते. त्यांनी लोकांच्या सोयीसाठी नवीन देवालय बांधले, प्राचीन मंदिराचा जीर्णोध्दार केला इ. जे कार्य केले त्यामुळे जनतेचा पाठिंबा त्यांना मिळाला. त्यांनी धर्मनिरपेक्ष राजकारण केले. आजच्या लोकशाही व्यवस्थेत धर्माचा वापर राजकारणात केला जात आहे तशा प्रकारचा वापर त्यांनी राजकारणात केला नाही.

**संदर्भ ग्रंथ सूची:**

१) चौसाळकर, अशोक (संपा), धर्म समाज आणि राजकारण, प्रकाशक लोक वाङ्.मय गृह, मुंबई, २००४, पृ. १२.

२) चौसाळकर, अशोक (संपा), न्याय आणि धर्म, प्रतिमा प्रकाशन, जुलै २००५, पुणे, पृ.२००.

३) उपरोक्त, पृ. २०२.

४) भट, य.आ. अनुवादक, धर्मशास्त्राचा इतिहास, पूर्वार्ध, महाराष्ट्र राज्य साहित्य व सांस्कृती मंडळ, मुंबई, प्रथम आवृत्ती, १९४७, पृ. ७.

५) उपरोक्त, उत्तरार्ध, पृ. ३७२.

६) उपरोक्त, पुर्वाध, पृ. ५.

७) सर जॉन माल्कम, दि मेमॉयर ऑफ सेंट्रल इंडिया, भाग २, १८८०, पृ. १८६

८) उपरोक्त, पृ.१६५.

९) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीचा इतिहास भाग दुसरा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिध्द, होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, १९४५, पृ. २६८.

१०) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ जळगाव, डिसेंबर २०००, पृ. ९१

११) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग १ ला लेख ८१, मुंबई, पृ. १७८.

१२) भट य. आ., धर्मशास्त्राचा इतिहास पूर्वाध प्रकाशक, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृत मंडळ, मुंबई ,१९४७, पृ. ३००.

१३) जोशी महादेवशास्त्री (संपा.), भारतीय संस्कृती कोश, खंड ४, प्रकाशक भारतीय संस्कृती कोश मंडळ, पुणे, प्रथम आवृत्ती, पृ. ३३९.

१४) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग २ ला तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना, मुंबई येथे प्रसिद्ध, १९११, पृ. ११५.

१५) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग १ ला लेख ८४, तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना मुंबई, येथे प्रसिद्ध १९३०, पृ. १८१.

१६) जोशी श्री.बा. *अहिल्या धर्मयोगिनी,* शास्त्री अवधूत (संपा), धर्मभास्कर, अहिल्याबाई होळकर विशेषांक, जून १९७५, मुंबई, पृ. ८६.

१७) सरजॉन माल्कम, दि मेमॉयर ऑफ सेंटल इंडिया, भाग २ रा, लेख १०५, पृ. २१३, २१४.

१८) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग २ रा लेख १०५, पृ. २१३, २१४.

१९) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, खंड १ ला भाग २ रा, अ. नं. १८, पृ. १६७-१६८.

२०) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग २ रा लेख ११, पृ. २०.

२१) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. १२७.

२२) शालीग्राम शंकर तुकाराम, इतिहास प्रसिद्ध पुरूषांचे व स्त्रियांचे पोवाडे, निर्णय छापखाना मुंबई, पृ. २१२.

२३) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. १३३.

२४) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, खंड १ ला भाग २ रा, अ. नं. १८, पृ. २६८, २६९.

२५) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग २ रा तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना मुंबई येथे प्रसिद्ध, १९३०, पृ. २३०.

२६) उपरोक्त, पृ. २३०.

२७) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग १ ला तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना. मुंबई येथे प्रसिद्ध, १९११, पृ. २१६.

२८) उपरोक्त, पृ. २३०.

२९) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, खंड १ ला भाग २ रा, अ. नं. १८, पृ. २७९, २८०.

३०) गावंडे शंकर, देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खाजगी स्टेट इंदोर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध १९२३ पृ. ३१७.

३१) उपरोक्त, पृ. ३१७.

३२) उपरोक्त, पृ. ३१७.

३३) अप्रकाशित, पंढरपूर येथील बडवे दफ्तर.

३४) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग पहिला, प्रथमावृत्ती १९४०, पृ. ५०.

३५) बेणारे गोपाळ, सचित्र राणा पंढरीचा, ह. भ. प. श्री रामेश्वर महाराज, प्रकाशक १९९३, पृ. ३१.

३६) अप्रकाशित, पंढरपूर येथील बडवे दफ्तर.

३७) गावंडे श. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खाजगी ट्रस्ट इंदौर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध १९२३ पृ. ३१७.

३८) पारसनीस द. बा. - महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग २ रा तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना. मुंबई येथे प्रसिद्ध, १९११, पृ. ३५.

३९) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग २ रा तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना मुंबई येथे प्रसिद्ध, १९११, पृ. ३५.

४०) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीचा इतिहास भाग दुसरा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिध्द, होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, १९४०, पृ. ७५.

४१) भागवत, अ.ना., होळकरशाहीतील स्त्रियांचा पत्र व्यवहार, प्रकाशक दामोदर बळवंत दांडेकर, इंदोर, १९२४, पृ.४२

४२) भागवत अ. ना., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, पत्रव्यवहार खंड १ ला प्रकाशक, दा. ब. दांडेकर पृ. १.

४३) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीचा इतिहास भाग दुसरा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिध्द, होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, १९४५, पृ. २८५, २८६.

४४) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ जळगाव, डिसेंबर २०००, पृ. २५२.

४५) उपरोक्त, पृ. २५४.

४६) गावंडे श. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खाजगी ट्रस्ट इंदौर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, १९२३, पृ. २५९.

४७) जोशी लक्ष्मणशास्त्री - मराठी विश्वकोश खंड १२, महाराष्ट्र राज्य विश्वकोष निर्मिती मंडळ, मुंबई, १९८५, पृ. १४०४.

४८) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. २५९.

४९) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीचा इतिहास भाग दुसरा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिध्द, होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, १९४५, पृ. २५६.

५०) पिंगळे जगदीश, दैनिक लोकमत, औरंगाबाद (आवृत्ती) अक्षरंग पुरवणी, १०-११-१९९४.

५१) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीचा इतिहास भाग दुसरा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिध्द, होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, १९४५, पृ. २५०.

५२) जोशी महादेवशास्त्री, भारतीय संस्कृति कोश खंड ३ रा, प्रकाशक भारतीय संस्कृत कोश मंडळ, पुणे, १९६४, पृ. १४f.

५३) जोशी द. म., बारा ज्योतिर्लिंग, आदर्श विद्यार्थी प्रकाशन, पुणे १९८५, पृ. १०.

५४) जोशी महादेवशास्त्री, भारतीय संस्कृति कोश खंड १०, पृ. १४८.

५५) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग २ रा तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना मुंबई येथे प्रसिद्ध, १९११, पृ. ८७.

५६) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. १९८.

५७) उपरोक्त, पृ. १९८

५८) सरदेसाई गो. स.,मराठी रियासत भाग ५ वा, संपा - गर्गे स. मा. व भटकळ रामदास, पॉप्यूलर प्रकाशन, १९९०, पृ. २५८.

५९) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीचा इतिहास भाग दुसरा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिध्द, होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, १९४०, पृ. २८.

६०) भावे वा. कृ., पेशवेकालीन महाराष्ट्र प्रकाशन, भारतीय इतिहास अनुसंधान परिषद नवी दिल्ली, १९७६, पृ. ३१५, १६.

६१) उपरोक्त, पृ. ३१५, ३१६.

६२) जोशी महादेवशास्त्री, भारतीय संस्कृति कोश खंड २ रा, भारतीय संस्कृती कोश मंडळ, पुणे, १९६४ पृ. ३१२.

६३) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. २०३.

६४) जोशी महादेवशास्त्री, भारतीय संस्कृत कोश खंड १ ला, १९६४, पुणे पृ. ७५८-५९.

६५) गावंडे शंकर, देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट इंदोर, १९२३, पृ. ३१४.

६६) ठाकूर, वा.वा., होळकरशाहीचा इतिहास भाग दुसरा, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिध्द, होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, १९४०, पृ. ३७३.

६७) उपरोक्त, पृ. ३७३

६८) उपरोक्त, पृ. ३७४

६९) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ, जळगाव, डिसेंबर २०००, पृ. २२०.

७०) ठाकूर वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग दुसरा, १९४० इंदोर, पृ. २५५-५६.

७१) पाटील सु. अ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक पुण्यश्लोक अहिल्यादेवी प्रगतीमंडळ जळगाव, डिसेंबर २०००, पृ. २२४.

७२) सरजॉन माल्कम, दि मेमॉयर ऑफ सेंट्रल इंडिया, भाग दुसरा, १८८०, पृ. १८७.

७३) ठाकूर वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग दुसरा, १९४५ इंदोर, पृ. १८.

७४) उपरोक्त, पृ. १८.

७५) उपरोक्त, पृ. १९.

७६) ठाकूर वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग दुसरा, १९४० इंदोर, पृ. १८.

७७) ठाकूर वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग दुसरा, १९४५ इंदोर, पृ. २५४.

७८) गावडे श. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, १९२९, इंदोर, पृ. १९.

७९) गर्ग रामसेवक, शर्मा हिरालाल, अहिल्या स्मारीका प्रकाशक, खाजगीदेवी अहिल्याबाई होळकर चॅरिटीज ट्रस्ट, इंदोर, १९८१, पृ. ३६.

८०) गर्ग रामसेवक, शर्मा हिरालाल, अहिल्या स्मरणिका प्रकाशक, खाजगीदेवी अहिल्याबाई होळकर चॅरिटीज ट्रस्ट, इंदोर, १९८१, पृ. ३६.

८१) कौशिक अशोक, भारत के प्रमुख तीर्थ प्रकाशक, डायमंड पॉकेट बुक्स, नवी दिल्ली, पृ. २९.

८२) गावडे श. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, पृ. ३०६.

८३) ठाकूर वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग दुसरा, १९४५ इंदोर, पृ. २५४.

८४) गावडे रा. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, इंदोर, १९२३, पृ. ३०७.

८५) उपरोक्त, पृ. ३०४.

८६) ठाकूर वा.वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग दुसरा, १९४० इंदोर, पृ. २०८.

८७) उपरोक्त, पृ. २२१, २२२.

८८) उपरोक्त, पृ. २५५.

८९) चक्रवर्ती मथुरा, *विष्णुपद मंदिर निर्माण-संबंधी एक ऐतिहासिक पत्र*, गर्गे रामसेवक, शर्मा हिरालाल (संपा), अहिल्या स्मारिका, प्रकाशक, सेक्रेटरी खाजगी देवी अहिल्या होळकर चॅरिटीज ट्रस्ट, इंदोर, १९७५, पृ. १७,१८.

९०) चक्रवर्ती मथुरा, *गया तीर्थ में महारानी अहिल्याबाई व्दारा निर्मित स्थान*, गर्गे रामसेवक, शर्मा हिरालाल (संपा), अहिल्या स्मारिका, प्रकाशक, सेक्रेटरी खाजगी देवी अहिल्या होळकर चॅरिटीज ट्रस्ट, इंदोर, १९७९, पृ.६२, ६३.

९१) बर्वे एम. डब्ल्यु., देव अहिल्याबाई होळकर १९२०, इंदोर, पृ. १६५.

९२) सरदेसाई जी. एस., न्यू हिस्ट्री ऑफ दि मराठाज, भाग - ३, (इंग्रजी) पृ. २११-१२.

९३) खान्डवेकर द.वि., *अहिल्याबाई आणि राष्ट्रीयता,* शास्त्री अवधूत (संपा), धर्मभास्कर अहिल्यादेवी होळकर, विशेषांक मुंबई जून १९७५, पृ. १०५.

९४) धारिवाल एल. सी., इंदोर स्टेट गॅझेटियर, इंदौर, १९३१, पृ. परिशिष्ट ए ५२५.

९५) बर्वे एम. डब्ल्यु., देवी अहिल्याबाई होळकर १९२०, इंदोर, पृ. परिशिष्ट ए.

९६) पारसनीस द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग - १, मुंबई १९३०, पृ. २६.

९७) उपरोक्त, पृ. ५३.

९८) उपरोक्त, पृ. १७१.

९९) सरदेसाई गो. स. मराठी रियासत उत्तर विभाग १९२९, मुंबई, पृ. १७६.

१००) उपरोक्त - पृ. १७७.

१०१) खान्डवेकर द.वि., *अहिल्याबाई आणि राष्ट्रीयता,* शास्त्री अवधूत (संपा), धर्मभास्कर, अहिल्याबाई होळकर विशेषांक जून १९७५, मुंबई, पृ. १११.

१०२) खान्डवेकर द.वि., *अहिल्याबाई आणि राष्ट्रीयता,* शास्त्री अवधूत (संपा), अहिल्याबाई होळकर विशेषाक 'धर्मभास्कर' जून १९७५, मुंबई, पृ. ११२.

१०३) बर्वे एम. डब्ल्यु. देवी अहिल्याबाई होळकर, इंदोर १९२०, पृ. ८५-८६.

१०४) खान्डवेकर द.वि., *अहिल्याबाई आणि राष्ट्रीयता,* शास्त्री अवधूत धर्मभास्कर अहिल्याबाई होळकर विशेषांक, जून १९७५, मुंबई, पृ. ११३.

# प्रकरण पाचवे
# उपसंहार

कोणत्याही व्यक्तिमत्वाचा अभ्यास करत असताना त्या व्यक्तीमत्वामध्ये विविध नेतृत्वगुण असतात मग ते क्षेत्र कोणतेही असो. नेतृत्व म्हणजे समूहास त्याच्या उद्दिष्टाप्रत व उत्कर्षाप्रत नेणारी त्यासाठी मार्गदर्शन करणारी, मार्गातील अडचणीचे निराकरण करू शकणारी व समूहाकडून योग्य ते कार्य करून घेऊ शकणारी श्रेष्ठ दर्जाची व्यक्ती होय असे ढोबळमानाने म्हणता येईल.

अहिल्याबाईनी मराठा कालखंडात उल्लेखनीय कामगिरी बजावली असे संशोधनातून स्पष्ट होते. अठराव्या शतकातील राजकीय, सामाजिक व धार्मिक क्षेत्रातील कर्तबगार महिला नेतृत्व होते. वास्तविक पाहता प्राचीन कालखंडापासून भारतात स्त्रीला समाजात अत्यंत गौण स्थान होते शिक्षणाची व स्वविकासाची संधी स्त्रीला त्या काळी मिळतच नव्हती. स्त्रीजीवन हे अत्यंत दु:खी, कष्टी, असुरक्षित होते. प्रत्येक सामाजिक बंधनानी जखडलेले होते. तत्कालीन कालखंडात पतीच्या निधनानंतर पतीबरोबर चितेत जळून जाणे हाच स्त्रियांचा धर्म होऊन बसला होता अशा परिस्थितीत अहिल्याबाईनी कल्याणकारी राज्यकारभार करून दाखवला हे संशोधनाअंती दिसून येते. माणूस आपल्या जन्माने, जातीने किंवा धर्माने नव्हे तर आपल्या स्वकर्तृत्वाने, उच्च विचारसरणीने महान होतो हा आदर्श सामान्य स्त्रीपुढे घालून दिला. अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व एक राजकीय अभ्यास या प्रस्तुत शोधप्रबंधाचा अभ्यास करताना प्रामुख्याने पाच प्रकरणात विभागणी केली आहे.

**प्रकरण पहिले** अहिल्याबाई होळकर व्यक्तीपरिचय यामध्ये असे दिसून येते की अहिल्याबाई अत्यंत ग्रामीण भागात व ज्या कुटुंबात जन्मल्या तेथील समाजव्यवस्थेचा

प्रभाव त्यांच्यावर पडला. विशेषकरून त्यांच्या आईच्या संस्काराचा प्रभाव त्यांच्यावर पडला. त्यांच्या आई गावातील लोकांना मोठ्या प्रमाणात दानधर्म करीत असत त्याप्रमाणे अहिल्याबाईंनी मोठ्या प्रमाणात दानधर्म केला असे शोधअंती दिसून येते. जगातील प्रख्यात विचारवंतांचा अभ्यास केला असता असे दिसते की, तत्कालीन विचारांचा प्रभाव त्यांच्यावर पडला त्याचप्रमाणे अहिल्याबाईंच्यावर गावात व मंदिरात चालणाऱ्या पोथी पुराण, भजन व किर्तन त्यातून सांगणारे आदर्श तत्वज्ञान, लोककल्याणकारी मार्ग याचा प्रभाव त्यांच्यावर पडला. लग्न होऊन सासरी इंदोरला आल्यावर सासू गौतमाबाईचा प्रभाव पडला त्या अत्यंत कर्तव्यदक्ष व स्पष्टवक्ती होत्या. सासरे मल्हारराव होळकर यांच्या विचारांचा प्रभाव त्यांच्यावर पडला. लग्न होऊन सासरी इंदोरला आल्यानंतर त्याना अत्यंत कर्तव्यदक्ष व स्पष्टवक्त्या सासू गौतमबाईचा सहवास लाभला व त्यांच्या या गुणांचा प्रभाव अहिल्याबाईंच्यावर पडला. तत्कालीन कालखंडात आजच्यासारखी शिक्षणाची व्यवस्था नव्हती. स्त्रियांना अस्पृश्यतेची वागणूक दिली जात असे परंतु राजघराण्यातील स्त्रीयांना शिक्षणासाठी पुरोहिताची नेमणूक करून शिक्षण दिले जात होते त्याप्रमाणे अहिल्याबाईंना ते दिले होते.

अहिल्याबाईच्या मोडी हस्तक्षरांची पत्रे उपलब्ध आहेत त्यामुळे त्यांना मोडी, मराठी व संस्कृत इत्यादी भाषा अवगत होत्या असे संशोधनातून दिसून येते. अहिल्याबाई यांच्याकडे मोठ्या प्रमाणात ग्रंथसंग्रह होता. त्यामध्ये धार्मिक, सामाजिक, राजकीय संदर्भात ग्रंथ होते त्यातून त्यांना मानवतावादी आचार-विचारांचे महत्त्व समजले, मानवतावादी खऱ्या धर्माचे ज्ञान मिळाले. महाभारत, रामायण यासारख्या ग्रंथातून तत्कालीन राज्यव्यवस्था, प्रशासन व्यवस्था याचे ज्ञान मिळाले. ग्रंथातून राज्यव्यवस्थेचा इतिहास समजला. प्राचीन राजवटी याचे ज्ञान मिळाले. धर्मग्रंथातील धार्मिक विचार कार्यपद्धती त्यांनी समजून घेतली. प्राचीन तिर्थक्षेत्राचे महत्त्व व इतिहास समजला. त्यांच्या

कार्यपद्धतीला या ग्रंथातून विचारांची जोड मिळाली. या ग्रंथसंपदेतून प्रेरणा व स्फूर्ती मिळाली त्यातूनच त्यांनी तीस वर्षे लोककल्याणकारी राज्यकारभार केला. छ. शिवाजी महाराजांच्या राजकीय व प्रशासकीय व्यवस्थेचा आदर्श त्यांच्यासमोर होता याचा प्रभाव त्यांच्यावर पडला. तत्कालीन कालखंडात राज्याच्या दरबारात राजाला पुराण कथा वाचून दाखवण्यासाठी व राजकीय सल्ला देण्यासाठी पुराणिक असत. सम्राट अशोक, हर्षवर्धन यांच्या पदरी चांगले पुराणिक होते ते राजाला राजकीय सल्ला देत. अहिल्याबाई होळकरांच्या पदरीही अंबादास नावाचा पुराणिक होता. त्यांनी पोथी पुराणातील तत्वज्ञान व राज्यकारभाराविषयीचे ज्ञान अहिल्याबाईंना दिले असे संशोधनातून दिसून येते.

पती खंडेरावांच्या मृत्यूनंतर अहिल्याबाई सती जाण्यास निघाल्या परंतु सासरे मल्हारराव होळकर यांनी त्यांचे मतपरिवर्तन केले. सती जाण्यापासून परावृत्त केले सुनेलाच मुलगा मानून त्यांना राज्यकारभार विषयक शिक्षण दिले. येथे त्यांचा पुरोगामी विचार तत्कालीन समाजाला आदर्श होता. अहिल्याबाई लढाईच्या वेळी स्वत: रणभूमीवर जात व तेथील तोफा, दारुगोळा, सैनिक यांची व्यवस्था पहात त्यामुळे त्यांना रणनितीचे प्रत्यक्ष शिक्षण मिळाले. मल्हाररावांनी त्यांना केलेल्या सूचनांतून राज्यकारभाराविषयक ज्ञान मिळत गेले. त्यांनी केलेल्या कामातून सासरे मल्हाररावांचा विश्वास संपादन केला यातून अहिल्याबाईंच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण झाली.

अहिल्याबाईच्या पतीचा १७५४ मध्ये मृत्यू झाला त्यानंतर सासरे मल्हारराव यांचा १७६६ मध्ये व मुलगा मालेराव याचा आजाराने १७६७ मध्ये मृत्यू झाला. यामुळे अहिल्याबाई अतिशय दु:खी झाल्या होत्या. राज्यकारभारास वारस कोणी उरला नाही. या सर्व बाबींचा फायदा घेऊन त्यांच्या राज्याचा दिवाण गंगाधर चंद्रचूडाने राघोबा पेशव्यांना निरोप पाठविला की होळकरास कोणी वारस उरला नाही. यावेळी राघोबा पेशवे संपत्तीच्या मोहापोटी होळकरांच्या राज्यावर चालून आले तेव्हा अहिल्याबाईंनी मोठ्या धैर्याने

त्यांच्याशी तोंड दिले. वैयक्तिक दु:ख बाजूला ठेवले. राज्यातील सर्व कारभाऱ्याना बोलावून लढाईसाठी तयार राहण्याचे आदेश दिले. त्यावेळचे त्यांचे वाक्य त्यांच्या नेतृत्वातील विश्वास, धैर्य, मुत्सद्दिपणा स्पष्ट करते. त्या म्हणाल्या ''मेल्या ब्राह्मणाने (गंगाधर चंद्रचूडाने) हरामखोरी आरंभली आहे परंतु मी बायको माणूस (बाईमाणूस) असे मानू नका खांद्यावर बासडा टाकून उभा राहीन तेव्हा श्रीमंताच्या दौलतीस अवघड पडेल ब्राह्मण म्हणतील दौलतीचा अभिलास करू तर ते होणार नाही''[१] अशाप्रकारे एका स्त्रीचे तत्कालीन कालखंडात धाडसी कृत्य होते. शेजारील राज्यांशी त्यांचे अत्यंत मैत्रीपूर्ण संबंध होते. शिंदे, भोसले, गायकवाड यांना मदतीची पत्रे पाठविली त्यांनीही तात्काळ मदत पाठविली. राघोबा पेशवे यांना निरोप पाठविला की 'आपण स्त्री बरोबर युद्ध करू नये नाही तर तुमच्या नावास कलंक लागेल तो कशानीही निघणार नाही मी तर बोलून चालून स्त्री, माझा जर युद्धात पराभव झाला तर मला कोणीही नावे ठेवणार नाही परंतु जर यदा कदाचित युद्धात तुमचा पराभव झाला तर सर्वत्र तुमचे हसे होईल' अशा प्रकारच्या निरोपाने राघोबांनी आपला विचार बदलला. राघोबा लढाई न करता दु:ख सांत्वनांच्या निमित्ताने भेटावयास आले. या त्यांच्या जीवनातील ठळक प्रसंगातून त्यांच्या व्यक्तीमत्त्वातील मुत्सद्दी व पराक्रमी नेतृत्वाचे गुण दिसून येतात. कोणताही रक्तपात न करता ही लढाई त्यांनी जिंकली त्या नुसत्या धार्मिक नव्हत्या तर शूर राज्यकर्त्या होत्या हे शोधअंती दिसून येते. अशाप्रकारचे विविध पैलू त्यांच्या व्यक्तीमत्वात दिसून येतात.

**प्रकरण दुसरे** अहिल्याबाई होळकर यांचे राजकीय व प्रशासकीय कार्य यामध्ये पेशव्यांच्या कालखंडात होळकरांच्या राजकारणाचा व प्रशासनाचा शोध घेतला आहे. ॲरिस्टॉटलने राजकारणाला पॉलिटिक्स हा शब्द प्रयोग केला. त्याचा अर्थ राज्य विषयक शास्त्राचे विवेचन असा होतो. पुढे राज्यशास्त्राचे सैध्दांतिक राजकारण आणि व्यवहारीक राजकारण असे दोन भाग पाडण्यात आले. व्यवहारिक राजकारणामध्ये राज्य आणि

शासनाचे स्वरुप, त्यांची कार्ये, कुटनीती, राष्ट्रराज्यातील तह, करारनामे व राजकारण यांचा अभ्यास होतो. राजकारणाचा संबंध राजकीय वर्तनाशी येतो. राजकारण हे नेहमी विविध स्तरावर चालणारे असते. उदा. हक्क, मते, स्वातंत्र, पगारवाढ, भत्ते इ. प्रश्नांची उत्तरे राजकीय मंचावरुन दिली जातात. म्हणून ''सत्तेचे पाठबळ प्राप्त करणे आणि आपले हितसंबंध सुरक्षित ठेवणे हाच राजकारणाचा अर्थ होय. अशी व्याख्या मार्कसने केली आहे.'' ज्या आधारावर राजकीय सिध्दांत निर्माण होतात त्यासाठी काही विशिष्ट घटना घडाव्या लागतात त्या घटना व्यक्तीच्या आणि नेत्यांच्या राजकीय व्यवहाराद्वारे घडतात. त्यालाच राजकारण म्हणतात. ''कोणाला काय मिळते, कसे मिळते ह्याचा अभ्यास म्हणजे राजकारण'' असे लॉसवेल म्हणतो. वरील सैध्दांतिक मांडणीचा विचार करता अहिल्याबाई होळकरांच्या हाती असणारे राज्य तत्कालीन अनेक मुत्सदीने ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला परंतु अहिल्याबाईनी आपल्या राजनितीच्या जोरावर ते यशस्वी होवू दिले नाही. त्यानी आदर्श राजकारभार व पारदर्शक प्रशासन करुन त्यातून जनतेचा व सैनिकांचा पाठिंबा मिळविला व स्वत:चे हितसंबंध सुरक्षित ठेवले. तसेच शेजारील राज्यांशी मैत्रीपूर्ण संबंध प्रस्थापित केले. हे त्यांचे राजकीय कार्य संशोधनातून स्पष्ट होते. याचे राजकीय विश्लेषण या प्रकरणात केले आहे.

मल्हारराव होळकरांचे कर्तृत्व पाहून पहिल्या बाजीरावाने मल्हारराव सारखा शूर सरदार आपल्या पदरी असणे महत्वाचे आहे असे लक्षात येताच त्यांनी मल्हारराव होळकरांना आपल्या सैन्यात भरती करून घेतले. मल्हाररावांनी आपल्या मोहिमा उत्तरेत गाजवायला सुरवात केली. आपल्या मुत्सद्दीपणा व पराक्रमाच्या जोरावर उत्तरेस मराठेशाहीचे वर्चस्व वाढविले त्यांच्या सोबत राणोजी शिंदे होते. पहिल्या बाजीरावाने दोघांचे कर्तृत्व पाहून त्यांना उत्तरेतील राज्यकारभाराच्या सनदा दिल्या परंतु वैयक्तिक राज्यविस्तारासाठी शिंदे-होळकर यांचे सातत्याने मतभेद झाल्याचे दिसते राजपूत जाट

यांच्यामधील लढाईत शिंदे व होळकर विरोधी लढले त्यामुळे राजपूत व जाट यांना त्याचा फायदा झाला. मल्हारराव होळकर अहिल्याबाईचे राजकीय गुरू होते. न्यायदान, प्रशासन, रणनिती, परराज्याशी संबंध, लढाईची तयारी याचे शिक्षण अहिल्याबाईंना मिळाले यातूनच अहिल्याबाईंच्या राजकीय व प्रशासकीय नेतृत्वाचा विकास झाला.

मल्हारराव व राणोजी यांच्या मृत्यूनंतर शिंदे घराण्यात महादजी शिंदेचा उदय झाला तर होळकरांच्यात मल्हाररावाचा विश्वासू सैनिक तुकोजी होळकर याचा उदय झाला. तुकोजी होळकरांनी मोहिमेवर जावे आणि अहिल्याबाईंनी राज्यकारभार पाहावा अशी सनद पेशव्यांनी होळकरांना दिली होती असे शोध अंती दिसून येते. त्यामुळे होळकरांच्या राज्यात दुहेरी व्यवस्था निर्माण झाली. मल्हारराव होळकरांनी पहिल्या बाजीरावाकडून होळकरांच्या स्त्रीयांना खाजगी दौलतीच्या अधिकाराची सनद लिहून घेतली होती. त्यामुळे होळकरांच्या राज्यात दौलतीचे दोन विभाग होते. खाजगी व सरकारी दौलत. अहिल्याबाईंनी जी लोककल्याणकारी कामे केली जे दानधर्म केला जो खाजगीच्या पैशातून केल्याचे स्पष्ट होते. मल्हाररावांच्या मृत्यूसमयी सोळा कोटी रुपयांचे खाजगी जहागिरीचे उत्पन्न शिल्लक होते व पंधरा लाख रुपयांच्या खाजगी जहागीरीच्या प्रदेशावर अहिल्याबाईंची संपूर्ण मालकी होती तसेच प्रत्येक महालातून योणारा शेरी नजराणा असे.

अहिल्याबाईंच्या राज्यावर चंद्रावत या राजपूत राजांनी आक्रमण केले तेव्हा स्वत: अहिल्याबाईंनी बुध्दीचातुर्याने हे आक्रमण मोडून काढले. अहिल्याबाईंनी शरीफभाई या शूर लढवय्याच्या नेतृत्वाखाली सैन्य पाठविले. स्वत:त्या युद्धभूमीवर गेल्या. सैनिकांना प्रोत्साहित केले. त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून दिली याबाबत त्यांचे पुढील विधान साक्ष देते. चंद्रवताचा कायम बिमोड करण्यासाठी सैनिकाला म्हणाल्या ''मेले हो तोंड दाखवयास आला तर मेकसू घालून मारून टाकिन मेवाड होते की नव्हते असे करून टाका'' अशाप्रकारे अहिल्याबाईंनी सैनिकाला बजावून सांगितले त्याप्रमाणे सैनिकांनी विजय प्राप्त

केला वरील विवेचनाचा विचार करता त्या वेळप्रसंगी कर्तव्यकठोर होत. या त्यांच्या बहादूरीबद्दल खुद्द पेशव्यांनीही तोफाची सलामी देऊन त्यांचा गौरव केला.

अहिल्याबाई पेशव्यांनी काढलेल्या मोहिमेवर गेल्या नाहीत परंतु तुकोजीला युद्धविषयक व राजकारणाविषयक सल्ला अहिल्याबाई देत असत असे त्यांनी पाठविलेल्या विविध पत्रांतून दिसून येते. परराज्याशी युद्ध, तह, परकीय संस्थानातील वकिलांच्या नेमणुका अहिल्याबाई स्वत: करीत असत. त्यांना माणसांची पारख अचूक होती. त्यामुळे त्यांना शरीफभाईसारखे प्रामाणिक सेवक लाभले. अहिल्याबाईंच्या परराष्ट्र नितीचा विचार करता विश्लेषण अंती असे म्हणता येईल की त्यांनी नेहमी शांततेचा पुरस्कार केला. स्वत:हून कोणत्याही राज्यावर आक्रमण केले नाही. वेळप्रसंगी स्वत: रणांगणांवर जाऊन रणनिती आखली त्यांचे शेजारील राज्यांशी अत्यंत मैत्रीपूर्ण संबंध होते. टिपू, निजाम यांनी अहिल्याबाईच्या राज्यावर कधीही आक्रमण केले नाही यावरून अहिल्याबाईंचे परराष्ट्रनितीचे धोरण स्पष्ट होते.

अहिल्याबाईंच्या राज्यात त्यांना बाहेरच्या राजकारणापेक्षा त्यांच्या घरात मोठ्या प्रमाणात गृहकलह झाला. त्यांच्या तीस वर्षाच्या राजवटीत अहिल्याबाई व तुकोजी यांचे मतभेद झाले. तुकोजी शूर होता परंतु मुत्सद्दी नव्हता. तो दुसऱ्याच्या विचाराने वागणारा होता. या वादात नाना फडणवीस व महादजी शिंदे यांनी मध्यस्थी केल्याने हा चौरंगी वाद सुरू झाला. तुकोजी व अहिल्याबाई यांच्यात कारभारावरून व पैशावरून वाद झाले. नाना फडणवीस तुकोजीला अनुकूल असल्यामुळे तुकोजीच मालक अशी मराठ्यांची समजूत होती. मल्हारराव होळकरांनी त्यांना पुत्र मानले त्याचा उल्लेख तसाच होत गेला. त्यांचे दत्तक विधान झाले नव्हते. तुकोजीची पत्नी रखमाबाई महत्त्वकांक्षी स्त्री होती आपला पती लष्करी जबाबदारी सांभाळतो व मोहिमेवर जातो तेव्हा कारभाराची संधी आपल्याला मिळावी असे रखमाबाईला वाटे. तुकोजीचा कारभारी नारो गणेश तिच्या या महत्त्वकांक्षेला

पाठिंबा देत असे. अहिल्याबाई-तुकोजी मतभेद झाले की नारो गणेश त्याचा फायदा घेत असे असे संशोधनातून दिसून येते. अहिल्याबाईंनी नेमलेली माणसे त्यांच्याशी प्रामाणिक राहत असत. शिवाजी गोपाळ हा अशा माणसांपैकी एक होता. शिवाजी गोपाळमुळे आपले महत्त्व कमी होणार म्हणून नारो गणेश यांनी अहिल्याबाईंना न विचारता शिवाजी गोपाळची बदली पुणे येथे केली त्यास तुकोजींनी संमती दिली. अशा अनेक प्रकरणात अहिल्याबाई-तुकोजी मतभेद झाले.

महादजी शिंदेना अहिल्याबाईंच्याकडे राज्यकारभार असावा याबाबत समर्थता दर्शविली तर नाना फडणविसाचा भ्रम असा झाला होता की अहिल्याबाईस महादजी सल्ला देतात. यावरून हा वाद वाढत गेला. वास्तविक पाहता हा वाद नाना फडणवीस स्वत: महेश्वरला जाऊन मिटवू शकले असते परंतु तो वाद कधी त्यांनी मिटवला नाही असे विश्लेषन अंती दिसून येते. तुकोजी, नारो गणेश व नाना फडणवीस यांना राज्यहितापेक्षा स्वहिताचा मोह जास्त होता. तुकोजी व नारो गणेश यांनी अहिल्याबाईंची मतभेद न करता त्याच्याशी पूर्ण निष्ठा राखून वर्तन केले असते तर होळकर शाहीबरोबर संपूर्ण मराठी सत्तेलाच खंबीरता आली असती.

नाना फडणविसाचे चरित्रकार वासूदेवशास्त्री खरे लिहितात की शिंदे हे कर्ते शूर सरदार होते हे वर्चस्व नाना फडणविसास मान्य नव्हते. शिंदे होळकरांची जोडू फोडून त्या तेढ उत्पन्न करावी व दोघापैकी कोणासतरी एकास नेहमी आपल्या बाजूस वळवावे असे नाना फडणविसास वाटे. शिंद्यांचे वर्चस्व कमी व्हावे म्हणून त्यांनी तुकोजी होळकरास पाठीशी घातले. शिंदे-होळकरांचे पूर्वापार वैमनस्य व नाना फडणविसाचा तुकोजीस पाठिंबा यातूनच लाखेरीचे युद्ध १७९३ साली झाले. यात होळकरांचा पराभव झाला. तुकोजीचा उपयोग नानांनी स्वत:चे पद टिकवण्यासाठी केला. शिंदे होळकरांच्या मैत्रीचे महत्त्व अहिल्याबाईंना कळले ते नाना फडणविसांना कळले नसेल असे म्हणता येणार नाही परंतु केवळ स्वत:च्या

स्वार्थासाठी त्यांच्यातील मतभेद कायम ठेवले याचा तोटा संपूर्ण मराठेशाही दुबळी करण्यास झाला. पुढे होळकर-शिंदे वाद वाढत गेले ते राज्याचे हित पाहण्यापेक्षा स्वत:चे हित पाहू लागले. मराठेशाही दुबळी झाली असे संशोधनातून स्पष्ट होते.

अहिल्याबाई होळकर यांच्या प्रशासकीय कार्याचा अभ्यास केला असता असे दिसून येते की, होळकरांच्या कारभारात प्रशासनाचे दोन भाग होते. एक खाजगी जहागीर व सरकारी जहागीर.

राज्याच्या मोठ्या विभागांना सरकार म्हणत. प्रत्येक सरकारात १० ते ४० जिल्हे असत त्यांना परगणा अथवा महाल असेही म्हणत. परगण्याचे पुन्हा तालुक्यात विभाजन केलेले असे. होळकरांच्या ताब्यात १२६ परगाणे होते. होळकरशाहीत दिवाण हा सर्वोच्च अधिकारी असे त्याची नेमणूक पुणे दरबारातून होई. परगण्याच्या मुख्य अधिकाऱ्याला कमाविसदार म्हणत. परगण्याची शांतता प्रस्थापित करण्याची जबाबदारी कमाविसदाराची होती.

अहिल्याबाईंच्या न्यायीपणाबद्दल तत्कालीन कालखंडात सर्वत्र ख्याती होती. आजच्या सारखे लिखित कायदे त्यावेळी नव्हते. परंतु अहिल्याबाईंची धारणाशक्ती प्रबळ होती. त्यांना अन्यायाचा तिटकारा होता. त्यांचे न्यायीक कार्य उत्तम न्यायाधीशाप्रमाणे होते. मोगलांच्या काळात राज्यात न्यायालये फार कमी होती. होळकरांच्या राज्यात नियमबद्ध न्यायालयाची सुरुवात अहिल्याबाईंच्या काळापासून सुरू केली होती. शिंदे आणि होळकर यांच्यातील जमिनीच्या वादाचा निर्णय लावण्यात यावा म्हणून शिंदेंनी पंच म्हणून अहिल्याबाईंची नेमणूक केली होती. वास्तविक पाहता एका पक्षाचे फिर्यादी खुद्द अहिल्याबाई होत्या. अशा प्रकारचा विश्वास अहिल्याबाईंच्या न्यायव्यवस्थेबद्दल होता.

अठराव्या शतकात संपूर्ण देशात अस्थिरतेचे वातावरण होते परंतु अहिल्याबाईंच्या राज्यात शांतता होती. कारण त्या कोणत्याही शेतकऱ्यांकडून नियमापेक्षा जादा वसूल घेत

नसत. खरीप पीके कापल्यावर महसुलाची निश्चिती केली जात असे. तत्कालीन कालखंडात महापूर, टोळधाड, गारांचा वर्षाव, अवर्षण, नैसर्गिक प्रकोप आणि फौजेच्या हालचालीमुळे पिकांची पायमल्ली अशा परिस्थितीत अहिल्याबाई शेतकऱ्यास साऱ्यात सूट देत असे. अहिल्याबाईंचे शेतकऱ्याविषयी धोरण आजच्या राज्यव्यवस्थेला अनुकरणीय आहे.

अहिल्याबाई हे दूरदृष्टीचे नेतृत्व होते. त्यांनी बदलत्या काळानुसार आपल्या पारंपरिक सैनिक व्यवस्थेत बदल करून पाश्चात्य पद्धतीची फौज कर्नल जे. पी. बॉईड नावाच्या अमेरिकन अधिकाऱ्यामार्फत करून घेतली होती. यामध्ये आधुनिक पद्धतीने सैनिकांना प्रशिक्षण दिले होते. अहिल्याबाईंनी सैनिकांमध्ये विश्वास निर्माण केला होता. नारो गणेशाने तुकोजीच्या मदतीने सैन्यात अहिल्याबाईंच्या विरोधात फितुरी करण्याचा प्रयत्न केला होता. सैनिकांनी उत्तर दिले की ‘एक वेळ आम्ही पेशव्यांच्या विरोधी लढण्यास तयार आहे परंतु अहिल्याबाईंच्या विरोधात आम्ही लढणार नाही, अशा प्रकारची विश्वासार्हता त्यांनी सैनिकांमध्ये निर्माण केली होती.

कोणत्याही राज्यव्यवस्थेमध्ये धोरणात्मक निर्णय घेणाऱ्या नेतृत्वाने घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करणारा प्रशासकीय वर्ग हा कार्यक्षम व विश्वासू असावा लागतो तरच राज्य सुव्यवस्थितरित्या चालते तशा प्रकारची विश्वासार्हता व कार्यक्षमता अहिल्याबाईंनी त्यांच्या राज्यव्यवस्थेतील सेवकांत निर्माण केली होती. त्यामुळे अहिल्याबाईंच्या राज्यातील प्रशासन व्यवस्था व राज्यकारभार एक आदर्श होता, असे संशोधनातून स्पष्ट होते.

**प्रकरण तिसरे** अहिल्याबाई होळकर यांचे सामाजिक कार्य यामध्ये मनुष्य हा समाजशील प्राणी आहे. राजकारण हे समाजाच्या जीवनाचे अंग आहे. समाजामध्ये अनेक घटकांचा व कार्यांचा समावेश होतो. समाजाशिवाय राजकारणाचा जन्म होवू शकत नाही

आणि समाजाच्या अभ्यासाशिवाय राजकारणाचा अभ्यास करणे योग्य ठरत नाही. समाज ही एक व्यवस्था असते, व सातत्याने घडत असणाऱ्या अनेक प्रक्रिया यांची मिळून बनलेली असते. आणि राजकारण ही अशा प्रक्रियेपैकी एक प्रक्रिया असते. तिला विशिष्ट सामाजिक संदर्भ असतो. राज्याचे संविधान किंवा राज्यातील राजकीय संस्था किंवा शासकीय संस्था यांच्या निर्मितीमागे निश्चित अशी मानवी प्रेरणा व हेतू असतो. त्या सर्वांचा विचार केल्या शिवाय त्या संस्थांचे कामकाज समजून येत नाही. हा विचार मान्य झाला. ज्या सामाजिक परिस्थितीत राजकीय प्रक्रिया किंवा राजकीय घटना घडतात त्या परिस्थितीचे ज्ञान असल्याशिवाय ती घटना योग्य रितीने समजू शकत नाही. हे मोठ्या प्रमाणात मान्य झाले.

फ्रॅंकलीन एच गीडींग्ज असे म्हणतो की, "ज्याला समाजाचे नियम माहित नाही त्याला राज्यशास्त्र आणि त्याचे सिध्दांत आमलात आणण्याची कला यांची माहिती शिकविणे म्हणजे गुरुत्वाकर्षनाचे नियम माहित नसणाऱ्या व्यक्तिला खगोलशास्त्र शिकविणे होय कि ज्या अभ्यासाचा त्याला काहीच फायदा आणि ज्ञान प्राप्त करता येणे शक्य नाही" अशाच प्रकारे अहिल्याबाई होळकरांनी सामाजिक परिस्थितीचे चिंतन करुन राजकीय सत्तेचा उपयोग लोककल्याणकारी राज्य निर्मितीसाठी केला. स्त्री व पुरुष यामध्ये समता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला.

अहिल्याबाईंनी ज्या शतकात सामाजिक कार्य व विचार मांडला ते अठरावे शतक अत्यंत विषमतेतून वाटचाल करीत होते. स्त्रियांकडे पाहण्याचा कुटुंबाचा किंवा समाजाचा दृष्टिकोन विषम होता. पुरुषांना समाजात जे स्थान होते ते स्त्रियांना नव्हते आजही नाही. तत्कालीन कालखंडात एकत्र कुटुंब पद्धती असल्यामुळे सासू, सासरे, घरातील इतर आप्तजन यांची सेवा करणे हे तिचे आद्य कर्तव्य मानले जाई. बहुपत्नीकत्व, बालविवाह, वैधव्य, केशवपण, सतीचाल, पडदापद्धत, हुंडा पद्धत अशा अनेक जटील प्रथा अस्तित्वात होत्या. अहिल्याबाई होळकरांनी त्यातील काही प्रथा मोडीत काढून कल्याणकारी सामाजिक

कार्य केले. यामध्ये प्रामुख्याने त्यांनी त्यांच्या राज्यात दोनशे वर्षांपूर्वी हुंडा बंदीचा आदेश काढला होता. स्वतः सती न जाता तत्कालीन स्त्रियांपुढे आदर्श निर्माण केला. स्त्रीचा पती वारल्यावर ज्या स्त्रीच्या संपत्तीला वारस नाही. त्यासाठी स्त्रीला दत्तक घेण्याचा अधिकार त्यांनी दिला, विधवा स्त्रियांना संरक्षण मिळवून दिले.

अहिल्याबाईंच्या राज्यात जे भिल्ल, गोंड यात्रेला जाणाऱ्या यात्रेकरूंची लुटालूट करत, भिलकवडी हा कर यात्रेकरूंकडून घेत त्याबाबत त्यांच्याकडे तक्रार येताच त्याचा बंदोबस्त केला. त्यांच्या 'भिलकवडी' कराला मान्यता दिली. त्या लोकांना उदरनिर्वाहासाठी शेती देऊन त्यांचे पुनर्वसन केले. त्यांना त्या बदल्यात तेथील भागातील लोकांचे संरक्षण करण्यास सांगितले. अशा प्रकारे अहिल्याबाईंचे लोकाभिमुख प्रशासन होते.

तत्कालीन समाज हा धार्मिक प्रथा, परंपरेवर आधारित होता. तीर्थयात्रा, उपहास, धार्मिक स्थळांना भेटी देणे ही कृत्ये करीत. सोयी सुविधांसाठी आजच्या सारखी शासन व्यवस्था नव्हती. तत्कालीन राजे, संस्थानिक, धनिक, व्यापारी यांच्या सोयी-सुविधांचे काम करत असे. यात्रेकरूंची व नगरवासीयांची सोय व्हावी म्हणून त्यांनी घाट, धर्मशाळा, वाडे, पाणपोया, रस्ते, कुंड, तलाव, अन्नछत्र सुरू केले. धर्मशाळा व अन्नछत्रांमुळे अनेक गरीब यात्रेकरूंची राहण्याची व जेवणाची सोय होत असे त्यांनी केलेली कल्याणकारी कार्ये केवळ आपल्या राज्यात न करता संपूर्ण देशभर केले हे कार्य श्रीमंत लोकांसाठी न करता संपूर्ण भारतातील सामान्य, कष्टकरी गरीब लोकांसाठी केले. या ठिकाणी अहिल्याबाईंचा राष्ट्रनिर्मितीचा उद्देश दिसून येतो.

दोनशे वर्षांपूर्वी त्यांनी बांधलेल्या विहिरी, तलाव आजही लोकांच्या उपयोगी पडतात. चांदवड जेजुरी येथील विहिरीचा उपयोग त्या शहरातील लोकवस्तीला पाणीपुरवठा करण्यासाठी होत आहे. शासन जे रोजगार हमी योजनेअंतर्गत ज्या योजना राबवत आहे त्या

योजना अहिल्याबाईंनी दोनशे वर्षांपूर्वी राबविल्या. तत्कालीन कालखंडात दळणवळणाची प्रवासाची साधने अत्यंत मर्यादित होती. अशा परिस्थितीत प्रवासाच्या सोयीसाठी कलकत्तापासून काशीपर्यंत रस्ता अहिल्याबाईंनी तयार केला. महत्त्वाच्या ठिकाणी नदीवर पूल बांधले. त्यात प्रामुख्याने त्र्यंबकेश्वर, मालेगाव येथील नदीवर पूल बांधण्याचे शोधअंती स्पष्ट होते. अहिल्याबाईंनी बांधलेले घाट स्थापत्य शास्त्राचे आदर्श नमुने आहेत.

अहिल्याबाईंनी तत्कालीन कालखंडात फक्त मानव प्राण्यांची सोय केली असे नाही तर पशु-पक्षी, जनावरे यांचीही काळजी घेतली होती. रानातील पशु-पक्षांसाठी धान्यांनी भरलेली शेते मोकळी सोडली जात असे. नदीतील माशांना त्यांचे खाद्य टाकले जात असे. गायींसाठी कुरणे राखून ठेवली होती. प्राण्यांसाठी जंगलात विहिरी, तलाव बांधले होते. अशा प्रकारे पशुसंवर्धनाच्या अनेक योजना त्यांनी राबविल्या होत्या. त्यांच्या महेश्वर येथील वाड्यात गरीब लोकांना दरदिवशी अन्नदान केले जात असे हिवाळ्यात अपंग व आश्रितांना वस्त्रे देण्यात येत असे. तत्कालीन कालखंडात जे विद्वान, शाहीर, पंडित, कवी होते त्यांच्या ज्ञानाला वाव मिळावा त्यांच्या ज्ञानाचा समाजाला उपयोग व्हावा, समाजामध्ये प्रबोधन व्हावे म्हणून बुद्धीजीवी वर्गाला इनामे दिली यामध्ये शाहीर अनंत फंदी, कवी मोरोपंत, अहिल्या कामधेनू हा संस्कृत ग्रंथ लिहिणारे खुशालीराम यांचा उल्लेख करता येईल अशा प्रकारे ज्ञानाबद्दल उदात्त दृष्टिकोन त्यांनी दाखविला होता. अहिल्याबाईंच्या सामाजिक कार्यावरील विश्लेषण अंती असे दिसून येते की, अहिल्याबाईंनी समाजकल्याण हे साध्य व राजकारण हे साधन या तत्वाचा वापर त्यांनी केल्याचे संशोधनातून स्पष्ट होते. यातूनच समाजकारण व राजकारण यांचा समन्वय कशा पध्दतीने साधला जावून जनकल्याणाचे कार्य घडू शकते याचे ज्वलंत उदाहरण म्हणजे अहिल्याबाई होत.

**प्रकरण चार** अहिल्याबाई होळकर यांचे धार्मिक कार्य यामध्ये प्राचीन कालखंडापासून धर्माला राज्यसंस्थेत महत्त्वाचे स्थान आहे. धर्म हा केवळ महत्त्वाचा घटक

नसून तो नियंत्रक होता. धर्म दोन प्रकारच्या भूमिका बजावतात एक भूमिका माणसांना जगण्याचे प्रयोजन शिकविणारी, जीवन संघर्षात हतबल झालेल्या दु:ख आणि दारिद्रयाने पिचून गेलेल्या, अविश्रांत श्रमांनी थकलेल्या उदास एकाकी आणि भयग्रस्त बनलेल्या माणसांचे सांत्वन करणे ही धर्माची महत्वाची भूमिका आहे. धर्माची दूसरी भूमिका राजकीय तत्वप्रणालीची जागा घेण्याची आहे. मुस्लिम राजवटीत हिंदूंच्या मनावर फार मोठ्या प्रमाणात आघात झाले होते. हिंदूंची धार्मिक स्थळे, मंदिरे, तीर्थक्षेत्र यांची तोडफोड केली होती. या सर्व गोष्टींचा परिणाम म्हणून तत्कालीन समाज मोठ्या प्रमाणात धार्मिकतेकडे वळला होता. मूर्तीपूजा, उपासना, तीर्थयात्रा या सर्वांना धर्मात महत्त्व होते.

छ. शिवाजी महाराजांपासून मराठा कालखंडात अनेक मंदिरे बांधली होती. अठराव्या शतकात छ. शाहू महाराज बाळाजी विश्वनाथ, पहिले बाजीराव, चिमाजी अप्पा, नानासाहेब पेशवे, नाना फडणवीस यांनी अनेक मंदिरे बांधली यांच्या प्रेरणेने अहिल्याबाई होळकर यांनी संपूर्ण भारतभर मंदिरे बांधली. मंदिरे बांधण्यामागचा उद्देश असे की मंदिरातून लोकांचे प्रबोधन होई. कथा, कीर्तन, भजन, प्रवचन, धार्मिक ग्रंथांचे पारायण, धर्मसभा, संस्कृत पाठशाळा, चर्चा, उत्सव, यात्रा, जातपंचायत, न्यायनिवाडा करणे इत्यादीमुळे मंदिरे सार्वजनिक संस्कार केंद्रे बनली होती. तत्कालीन कालखंडात सार्वजनिक कार्यक्रमांना दुसऱ्या सोयी नव्हत्या. त्यामुळे सामान्य गरीब लोकांची त्यातून सोय होत असे.

अहिल्याबाईंनी बांधलेल्या मंदिरामुळे नृत्य, गायन, वादन, शिल्पकला, वास्तूकला, चित्रकला, मूर्तीकला अशा कलाकारांना या मंदिर बांधणीतून कलेला वाव मिळाला. कारागिरांना काम मिळाले. मुस्लिम आक्रमणाला बळी पडलेल्या मंदिरांचा जीर्णोद्धार झाला. तत्कालीन कालखंडात मंदिरे, तीर्थक्षेत्रे सामाजिक जीवनात महत्त्वाची भूमिका बजावत. मंदिरे हे केवळ देवांचे निवासस्थान न होता समाजातील व्यक्ती घटना ह्या त्याच्याशी निगडीत असतात. मंदिर बांधणीतून अनेक तीर्थक्षेत्रे निर्माण झाली व

तीर्थक्षेत्रांमुळे मोठ्या प्रमाणात यात्रा भरू लागल्या. यातूनच व्यापार, पर्यटन इत्यादी क्षेत्रे विकसित झाली आहेत. त्यातून अनेक लोकांना तत्कालीन काळखंडात रोजगार मिळाला. ज्या ठिकाणी यात्रा भरली जाई तेथे लोक जात, धर्म विसरून एकत्र येऊ लागले त्यातून राष्ट्रीय एकात्मता वाढीस लागली, असे शोधअंती दिसून येते.

अहिल्याबाईंच्यावर सरदेसाई गो. स. यांनी आरोप केला की "अहिल्याबाईंनी धार्मिक दानधर्मात मोठ्या प्रमाणात पैसा खर्च केला व सैन्याकडे दुर्लक्ष केले"[२] परंतु शोधअंती असे दिसून येते की, आठराव्या शतकात एकमेव त्यांच्या राज्यातील जनता शांतता व सुरक्षित जीवन जगत होती. त्यांच्या तीस वर्षांच्या कालखंडात त्यांनी जो पैसा धार्मिक लोककल्याणात खर्च केला तो पैसा सार्वजनिक नव्हता त्यांची ती खाजगी दौलत होती. त्यातून तो पैसा त्यांनी खर्च केला होता. त्यांनी जर सैन्यावर मोठ्या प्रमाणात खर्च केला असता तर तीस वर्षे त्यांच्या कालखंडात जनता शांततेने राहिली नसती कारण सातत्याने राज्यात युद्धाचे सावट राहिले असते त्यांनी धार्मिक कार्य करताना सर्व धर्मीयांना समतेची वागणूक दिली. त्यांनी जे धार्मिक लोककल्याणकारी काम केले ते सर्वसामान्य व गरीब लोकांच्या सोयी सुविधांसाठी केले. याबाबत इंग्रज सेनानी सर जॉन माल्कम म्हणतात प्रजा प्रेमाच्या बळावर राज्य करणे हे उत्तम राज्यकर्त्याचे लक्षण ते अहिल्याबाईने आचरणात चांगले दिसते. बुद्धीची कुशाग्रता, नीतीचे आचरण या गुणांमुळे अहिल्याबाई प्रजेच्या प्रशंसेस पात्र झाली. अहिल्याबाईंवरील आरोपांचे खंडन एम. डब्ल्यू. बर्वे यांनीही लिहिलेल्या अहिल्याबाई होळकर या जीवनचरित्रात खुलासेवर केले आहे, असे संशोधनातून दिसून येते.

प्रकरण पाचवे निष्कर्ष (उपसंहार) अहिल्याबाई होळकर यांचे नेतृत्व - एक राजकीय अभ्यास याचा अभ्यास केला असता असे दिसून येते की, अहिल्याबाईनी राज्यकारभारविषयक लिहिलेल्या विविध पत्रातून त्यांच्या नेतृत्व गुणात त्यांच्या

स्वभावातील गांभीर्य राजकारणातील मुत्सदीपणा, मनाची थोरवी, कर्तव्यदक्षपणा, संकटाना सामोरे जाण्याचे धैर्य इत्यादी गुण दिसून येतात.

मल्हारराव होळकरांनी अत्यंत संघर्षातून माळवा प्रांतात मराठा साम्राज्य वाढविले. मुलगा खंडेरावाच्या मृत्यूनंतर अहिल्याबाईच्या अंगी असणाऱ्या राजकीय नेतृत्वगुणांमुळे सर्व राज्यकारभार अहिल्याबाईंच्या हाती सोपविला. तत्कालीन प्रथा परंपरेनुसार स्त्रियांनी फक्त चुल आणि मूल ह्याच गोष्टी करायच्या अशी प्रथा होती. मल्हारराव होळकरांनी अहिल्याबाईंच्या कर्तृत्वगुणांना वाव दिला नसता तर अहिल्याबाईंचे नेतृत्व उदयाला आले नसते हे शोधअंती स्पष्ट होते. आजही अनेक स्त्रिया कर्तृत्ववान आहेत परंतु समाजव्यवस्थेत त्यांच्या गुणांना वाव दिला जात नाही. पारंपारिक प्रथेत त्यांना आडकूण ठेवले जाते.

ज्या ठिकाणी महादजी शिंदे, पेशवे यांचे राज्यकारभारात चूकीचे निर्णय झाले असता अहिल्याबाई त्यांना जाब विचारत असत यावरुन त्यांच्या स्वभावातील स्पष्टवक्तेपणा हा गुण दिसून येतो. अहिल्याबाईंचे पती, सासरे व मुलगा मालेरांव यांच्या निधणानंतर राघोबा पेशवे, नाना फडणवीस, महादजी शिंदे, राजपूत राजे यांनी दबाव टाकून त्यांचे राज्य आपल्या ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला परंतु अहिल्याबाईंनी स्वतःच्या बुध्दीचातुर्याच्या जोरावर सर्वांचे प्रयत्न अयशस्वी केले.

अहिल्याबाईंच्या राज्यातील प्रशासन व्यवस्था पारदर्शक होती म्हणून त्या विश्वास पूर्ण म्हणत की राज्य कारभारात पैशाच्या हिशोबात एक कवडी माझ्याकडे निघाली तर त्या व्यक्तीस पाच कवड्या देईन, अशा प्रकारे आजच्या भ्रष्ट प्रशासन व्यवस्थेला हा अहिल्याबाईंचा विचार आदर्श आहे. राज्य कारभार विषयक आपले विचार व्यक्त करताना त्या म्हणतात, ''ईश्वराने सोपविलेली जबाबदारी मला पार पाडायची आहे. प्रजेला सुखी करणे हे माझे कर्तव्य आहे. माझ्या प्रत्येक कामाची जबाबदारी माझ्यावरच आहे. सामर्थ्य

आणि सत्ता यांच्या बळावर मी जे करत आहे त्याचा जाब मला परमेश्वराच्या दरबारात द्यावा लागणार आहे.''

अहिल्याबाईंनी सामाजिक प्रश्नांचे सर्व बाजूनी चिंतन केले. आपली सर्व संपत्ती दुर्बल लोक, उपेक्षित स्त्रिया, शेतकरी यांच्यासाठी खर्च केली व त्यांच्या मुलभुत प्रश्नांना प्राधान्य दिले. सामान्य माणसाचे संरक्षण केले. स्त्री व पुरुष यांच्यामध्ये समता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केले व समतेवर आधारीत समाज उभा रहावा यासाठी प्रयत्न केले.

कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्र ग्रंथात प्रजेच्या सुखात आणि हितामध्ये राजाचे सुख आणि हित सामावले होते असे म्हटले आहे. ॲरिस्टॉटलच्या मते मनुष्याचे जीवन सुखी करण्यासाठी राज्याची निर्मिती केली आहे यातूनच राज्याचे कल्याणकारी स्वरुप स्पष्ट होते. या तत्वाप्रमाणे अहिल्याबाईनी आपल्या हाती असणाऱ्या सत्तेचा उपयोग राज्यातील जनतेच्या लोककल्याणासाठी केला. आजच्या लोकशाही व्यवस्थेतील राज्यकर्ते सत्तेचा वापर व्यक्तिगत स्वार्थ, नातेवाईक, जात यासाठी करताना दिसतात व जनतेच्या कामांना दुय्यम स्थान देतात.

मुस्लिम राजवटीने केलेला विध्वंस, अन्यायअत्याचार यांचे चिंतन अहिल्याबाईंनी केले. अनेक धर्मग्रंथातील मानवतावादी विचार त्यांनी आत्मसात केले. सामाजिक सत्य शोधणारा, नैतिकता, कर्तव्यावर निष्ठा ठेवणारा, श्रध्दा, न्याय विश्वास यावर भर देणारा धर्म त्यांना अपेक्षित होता. शांतिपर्वात उतथ्य व वामदेव या दोन विचारवंताने राजाने आपल्या राजकीय कार्यात धर्माचा उपयोग करुन लोकांचे कल्याण करावे याचे विवेचन केले आहे त्यांच्या मते प्रजेच्या वर्तनातील दोष दुर करुन त्यांना धर्माच्या मार्गावर लावण्याचे काम राजाने केले पाहिजे. राज्यातील कमजोर व गरीब वर्गाचे संरक्षण करावे. आपल्या राज्यातील अधिकाऱ्यांना प्रजेवर अन्याय करु देवू नये. राज्यांनी लोकांना रोजगार दिला पाहिजे.

अशा प्रकारे धर्मामध्ये मानवतावादी लोकांचे कल्याणकारी जे तत्व सांगितले त्या तत्वाचा अवलंब अहिल्याबाईनी राज्यकारभारात केला. त्यामुळे जनतेचा पाठिंबा त्यांना मिळाला. इतर धर्माचा द्वेष केला नाही त्या धार्मिक होत्या परंतु धर्मांध नव्हत्या. आजच्या लोकशाही राजकीय व्यवस्थेत धर्माचा वापर करुन राजकर्ते राजकीय सत्ता मिळविण्याचा प्रयत्न करतात. अशा प्रकारे धर्माचा वापर त्यांनी राजकारणात केला नाही. अहिल्याबाईंच्या कुशल नेतृत्वामुळेच होळकर राज्य कल्याणकारी राज्य निर्माण झाले. सद्यकालीन राज्यव्यवस्थेतील भ्रष्टाचार, बेरोजगारी, लोकांच्या मुलभूत गरजांचा प्रश्न, न्यायव्यवस्थेबद्दल लोकांची घटती विश्वासार्हता हे प्रश्न सोडविण्यासाठी अहिल्याबाईंचे विचार व कार्य उपयोगी आहेत.

**संदर्भ ग्रंथ सूची:**

१. केळकर, य.न., होळकरांची कैफियत, प्रकाशक कोकाटे सदाशिव लक्ष्मण, व्दितीय आवृत्ती १९७२, लेख ३३, पुणे, पृ. ३४.

२. सरदेसाई, गो.स., गर्गे स.मा. (संपा.) मराठी रियासत खंड -७, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, दुसरी आवृत्ती, १९९१, पृ. २२.

# संदर्भ ग्रंथ सूची

## (Bibliography)

### प्राथमिक साधने (मराठी)


१. अहिल्याबाई होळकर यांनी पंढरपूरचे बडवे यांना लिहिलेले पत्र, पंढरपूर. (अप्रकाशित)

२. मल्हारराव होळकर यांनी पंढरपूरचे बडवे यांना लिहलेले पत्र, पंढरपूर. (अप्रकाशित)

३. आठवले, सदाशिव, हिंगणे दफ्तर, खंड तिसरा, प्रकाशक - भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९८६.

४. आपटे, द. वि., चंद्रचूड दफ्तर कला १ ली, प्रकाशक - पोतदार द. वा. व मुजूमदार ग. वा. भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे शके १८४२.

५. ओतूरकर, रा. वि., महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास, प्रकाशक - दि. वा. गांगल अ. वि. गृह प्रकाशन, पुणे, १९९३.

६. खरे, वा. वा., ऐतिहासिक लेख संग्रह, भाग ४ था, नानाभाऊ छापखाना, पुणे, १९२७.

७. खोबरेकर, वि. गो., मराठ्यांच्या स्वाऱ्यांचे मुक्काम, प्रकाशक - इतिहास संशोधन मंडळ, मुंबई, १९७७.

८. ठाकूर, वा. वा., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, भाग १ व २, होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इंदोर, १९४०.

९. जोशी, श. ना., सेनापती दाभाडे दफ्तर, भाग १, प्रकाशक - भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९५१.

१०. पारसनीस, द. बा., महेश्वर दरबारची बातमीपत्रे, भाग १ व २, प्रकाशक - तुकाराम जावजी यांनी निर्णय सागर छापखाना, मुंबई, १९११, १९३०.

११. पुरंदरे, कृ. पा., पुरंदरे दफ्तर, भाग १, २ व ३ प्रकाशक - भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९५१.

१२. भागवत, अ. ना., होळकरशाहीतील स्त्रियांचा पत्रव्यवहार, प्रकाशक - द. ब. दांडेकर, इंदोर, १९२४.

१३. भागवत, अ. ना., होळकरशाहीच्या इतिहासाची साधने, पत्रव्यवहार पूर्वाध खंड १ ला, पुस्तक १६ वे, प्रकाशक - द. ब. दांडेकर, इंदोर, १९२४.

१४. बेंद्रे, वा. वा., महाराष्ट्रेतिहासाची साधने, विभाग तिसरा (इ.स. १७५१ ते १८८०) प्रकाशक - संचालक इतिहास संशोधन मंडळ, मुंबई, १९६७.

१५. वाड, चि. ग. व पारसनीस द. ब., इतिहास संग्रहात प्रसिद्ध झालेले पेशवे दफ्तरातील सनदा पत्रातील माहिती, प्रकाशक - तुकाराम जावजी, मुंबई, १९१७.

१६. सरदेसाई, गो. स., पेशवे दफ्तरातून निवडलेली कागदपत्रे, खंड ९, सेंट्रल गव्हर्नमेंट प्रेस, मुंबई, १९३३.

१७. सरदेसाई, गो. स., पेशवे दफ्तरातून निवडलेली कागदपत्रे, खंड ३४, सेंट्रल गव्हर्नमेंट प्रेस, मुंबई, १९३४.

## दुय्यम साधने (मराठी)


१. अत्रे, मु. म., सुभेदार मल्हारराव होळकर यांचे चरित्र, व्यवस्थापक नवीन किताबखाना, पुणे, शके १८१४.

२. अत्रे, मु. म., महाराष्ट्र तीर्थक्षेत्र दर्शन, प्रकाशक - अतुल बुक एजन्सी, पुणे, १९८६.

३. इनामदार, ना. र. व पुराणिक सु. ना., राजकीय समाजशास्त्र, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८४.

४. इंगळे, राम, मावळते मल्हारराव उद्योन्मुख महादजी, विश्वभारती प्रकाशन, नागपूर, १९८५.

५. कदम, सु. रा., सप्तशृंगी गड, प्रकाशक - डी. एन. नागर, पुणे, १९८०.

६. कविश्वर, ग. वा., अहिल्यागीत, प्रकाशक - क्षत्रिय धनगर सेवा संघ, इंदोर, १९७७.

७. कारंडे, य. ल., अहिल्या, आर्यता प्रकाशन १९९७.

८. कुलकर्णी, अ. रा. व खरे ग. ह., मराठ्यांचा इतिहास, खंड - २, प्रकाशक - कॅन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८५.

९. कुलकर्णी, अ. रा., खरे ग. ह., मराठ्यांचा इतिहास, खंड - ३, प्रकाशक - कॅन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८५.

१०. केळकर, य. न., होळकरांची कैफियत, हनुमान प्रकाशन, पुणे, १९५४.

११. केळकर, य. न., ऐतिहासिक पोवाडे, मराठ्यांचा काव्यमय इतिहास, खंड - २ रा, पुणे, १९४४.

१२. खरे, ग. ह., महाराष्ट्राची चार दैवते, प्रकाशक - दाते श. रा., पुणे, १९५८.

१३. खरे, वा. वा., नाना फडणीसाचे चरित्र, प्रकाशक - यशवंत वासुदेव शास्त्री, पुणे, १९२७.

१४. खोबरेकर, वि. गो., महाराष्ट्राचा इतिहास मराठा कालखंड, भाग - २ रा, प्रकाशक - महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, १९८४.

१५. गावडे, श. बा., देवस्थान क्लासिफिकेशन लिस्ट, खाजगी स्टेट, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, इंदोर, १९२३.

१६. गोखले, वा. दा., अहिल्याबाई होळकर, ठोकळ प्रकाशन, पुणे १९६२.

१७. चौसाळकर, अशोक, न्याय आणि धर्म, प्रतिमा प्रकाशन, पुणे, जुलै, २००५.

१८. चौसाळकर, अशोक (संपा.), धर्म समाज आणि राजकारण, लोकवाङ्मय गृह, मुंबई, मार्च, २००४.

१९. चौसाळकर, अशोक, नवरात्र, लोकवाङ्मय गृह, मुंबई, २०००.

२०. जहागिरदार विजया, कर्मयोगिनी, चेतश्री प्रकाशन, पुणे, १९९७.

२१. जहागिरदार, विजया, तेजस्विनी अहिल्याबाई होळकर, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ, मुंबई, १९९६.

२२. जहागिरदार, विजया, लोकमाता, मोरया प्रकाशन, मुंबई, १९६३.

२३. जोशी महादेवशास्त्री, भारतीय संस्कृति कोश, खंड २ रा, प्रकाशक - भारतीय संस्कृति कोश मंडळ, पुणे, १९६४.

२४. जोशी, महादेवशास्त्री, भारतीय संस्कृति कोश, खंड ३ रा, प्रकाशक - भारतीय संस्कृति कोश मंडळ, पुणे, १९६७.

२५. जोशी, महादेवशास्त्री, भारतीय संस्कृति कोश, खंड ४ था, प्रकाशक - भारतीय संस्कृति कोश मंडळ, पुणे, १९६८.

२६. जोशी, महादेवशास्त्री, भारतीय संस्कृति कोश, खंड १० वा, प्रकाशक - भारतीय संस्कृति कोश मंडळ, पुणे, १९८५.

२७. जोशी, द. म., बारा ज्योतिर्लिंग, आदर्श विद्यार्थी प्रकाशन, पुणे, १९८५.

२८. जोशी, लक्ष्मणशास्त्री, मराठी विश्वकोश, खंड ८ वा, प्रकाशक - महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, १९७९

२९. जोशी, लक्ष्मणशास्त्री, मराठी विश्वकोश, खंड १२ वा, प्रकाशक - महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, १९८५.

३०. जोशी, श. ना., भाऊसाहेबांची बखर, प्रकाशक - अ. वि. गृह प्रकाशन, पुणे, १९५९.

३१. टकले, अभिमन्यू, राणी अहिल्याबाई होळकर, कल्पना प्रकाशन, नांदेड, २००६.

३२. ठाकूर, वा. वा., होळकरशाहीचा इतिहास, भाग १ व २, होळकर सरकारच्या आज्ञेने प्रसिद्ध, होळकर गर्व्हन्मेंट प्रेस, इंदोर, १९४५, १९४६.

३३. पाटील, सु. आ., होळकर कुलभूषण अहिल्यादेवी, प्रकाशक - अहिल्यादेवी प्रगती मंडळ, जळगाव, २०००.

३४. पुरूषोत्तम, दास, देवी श्री अहिल्याबाई, प्रकाशक - मोरमकर, प्रथमावृत्ती, इंदोर, १९२३.

३५. पोतदार, अनंत, अहिल्यागीत, प्रकाशक - श्री क्षत्रिय धनगर सेवा संघ, इंदोर, १९९०.

३६. तिजारे, रा. व घांगरेकर चि. ग., आधुनिक राजकीय विश्लेषण, प्रकाशक - मंगेश प्रकाशन, नागपूर, १९९४.

३७. फाटक, न. र., पानिपतचा संग्राम, प्रकाशक - इतिहास संशोधन मंडळ, प्रथमावृत्ती, मुंबई, १९६१.

